# वांद्रे येथील आंबेडकरी बारा पाखाड्यांचा इतिहास

ज्ञानकिर्ती सुरेश बाळा धोत्रे

# ''वांद्रे येथील आंबेडकरी बारा पाखाड्यांचा इतिहास''

ज्ञानकिर्ती सुरेश बाळा धोत्रे

''प्रत्येक पिढीतील कार्यकर्त्याची ठाम समजूत असते आम्ही तेवढे शहाणे, मागचे खुळे व पुढचे बहकलेले असतात.''



गौरव प्रकाशन

## अर्पण पत्रिका

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्यावर अढळ श्रद्धा नेतृत्वावर

विश्वास आणि त्यांचा सहवास यांनी ज्यांचे जीवन पवित्र झाले...

वांद्रे म्युनिसीपालिटीत स्वतंत्र मजूर पक्षाच्यावतीने

'नगरसेवक' या पदावर जे निवडून आले...

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या जिवंतपणीच वांद्रे विभागात पूर्वीच्या

'पाली दांडा रोडला डॉ. बाबासाहेब आंबेडकर रोड' हे नाव

ज्या नगरसेवकांनी दिले...त्या निष्ठावान, धुरंधर, निस्वार्थी... दिवंगत

**ठुणाजी तुकाराम शिर्के**

**नारायण भिकू असगोलकर**

**चांगदेव नारायण मोहिते (गुरूजी)**

**रामचंद्र अर्जुन भोसेकर**

**आणि ज्ञात अज्ञात समाज कार्यकर्त्यांच्या**

# पवित्र स्मृतीस अर्पण...

# वांद्रे येथील आंबेडकरी बारा पाखाड्यांचा इतिहास

**Vandre yethil Ambedkari Bara Pakhadyancha Itihas**

**लेखक**
ज्ञानकिर्ती-सुरेश बाळा धोत्रे

**संकलन व प्रकाशन**
सौ. सुनिता सुरेश धोत्रे
सत्त्वशिला सुरेश धोत्रे.
या पुस्तकांतील सर्व संधोधित माहिती ही ज्ञानकिर्ती सुरेश बाळा धोत्रे
यांनी संकलित व संशोधित केलेली आहे.

''तक्षशिला'' ए विंग, ५०७,
डॉ. बाबासाहेब आंबेडकर कॉ.ऑ.हौ.सो.
सी.एन मोहिते गुरूजी चौक, १९ X १३ वा रस्ता,
खार (प.) मुंबई - ४०००५२

**मुद्रक-प्रकाशक**
''ज्ञानकिर्ती'' सुरेश बाळा धोत्रे

**अक्षर जुळवणी व मुद्रण**
व्हि टू एन्टरप्रायजेस
शेड नं. २, सर्वे नं. ६, यशवंत क्रिडा मंडळ गल्ली,
असल्फा व्हिलेज, साकीनाका लिंक रोड,
मुंबई - ८४.

**मूल्य: रू. १५० /-**

## यांचे आभारी आहोत!

मा. आनंदराज य. आंबेडकर

अनिलजी सवादकर

सुमेध जाधव

चंद्रकांत आड्रेकर (परिवार)

गजानन शिर्के (दिवंगत)

मधुसूदन मोहिते

मनोहर असगोलकर

उल्हास भोसेकर

जगदीश जाधव (घाटिवले)

मधुकर कांबळे (सातामकर)

सुदास जाधव

दिनकर राघो खैरे

श्रीमती आनंदीबाई भ. गायकवाड

आ.जी.रूके

प्रा. रमाकांत यादव

श्रीकांत तळवटकर

अनोज मोरे

गोकुळ जाधव

पी. जी. आगळे

डी. के. तांबे

शिवराम सावंत

प्रकाश मोरे

किशोर मोरे

गोविंद तानाजी धोत्रे

भिकू गोपाळ सुर्वे

रविकांत घंगाळे

तुकाराम जाधव (सरंदकर)

गौतम मोरे

नंदकुमार चांगदेव कासारे

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

''वांद्रे येथील आंबेडकरी बारा पारवाड्यांचा इतिहास'' नावांचे पुस्तक मा. ज्ञानकिर्ती सुरेश बाळा धोत्रे हे लिहीत आहेत. या बद्दल मला अत्यानंद झला. आणि त्याच बरोबर कुतूहल ही वाटले. त्यांच्या या धाडसाबद्दल नवल वाटले. माझी जिज्ञासा वाढली. एक तरूण आपल्या जन्मापूर्वीच्या घटनांचा मागोवा घेऊन जेव्हा लिखाण करतो तेव्हा त्याची संशोधकाची वृत्ती आहे हे सिद्ध होते. इतिहास हा सत्यकथनासाठी असतो. 'घडले तसेच सांगितले आहे' हा दृष्टिकोन बदलला तर इतिहास विकृत होतो. खोटा ठरतो आपल्या सोयीचा होतो. मा. ज्ञानकिर्ती सुरेश धोत्रे यांनी मात्र सावध पवित्रा घेतला आहे. घटनाक्रम पुराव्यावरच आधारित ठेवले आहेत. त्यांच्या या प्रामाणिकपणा बद्दल त्यांना धन्यवाद! ते पुरावे गोळा करून त्याची छाननी करणे त्यांची मांडणी करणे हे मोठे कष्टाचे आणि जिकरीचे काम आहे पण ते त्यानी नियोजितपणे केले आहे हे त्यांचे वैशिष्ट्य आहे!

माझ्या पिताजींच्या (प्रो. व्ही. जी. रावसाहेब) जीवनावर मा. ज्ञानकिर्ती सुरेश धोत्रे यांनी 'विश्व सम्राट' या दैनिकांत एक लेख लिहिला. त्या लेखाची तारीख होती २७ जुलै २००९. २७ जुलै हा आमच्या पिताजींचा स्मृति दिन! त्याचे औचित्य साधून वर्तमान पत्रात त्या दिवशी लेख छापून आलेला अंक आणि पुष्पमाला जेव्हा घेऊन ते घरी प्रथम आले त्याने मला गहिवरून आले व डोळे पाणवले. १९७० साला नंतर; म्हणजे त्यांच्या निधनानंतर एकोणचाळीस वर्षांनी त्यांचा समृती दिन कधी आहे याची कल्पना कुटुंबियानाच असते परंतु ही श्रद्धांजली अर्पण करण्याची पवित्र भावना, पिताजींच्या बद्दलची श्रद्धा, कृतज्ञता, निष्ठा, प्रेम हे सारेच अतुलनीय आणि कौतुकास्पद आहे. ही घटना बोलकी आणि आदर्श अशी आहे. इतकेच नव्हे तर डॉ. बाबासाहेब आंबेडकर रोडवरील बाबासाहेबांच्या पुतळ्याच्या प्रांगणांत श्रद्धांजलीची सभा घेऊन नव्या कार्यक्रमाची सुरुवात केली तो ही अंक त्या बातमीचा त्यानी मला दिला. मला धन्यता वाटली. धोत्रेंच्या बद्दल जिव्हाळा आपुलकी निर्माण झाली.

बारा पाखाड्यांतील वक्तृत्व, कर्तृत्व आणि नेतृत्व करणाऱ्या तत्कालिन डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या अनुयायांच्या कार्याचा गुण गौरव करताना त्या त्या व्यक्तिरेखांचे महत्व अबाधित राखण्याचा प्रयत्न हा स्तुत्य होय! हे पथ्य त्यानी पाळले आहे. त्यामुळे त्यातील सत्य आणि तथ्य प्राकृषनि उठून दिसते. हीच प्रक्रिया बौद्धेतरांसाठी जाणवते उदा. मुस्लीम धर्मीयांचे योगदान, बारा पाखाड्यातील शैक्षणिक, धार्मिक, राजकीय, सामाजिक सुधारणांसाठी बाबासाहेबांच्या चळवळीला, धेय्याला, समाजव्यवस्थेला पूरक ज्या, ज्या महनीय व्यक्तिनी कार्य केले आहे

त्यची दखल घेतली गेली आहे. महिलानाही प्राधान्य दिले आहे. या वरून त्यांची सहिष्णुता दिसून येते. हा विषय अत्यंत जटील, किचकट, आणि गहन असा आहे. म्हणून या विषयाला कोणीही स्पर्श केला नाही. यावर लिखाण झालेले नाही. सोपी गोष्ट सगळेच करतात. कठीण गोष्टीला सोपे करण्याचा प्रयोग धोत्रे यांनी केला आहे व तो सफल ही झाला आहे. ते अभिनंदनास पात्र आहेत.

बारा पाखाड्यांतील निसर्गाची रचना प्रस्तुत करतांना दाखविलेले बारकावे अत्यंत महत्वाचे आहेत. फळे, फुले, पाने, वेली, वृक्ष, औषधी वनस्पती याच बरोबर विहीरी, तळी, झरे यांचीही माहिती अत्यंत महत्वाची आहे. हा मौल्यवान ठेवा बारा पाखाड्यांत होता. दुर्दैवाने आज तो लुप्त झाला आहे. याचा खेद वाटतो. अन्य काही महत्वाच्या बाबींचा उल्लेख करताना शिक्षण ही बाब जशी महत्वाची मानण्यात आलेली आहे तद्वत आरोग्याला ही प्राधान्य दिलेले आहे. त्यामुळे बारा पाखाड्यांत आखाडे तालमी, व्यायाम शाळा अस्तित्वात होत्या. त्यामधून कसरतीचे खेळ खेळले जात होते त्यांत पुरूषांबरोबर महिलाही आघाडीवर होत्या. त्यातूनच समता सैनिकदलासारखी पोलादी संघटना बाबासाहेबांचे आणि समाजाचे सरंक्षण करणारी अस्तित्वांत आली. हे सत्य अबाधित आहे.

बारा पाखाड्यांतील वस्त्यांची झालेली स्थित्यंतरे हा मुद्दा ही अत्यंत परखडपणे त्यानी मांडला आहे. त्यामुळे अंत:करण विदीर्ण होते. मुस्लीम, ख्रिस्ती, हिंदू समाजाने केलेले जुलूम, अन्याय, अत्याचार निमूटपणे सहन करून प्राणपणाने केलेला प्रतिकार ही दीर्घकाळ स्मरणात रहातात. भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या वांद्रे विभागांत झालेल्या महत्त्वपूर्ण सभा यानी इतिहास हा त्यांचा विषय नाही. परंतु त्याही पलिकडे जाण्याची क्षमता आणि जबर ईच्छा शक्तीचा मात्र परिचय येतो.

समता सैनिक दलाची काठी या दोनच अक्षरांवर त्यानी लिहीलेली एक एक वाक्ये स्फूर्ति आणि चेतना निर्माण करतात. भाषा, वाक्य रचना अत्यंत लालित्यपूर्ण आणि ह्रदयावर चिरपरिणामी ठसा उमटविणारी झाली आहे. पदव्या धारण केलेल्या विद्वानांची भाषा डोक्यावरून जाते. आणि धोत्रेंची भाषा काळजाला भिडते. एक वेगळा ठसा उमटविते. ती लोकांची, आपली भाषा वाटते. दीर्घ काळ स्मरणांत रहाते. असा लेखक बारा पाखाड्यांत आढळावा हे ही आश्चर्य नाही का? त्यांच्या हातून घडलेली ही सेवा महत्वपूर्ण आहे असे मी समजते. त्यांच्या या सत्कार्यास माझ्या शुभेच्छा व आर्शिवाद

**सौ. लीला वसंत कर्णिक**
(प्रो. व्ही. जी. रावसाहेबांची कन्या)
स्नो व्हाईट १८ वा रस्ता खार मुंबई
२४/३/२०१०

# लेखकाचे मनोगत...

*''हृदय पेटले कधी हेलावले,*
*लोचनी अश्रू दाटले,*
*लेखणीने सारेच टिपले, अन्....*
*बारा पाखांड्या हे बोल उमटले''*

.................

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या चळवळीचा बालेकिल्ला म्हणून बारा पारवाड्यांचा उल्लेख आजही सातत्याने होत असतो. वांद्रे विभागातून चळवळीची मुहूर्तमेढ रोवली गेली असे सांगितले जाते. मुंबईमधील माहिमपासून कुलाब्यापर्यंत या समाजाच्या अनेक वस्त्या पसरलेल्या होत्या. त्यातूनच महत्त्वाच्या ठिकाणाना आगळे वेगळेपण प्राप्त झाले आहे. बाबासाहेबांच्या पदस्पर्शाने पुनीत झालेली ठिकाणे ही चळवळीची प्रमुख अंगे बनली. उदा. वरळी, नायगाव, वडाळा, शिवडी, परेल, भायखळा, कुलाबा या स्थानांचा उल्लेख करावा लागेल. ''ज्या समाजात मी जन्मास आलो त्या समाजाची गुलामगिरी जर मी नष्ट करू शकलो नाही. तर स्व:ताला गोळी घालून मरेन'' अशी जाज्वल्यपूर्ण भूमिका घेणाऱ्या या समाजाच्या उद्धारकर्त्या महामानवाचा विवाह मात्र भायखळ्याच्या मच्छी मार्केटमध्ये व्हावा हे सत्य कुणीही ना कबूल करणार नाही. परेलच्या पोयबावडी विभागातील बी.आय.टी. चाळीत या महामानवाचे वास्तव्य होते. या आधी काही काळ परळ येथील (एलफिन्स्टन) डबक चाळीत होते. छत्रपती शाहू महाराज त्यांना भेटण्यास बी.आय.टी चाळीमध्ये आले होते त्याच्याच बाजूला सोशल सर्व्हिस लीगचे कार्यालय होते. तेथे बाबासाहेबांचे कार्यालय होते. यामुळे जशी ही चाळ पवित्र झाली तसेच संत घाडगे महाराजांचे किर्तन वांद्रे जरी मंदिराजवळ, भाभा हॉस्पिटल समोरील पोलीस वसाहत असलेल्या ठिकाणी, आंबेडकर रोडवरील करळे चाळीत ओम पॅलेस येथे झाले होते. त्यामुळे वांद्रे व मुंबई पवित्र झाली. या घटना सुवर्ण अक्षरांनी इतिहासात लिहिल्या गेल्या.

वांद्रे विभाग हा उपनगरातील बाले किल्ला, यात पाली गावाला विशेष महत्त्व आहे. अशीच गाव ठाणे या परिसरात आहेत. चळवळीला पूरक असणाऱ्या अनेक बाबी वांद्रे विभागाने दिल्या आहेत. यामध्ये जसे राजकीय योगदान आहे, तसेच ते धार्मिक, सांस्कृतिक, कला, शैक्षणिक, विधायक अशा विविध अंगाने नटलेले आहे ही भूमी बाबासाहेबांच्या पदस्पर्शाने पुनीत झालेली असल्याने तिला अनन्य साधारण महत्त्व आहे. लहानपणापासून ''बारा पारवाड्या''हा सातत्याने सामान्यांचा नाद आणि निनाद ठरला आहे. बारा पाखाड्या हे सहजपणे म्हटले जाते. परंतू त्याचा

अर्थ काय ? हे कधी कुणी सांगितले आहे का ? साधारणपणे ६ ते ७ पिढ्या येथील गाव ठाणाने पाहिल्या आहेत. अस्पृश्यतेचे चटके अनुभवले आहेत. स्वातंत्र्य पूर्व काळातील अत्याचार पाहिलेत जातीय द्वेषाने बेभान झालेल्या गाव गुंडाना एकजुटीने नमविले आहे आणि आपल्या उद्धार कर्त्याच्या वक्तृत्वाने, कर्तृत्वाने आणि नेतृत्वाने प्रभावित होऊन स्वाभिमानी स्वावलंबी, संघटन निर्माण करण्याची किमया सहजतेने करून दाखविली आहे.

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या विचाराची ठिणगी परेल पोयबावडीमधील कार्यालयात पडत असे. चार चाळीत तिला ज्योतीचे स्वरूप प्राप्त होत असे व वांद्रे विभागात ज्योतीची ज्वाळा बनून अज्ञानाचा अंध:कार दूर होत असे. या म्हणण्याच्या समर्थनार्थ असा दावा करता येईल की स्वातंत्र्यपूर्व काळात व आजही पूर्ण मुंबईत आपल्या वस्त्या आहेत.

या वस्त्यामधून एक ही नगरसेवक निवडून येणारी घटना घडलेली नाही. पण वांद्रे विभागात मात्र एक नव्हे तर चार नगरसेवक निवडून येतात हा इतिहास नाही का ? याचे उत्तर आहे ''एकीत जय व बेकीत क्षय'' ! त्या एकजुटीने बारा पारवाड्यातील लोकांनी इतिहास घडविला आहे. त्यामुळेच वांद्रे विभाग हा उपनगरातील बालेकिल्ला ठरला आहे. महामानवाच्या श्रद्धेने, निष्ठेने, नेतृत्व स्विकारल्यामुळेच आजही दुर्जनानी भ्यावे देश द्रोह्यानी लाजावे, मेलेली मढी जिवंत व्हावी, अशक्ताच्या अंगामध्ये मध्ये बळाचा संचार व्हावा, दुर्बलानी हि अलौकिक शक्तींची कामे करून दाखवावीत असे अलौकिक सामर्थ्य बाबासाहेबांच्या चारित्र्यात आहे. बाबासाहेबांचा सहवास मार्गदर्शन, चळवळीत प्रत्यक्ष योगदान घेण्याचे सामर्थ्य ज्या पिढीला लाभले ती पिढी धन्य होय! त्या तावून सुलाखून निघालेल्या पिढीबद्दल आदर, कृतज्ञता, श्रद्धा व्यक्त करून त्यांना अभिवादन करणे हे आपले कर्तव्य ठरते. आजच्या सुधारणावादी गतिमान जीवनात त्यांची प्रेरणा आपले जीवन नितीमान बनविण्यास उपयुक्त ठरले तरी पुरे!

या सर्व मंथनात ज्यांनी मला मोलाचे सहकार्य केले ते शब्दातीत आहे. त्यांच्या कार्याचा खास उल्लेख न करण कृतघ्नपणाच ठरेल. या संशोधनाची कल्पना जरी माझी असली तरी कोणत्या दिशेने व कशाप्रकारे इतिहासाचा मागोवा घ्यावा याचे मार्गदर्शन त्यांनी मला केले.

१९२७ सालापासूनची जपून ठेवलेली सुभेदार सवादकर संग्राहल्यातील पत्रके ज्यांनी मला आपुलकीने व प्रेमाने दिली ते अनिलजी सवादकर व कुटूंबीय यांचे ऋण मान्य करावेच लागतील. माझे मार्गदर्शक (अभयनाथ) डी. के. तांबे यांचा अस्पृश्यतेचा दाहक अनुभव व प्रतिकाराचे तंत्र दिवंगत मा. शिवराम सावंत यांची मुलाखत म्हणजे आनंद सोहळाच.

प्रसिद्ध चित्रकार मा. दिनकरजी खैरे यांनी मुखपृष्ठ व त्यावेळची बारापाखाड्याची वास्तवता आपल्या कुंचल्याने साकारण्याची जबाबदारी स्विकारून मोलाचे सहकार्य केले आहे.

बौद्धजन पंचायत समितीच्या व्यवस्थापक मंडळाचे सदस्य अनोज भिमसेन मोरे त्यांच्या मातोश्रीचे सततचे मार्गदर्शन, श्रावस्ती सांस्कृतिक मंचचे मा. पीजी आगळे, गोविंद तानाजी धोत्रे, मा. भिकू गोपाळ सुर्वे यांचे मार्ग दर्शन अत्यंत मोलाचे आहे. प्रत्यक्ष अप्रत्यक्ष ज्यांचे

मार्गदर्शन मिळाले आहे त्या साऱ्यांचे आभार!

या प्रवासात उपेक्षित दुर्लक्षित अस्पृश्य समाजातील व अन्य धर्मीय विद्वान कार्यकर्ते शोधावयाचे होते. त्यांचे कर्तव्य सर्वांसमोर ठेवायचे होते या दृष्टिने शोध घेण्याचा हा प्रयत्न किती यशस्वी ठरला आहे ते काळच ठरवील!

२००६ मध्ये माझे पहिले पुस्तक ''बौद्ध कालीन मुंबई साष्टी बेटांतील बौद्ध संस्कृति'' ह प्रकाशित झाले. अल्पावधीतच प्रति संपल्या. प्रचंड मागणी असल्यामुळे दुसरी आवृत्ती अधिक माहितीसह प्रकाशित होत आहे. पहिली आवृत्ती Email वर प्रसारित झाली. हे मुंबईवरील मराठी भाषेतील लेण्यांवरील पहिलेच पुस्तक असल्याचा सन्मान वाचकांमुळे लाभला. इतिहास प्रेमी बौद्धेतरांनी अभिनंदन पर पत्रे पाठविली. प्रत्येकी दोन प्रति आशियाटिक लायब्ररी व सेन्ट्रल लायब्ररीमध्ये पुराव्या करिता ठेवण्यात आल्या असल्यामुळे धन्यता वाटली.

''गौरव गाथा नागपुत्रांची'' आणि ''रायगड जिल्ह्यांतील बौद्ध लेणी'' यांचे हस्तलिखित तयार आहे. बौद्ध लेण्याचं संशोधन सुरुच असल्याने महाबोधी सोसायटी कलकत्ता येथील प्रमुख भन्ते डॉ. डी. रेवतथेरो यांनी ''ले बुद्धिस्ट सोसायटी'' या संस्थेत मुंबई प्रेदशवर नियुक्ती केली. कोंडविते (अंधेरीच्या) लेण्यांची माहिती भन्ते आयुपाल यांना दिली. धारापुरीचा महत्त्वाचा पुरावा दिला. त्यामुळे भन्ते आयुपाल यांनी धम्म परिषदांचे तेथे आयोजन केले. प्रसिद्धीपासून मी दूरच राहिलो. ''भारतलेणी संवर्धन समिती'' या पहिल्या आवृत्तीचेच फळ आहे. मुंबईतील अशोक स्तंभ, पाच फूट साडेसात इंच उंचीचे ''शाक्युमुनि'' भगवान बुद्ध हे काळ्या दगडाचे एकमेव शिल्प मुंबईत आहेत याचा शोध लावता आला. वसई येथील एक सामाजिक व धार्मिक कार्यकर्ते मा. अशोकजी भाटे हे मा. परमानंद गेडाम याना डॉ. बाबासाहेब आंबेडकर रोडवरील पुतळ्याजवळ घेऊन आले होते. वांद्रे तालुक्यांतील सर्व पक्षीय कार्यकर्ते तेथे बसतात. चर्चे अंती ब्लीस (भारत लेणी संवर्धन) ही संघटना निर्माण झाली अनेक ठिकाणी लेण्यांचा शोध घेण्यांत आला. दुर्दैवाने मला भीषण अपघात घडला. व माझे योगदान मंदावले. परंतु भारत लेणी संवर्धन समितीचे काम चालू आहे.

मा. अनिलजी सवादकरांकडील वांद्रयांतील कागदपत्रे २००० सालीच नजरेखालून गेल्यामुळे मी स्वतंत्र पद्धतीने त्यांच्याच मार्गदर्शनाने अनेक लोकांकडून गेली चार वर्षे माहिती जमवित होतो. त्याचे फळ बारा पाखाड्यांचा इतिहास'' हे आहे. या शोधात माझ्या कुटूंबाने मला प्रोत्साहन दिले. माझ्या पत्नीने कधीही कुरबुर केली नाही. माझी कन्या सत्त्वशिला हिची मला खूपच मदत होते. दीड वर्षांत भाऊ सत्यपाल व भगिनी सुलक्षणाच्या आकस्मिक निधनाने आई वडिलाना बसलेल्या मानसिक आघाताची उणीव ती भरून काढत आहे. मी जी माहिती गोळा करतो किंवा जो शोध घेतो त्याचे निरीक्षण आणि परिक्षण करून मला सूचना करतात. माझे भोजन, औषधे, डॉक्टरांकडे नेणे ही माझी कन्या व नातू विराज हेच करतात. त्यामुळे हा संकल्प मला पूर्ण करता येत आहे. याचे सारे श्रेय माझी कन्या सत्वशिला हीचेच आहे. प्रकाशनाचा

अधिकार ही तिचाच आहे.

दलित पँथरच्या चळवळीतील एक अग्रगणी नाव आहे. मा. सुमेधजी जाधव यांचे व त्यांच्या कुटूंबियांचे मित्रच नव्हे तर घरगुती संबंधामुळे त्यानी माननीय विनायकजी साळुंके यांच्याकडे छपाईची जबाबदारी सोपविली ती त्यानी स्विकारली. त्यांची सुविद्य, सुशील पत्नी ॲडव्होकेट शिल्पा विनायक सावंत साळुंके यांनी तर आपल्याच घरांतील व्यक्तिप्रमाणे दक्षता घेतली. कर्मचारी वर्गाने रात्रंदिवस मेहनत घेऊन अल्पावधीत छपाई करून दिल्याबद्दल त्यांचे हार्दिक अभिनंदन!

हे एक संशोधन आहे. या संशोधनांत जे सापडले आहे ते जनते समोर ठेवले आहे. संशोधन सुरू आहे या प्रवासात शोधा म्हणजे सापडेल या न्यायाने शोधतोच आहे.

# पार्श्वभूमी

कोकणस्थ महार हे ''सोमवंशीय क्षत्रिय'' समाजाचे होते. त्यामुळे त्यांचा पूर्व परंपरेने चालत आलेल पेशा म्हणजे लष्करी पेशा होय. मोंगल बादशाही, मराठेशाही, व पेशवाई यांच्या कारकीर्दीत त्यांचे पूर्वज लष्करांत नोकरी करीत व पराक्रम गाजवीत.

ईस्ट इंडिया कंपनीच्या राज्य-स्थापनेला सुरूवात झाली तेव्हा अनेक महारांचे पूर्वज कंपनीच्या लष्करांत नोकरीस होते. महारांची आडनावे कागदोपत्री लिहीत जात नसत त्यांच्या नावापुढे ''नाक'' हे उपपद लावण्यात येत असे.

सैन्यांत नोकरी करणारे जे महार होते त्याना दोन गोष्टींचे व्यसन होते. एक दारूचे व दुसरे अध्यात्मिक ज्ञानाचे हजारो महारांनी ब्रह्मज्ञान मिळविण्याचा प्रयत्न केला. असे लोक तीन पंथाचे होते. रामानंदी, कबीर पंथी व तिसरा नाथ पंथी.

लष्करांतील लोक सर्रास क्रिकेट, हॉकी, फुटबॉल, व कुस्त्या हे खेळ खेळत. या खेळांत महार सैनिक आघाडीवर असत. तसेच कवायती व निशाणेबाजीतही प्रवीण असत डाव्या हातांत कबूतर व उजव्या हातांत बंदूक घेऊन त्याला उडवायचे व गोळी मारून खाली पाडायचे अशा पैजा ते जिंकत असत. पलटणींत सक्तीच्या शिक्षणामुळे कित्येक महार कुटूंबातील मुली शिक्षीत होऊन ग्रंथाचे वाचन करीत व धार्मिक विषयांवरही प्रवचने करीत. पलटणींत नसलेली जी कोकणस्थ महार कुटूंबे मुंबईत रहात असत. त्यांची जात पंचायत असे पलटणींतून निवृत्त झालेली माणसेही मुंबईत रहात असत पण त्यांचा कुणीही प्रति निधीना जात पंचायतीत घेतला जात नसे. त्यामुळे दोन पक्ष पडले. एक लंगोटीवाल्यांचा व दुसरा सूट बूट वाल्यांचा. संदर्भ. चरित्र.डॉ. भीमराव रामजी आंबेडकर(चांगदेव खेरमोडे)

## पहिली सामाजिक संस्था

## गोपाळ बाबा वलंगकर

हे महात्मा फुल्यांच्या काळांतील अस्पृश्यांचे आद्य समाज सुधारक होते. पलटणीतील नोकरीतून १८८६ साली हवा लदार म्हणून ते निवृत्त झाले व दापोलीला रहावयास आले. ते ज्ञानोदय, दीनमित्र, दीनबंधू इत्यादी वृत्तपत्रांतून आपले विचार मांडून जन जागृति करीत विटाळ विध्वंसन हे पुस्तक त्यानी लिहीले. १८८६ सालांत त्यानी दापोलीत अस्पृश्यता निवारण चळवळ चालविण्यासाठी ''अनार्य दोष परिहारक समाज'' नांवाची संस्था सुरू केली. अस्पृश्य समाजांतील ही पहिली सामाजिक संस्था होय. या चळवळीने अस्पृश्य समाजांतील नव्या पर्वाला

सुरूवात केली.

## शिवराम जानबा कांबळे

गोपाळ बाबा वंळगकरानंतर शिवराम जानबा कांबळे यांनी आपल्या कार्यास १९०४ सालात सुरूवात केली. पुण्यापासून आपले विचार दीनबंधूमध्ये लिहीत १ जुलै १९०८ रोजी त्यानी ''सोमवंशीय मित्र'' नांवाचे मास्तिक सुरू केले. त्यातून त्यानी अस्पृश्यांच्या शैक्षणिक, सामाजिक, धार्मिक, आर्थिक प्रगतिच्या दृष्टीने अनेक लेख लिहीले. स्त्रियांच्या बाबतींत त्यांचा दृष्टिकोन उदार होता. आपल्या समाजांतील वेश्यांचे त्यानी पुनर्वसन केले.

## दादासाहेब संभाजी तुकाराम गायकवाड

दादासाहेब संभाजी तुकाराम गायकवाड यांचा जन्म रोहा तालुक्यांतील (पौंड) पहूर या गांवी झाला. ते उत्तम मोटार मॅकॅनिक होते त्याकाळी त्याना २५०-३०० रूपये पगार होता. ते भायखळ्याच्या बी. आय. टी. चाळींत (बॉम्बे इंम्प्रूमेंट ट्रस्ट) रहात होते. त्यावेळचे प्रसिद्ध कार्यकर्ते सर्वश्री खोलवडीकर, गोविंद रामजी आडेकर, तानाजी गुडेकर, डी. पी. गंब्रे, एल. आर. कदम हे होते. दादासाहेबानी आपले पुत्र भिकाजी यांच्या पुढाकाराने संघटीत करून मुंबईत ''महार समाज सेवा संघ'' या नावांची संघटना ३० ऑगस्ट १९२६ रोजी स्थापन केली. या संघाने सभा, संमेलने, परिषदा व्याख्यान माला इत्यादिद्वारे समाज जागृति केली. कुलाबा जिल्हा बहिष्कृत वर्गाची पहिली परिषद १९-२० मार्च १९२७ साली महाड येथे झाली. या परिषदेचे पहिले अध्यक्ष होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकर व स्वागताध्यक्ष होते. दादासाहेब संभाजी तुकाराम गायकवाड.

खार महिला समाज सेवा संघ १७ ऑक्टोबर १९२७ साली स्थापन झाला. कोकणस्थ कॉलनीत या महिलांनी बरेच काम केले. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या सभा बारा पाखाड्यांत होत होत्या. त्यामुळे आपल्या समाजाच्यासाठी काही तरी फार मोठे कार्य चालले आहे. या जाणिवने बारा पाखाड्यांतील जनतेने ही चळवळ आत्मसात केली आहे. या चळवळींतील अनेक ज्ञात अज्ञात कार्यकर्त्यांची नोंद दुर्दैवाने इतिहासांत घेतली गेली नाही. ही वेदना अनेक वर्षे मला सलत राहिली होती. ती सुखकारक आहे तशीच ती दु:खकारक ही आहे. कुणावर अन्याय होणा नाही. सर्वांना न्याय मिळेल या उपेक्षा वृत्तीने हा शोध घेण्याचा प्रयत्न आहे. ज्यानी ज्यानी या उपक्रमांत मला साह्य केले आहे त्या बांधवांचे आभार मानण्यास शब्द ही अपुरे पडतील.

ही समाजसेवा समाजाच्या चरणी अर्पण करीत आहे.

# पाखाडी म्हणजे काय?

पाडा किंवा पारवाडी हा वस्तीचा निदर्शक शब्द आहे. याचे प्राचीनत्व शिलाहार राजांकडे जाते. त्यानीच पाडा किंवा वाडा हा शब्द प्रयोग अस्तित्वात आणला. शिलाहार राजांनी ४५० वर्षे राज्य केले. डोंगरमाथ्यावर चढण चढण्यासाठी व उतरण्यासाठी पाऊलवाटा परंपरेने तयार झालेल्या असतात. त्या पाऊलवाटा परंपरेने तयार झालेल्या असतात. त्या पाऊलवाटांना दगडी पायऱ्या बांधून मचाण (सारखेपणाने) बांधणे) पद्धत अस्तित्वात आणली.

डोंगरमाथ्यावरून पाऊल वाटेनेप्रमाणेच रस्ता मिळेल तसा पाण्याचा ओहोळ देखील वाट काढीत एकाच मार्गाने येतो. त्यामुळे जो मार्ग तयार होतो त्याला पारवाडी असे म्हणतात.

गर्द वनराजीमुळे सरपण, छाया, फळे मिळू लागली. आसपास पाणी, विहिरी, ओहोळ, ओढे, तलाव पाहून मानव वस्तीस योग्य अशी जागा शोधून तेथे वस्ती निर्माण होऊ लागली. अशी एक वस्ती निर्माण झाली की, तिला पारवाडी असे म्हणू लागले. एकापेक्षा अनेक वस्त्या निर्माण झाल्यास पारवाड्या असे संबोधू लागले. उदा. म्हातारपाखाडी, पाचपाखाडी, चिंचपाखाडी, बंदरपाखाडी, पाखाडी, ''पाडा'' ''वाडा'' वाडी हे समानअर्थी शब्द आहेत. तसेच वस्ती तयार झाली की तिला ''गाव'' म्हणू लागले. उदा. पाली गाव, शेरली गाव, चुईम गाव अथवा ''गावठाण'' हे सरकारी नोंदी करिता वापरण्यात येऊ लागले. मोगरा पाडा, केवणी पाडा, काजूपाडा, आग्रीपाडा दत्तापाडा, निशानपाडा, बामनवाडा इत्यादी गाव तिथे महारवाडा अशुद्ध रूप म्हारोडा, धेडवाडा-थेरवाडा थेर शब्दाचा अपभ्रंश धेड असा जातीयतेने हीनता दर्शक निर्माण झाला. पाखाडी या शब्दाचे मूळ शोधताना तो अशा प्रकारे बौद्ध काळाशी निगडीत असल्याचे स्पष्टपणे जाणवते अशा प्रकारची बांधलेली दगडी पाऊलवाट आज ही डॉ. बाबासाहेब आंबेडकर रोडवरील) ओम पॅलेस या इमारतीत आतील भागात आहे. दुसऱ्या पायऱ्या पाली पठार येथे बांधलेल्या होत्या. आताच्या एल.आय.सी कॉलनीच्या निर्मितीमुळे त्यांचे अस्तित्व नामशेष झाले आहे.



# बारा पाखाड्यांची हद्द

बारा पारवाड्यांच्या विभागाची हद्द वांद्रे पूर्वेस खेरवाडीपासून सुरू होते. महाराष्ट्राचे पहिले मुख्य मंत्री (बाळ गंगाधर खेर) बाळासाहेब खेर (बी. जी खेर) व त्यांचे बंधू पी.जी. खेर हे त्या काळातील काँग्रेस पक्षाचे मोठे कार्यकर्ते होते. खेर साहेबांच्या नावावरूनच ''खेरवाडी'' ही वसाहत निर्माण झाली जवळच जुनी वसाहत अमृत नगर (बारा बंगले) आताची सर्वोदय बॅकवर्ड क्लास हा. सो. खाडीच्या परिसरात वसविण्यात आली. सुबक, आखीव व रेखीव अशी बैठी कौलारू घरे होती आणि महत्त्वाची बाब ती बारा होती. तीन चार हजार रूपयात जागेसह सभासदांना प्राप्त झाली पुढे आल्यावर रेल्वेची कॉलनी आहे. याला तीन बंगला असे म्हणतात. वांद्रे स्टेशनजवळ कत्तलखाना, भोयवाडा, वारूडा, कांतवाडी पलिकडे अलियावर जंग मार्ग आहे त्याच रस्त्याने पुढे आल्यास हनुमान टेकडी, सिद्धार्थ कॉलनी, वाकोला बौद्धकालीन नाव (वखोला) असे आहे. ख्रिश्चन वसाहतीमध्ये वखोला असेच लिहिलेले आहे. नळाचा पाडा (नळाचा महारवाडा) असा शब्द प्रयोग आहे. १९३८ ते १९४८ सालापर्यंत प्रचलित होता. कॅट कंपनीजवळ (स्टँडर्ड बॅटरी) या परिसरात मानीपाडा वाकोला आजची विद्यानगरी (कालीना युनिर्व्हसिटी याला कोले कल्याण असे नाव आहे पुढे गेल्यास एयर इंडिया कॉलनी पासून मिलीटरी कॅम्प (ही डोंगर फोडून बनविलेला आहे.) खार स्टेशनजवळ एक सिमेंटची बांधलेली मोठी कमान होती त्यावर १८९४-सांताक्रुझ असे लिहिलेले होते. आता ती कमान तेथे नाही.

सांताक्रुझ चुनाभट्टी, खोताचीवाडी, भिमवाडा पश्चिमेकडून जुहू कोळीवाड्याच्या मार्गाने फिरून दांडा कोळीवाडा, आग्रीपाडा, गझंधर बांध खरे नाव, सखाराम बुवा पाटील मार्ग या पाटलांनी समुद्रामध्ये बांध घालून रस्ता तयार केला आहे तिथून चुंईम गाव राजन शेरली गावठाण चिंबई कोळीवाडा, बँड स्टॅण्ड, माऊंट मेरी कडून वारुंडा, भोईवाडा, स्लॉटर हाऊस, किटकिटवाडी, वैतागवाडी, गुलाबवाडी, गाढवबाव, नांगावाडी, पालीगाव, पाली पठार, आंबेडकर रोड, नवी पाली, नवा मळा, नवी शेरली, कोकणस्थ कॉलनी (महार कॉलनी) अशा परिसराशी जोडलेली आहे. या हद्दीत १९३८ साली एफ वार्ड व आय वार्डातून स्वतंत्र मजूर पक्षाच्या तिकिटावर ठुणाजी तुकाराम शिर्के व नारायण भिकू असगोलकर यांनी भारतरत्न डॉ. बाबसाहेब आंबेडकर यांच्या नेतृत्वाखाली निवडणूक लढविली व बहुमतांनी निवडून आले.

आंबेडकरी चळवळ ज्या मातीत रूजली, वाढली, बहरली, ती माती कशी होती ? जिला खत पाणी घालून बाबासाहेबांनी हक्क, अधिकार आणि अस्मितेच्या रसाळ फळाची लागवड केली. त्या मातीचा ओबड-धोबडपणा समजून घेतला पाहिजे.

महाड, पोलादपूर, दापोली, मंडणगड म्हणजेच ठाणे कुलाबा, रत्नागिरी या जिल्ह्यातील व मुंबई इलाख्यातील क्षात्रतेजाने उजळून निघालेली ती महार समाजातील या बारा पारवाड्यांची तटबंदी होती.

# बारा पाखाड्यातील वस्त्यांची स्थित्यंतरे

बारा पाखाड्यांचा उल्लेख करताना सहा-सात पिढ्यातील सामाजिक, राजकीय, व भौगोलिक परिस्थितीचा विचार करता असे निदर्शनास येते की, आजच्यासारखी प्रगतस्थिती त्या काळी नव्हती रस्ते नसल्यामुळे अंधाराचे साम्राज्य असे कंदील, चिमणीबत्ती, टेंबे व रस्त्यावरील गॅसचे दिवे हेच प्रतिष्ठेचे समजले जात असत. कुक्कुटपालन किंवा धनगरांकडून अर्धेल पद्धतीवर बकरी पालन हे जोड धंदे होते. नोकऱ्यांचा तुटवडा नसे. सिगारेट कंपनी, रेल्वे, गिरणी, बटलर अशी नोकरी मिळत असे वांद्रे स्टेशनपर्यंत पायी प्रवास करावा लागे. शाळा कमी असल्यामुळे शिक्षणाचा अभाव होता. इयत्ता ४ थी किंवा ७ वी पर्यंत (व्हर्नाकूलर फायनल) शिक्षण प्रतिष्ठेचे गणले जाई. म्यु. म. अ. प्रा. शाळा लक्ष्मीनगर या शाळेस ५ नंबरची शाळा म्हणत. पाली नाका येथे असणारी ६ नंबर शाळा आताचा लिकींग रोड ही पायवाट होती. एकटा माणूस प्रवास करीत नसे. केल्यास त्याला लुटारू लोक लुटत असत. नारळी आग्रीपाडा येथून लिडो सिनेमाकडे जाणारा रस्ता याला बांध असे म्हणतात. भरतीचे पाणी अडविण्यासाठी दांडा कोळीवाडा ते लिडो सिनेमापर्यंत चक्रे बसविली होती. त्यांना झडपा असत. भरती येताना झडपा बंद करीत असत. भरती गेल्यानंतर झडपा उघडत असत. तेथे गझधर बांध ही म्यु.म.अ.प्रा.शाळा आहे. नवा मळा नवी पाली, नवी शेरली या जुन्या वस्त्यांची नवी नावे घेऊन वसविलेल्या वस्त्या आहेत. प्रत्येक पाखाडीत बारा घरे असत. अधिक झाली तर पंधरा असत. पण त्यापेक्षा अधिक झाल्यातर त्यांची वेगळी रांग होत असे.

स्थित्यंतरे होण्याची अन्य कारणात इंग्रजांनी टेकडी किंवा डोंगर तोडून रस्ता तयार केल्यामुळे मूळ वस्ती उठली परंतू जिथे ती वस्ती होती ते नाव धारण करून तशाच स्वरूपात नवीन वस्ती निर्माण झाली यामध्ये कांतवाडी नवी-जुनी चिंबई-सतईचा उल्लेख करावा लागेल.

देश स्वतंत्र होताना ज्या दुर्दैवी परिस्थितीमधून भारतीयांना जावे लागले तो काळ माणूसकीला काळीमा फासणारा होता. फाळणीमुळे ज्या लोकांना निर्वासित होण्याची वेळ आली असे पाकिस्तानातील सिंध प्रांतातून आलेले सिंधी बांधव वांद्रे विभागातही आले. त्यामुळे सरकारने त्याना जागा देण्याचा निर्णय घेतला. त्यानुसार लिंकिंग रोड येथे पटवर्धन उद्यानासमोर जे आर.डी.नॅशनल कॉलेज झाले आणि पुढे मागे सिंधी कॉलनी झाली. जी आज ही अस्तित्वात आहे. त्याचप्रमाणे सिंधी समाजातील धनिक लोकांनी सरकारला जी जागा दाखविली ती जागा मोकळी करून देण्यात आली. किट कॅट वाडी, आंबेवाडी, गाढव बाव, गुलाबवाडी, नांगावाडी अशा वसाहती ज्या जुन्या होत्या त्या उठविण्यात आल्या. कारण आपल्या वसाहती झोपडपट्टी

सदृश्य होत्या. त्या उठविण्यात आल्या जमिनीचा मालकी हक्क सरकारचा होता तो सरकारने वापरला. निर्वासितांना बंगले बांधून दिले. निर्वासिताना वसविले. व मूळ रहिवाश्यांना हुसकावून लावून त्यांचे मात्र संसार उद्धवस्थ केले. हे कारण ही स्थित्यतरास प्रमुख ठरले आहे.

तद्वत् आपला समाज अशिक्षित होता. झोपडी बांधून राहत. कलेक्टरला भुई भाडे भरीत. परंतू जमिन विकत घेण्याइतपत सारासार बुद्धी त्याने वापरली नाही. जागा कुठे न्यायाची आहे ? असे म्हणत. स्वावलंबीपणाने मेहनत करण्यावर भर इमाने इतबारे इज्जतीचे जीणे जगत. एखादी ''मोक्याची जागा ख्रिस्ती इसमाच्या नजरेत भरली की तो म्हणत असे ''अयं कनाला न्हाते ? तवार झोपरं बांध या दिरक्या घे'' त्यामुळे शे-सवाशे रूपयात तेथून हलावे लागे. कोर्ट कचेऱ्या करण्याची ऐपत नसल्यामुळे किंवा पुरावे नसल्यामुळे न्याय आपल्याला मिळेल याची शाश्वती नव्हती. त्यामुळेही बरीच स्थलांतरीत झाली आहेत.

समुद्र किनाऱ्याजवळ पोलीस आयुक्तालय आहे. पेरी नावांच्या इंग्रज अधिकाऱ्याचा बंगला तेथे होता. त्यामुळे पेरी क्रॉस असे नाव पडले तिथे २२० क्रमाकांच्या बसचा शेवटचा थांबा होता. तिथून ती फिरून वांद्रे स्टेशन येथे जाई. कार्टर नावांच्या इग्रजी अधिकाऱ्याच्या नावांवरून कार्टर रोड हे नाव पडले. आता संगीत सम्राट नौशाद असे नाव पडले. आताचा पाली मळा रोड हा उंच डोंगर होता. तो तोडल्यामुळे रस्ता झाला. व नवीन वस्त्या पाली पठाराच्या पुढे आल्या. नवा मळा ही वस्ती युनियन पार्क क्रमांक १ च्या जवळ आहे. डॉ. आंबेडकर रोड व पाली हील रोड (नर्गिसदत्त रोड) येथे करळे चाळीत संत गाडगे बाबा यांचे प्रवचन झाले होते. श्रावस्ती सांस्कृतिक मंच या संस्थेने डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या अर्धाकृती पुतळा उभारला आहे. विभागात वस्ती होण्याचे मूळ कारण म्हणजे गोड्या पाण्याच्या विपूल विहिरी. जमिन पठारालगत असल्याने पावसाच्या पाण्याचा निचरा वेगाने होई या पुढे नवी पाली ही वस्ती आहे. येथे महत्त्वपूर्ण घटना घडल्या आहेत. दिनांक ११/१२/१९२७ साली महाडच्या चवदार तळ्याच्या सत्याग्रहाची तयारी करून मदत करणारी जाहिर सभा येथे झाली. १०००च्या वर जनसमुदाय येथे हजर होता. सभेचे अध्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे होते. सवादकरांच्या अध्यक्षतेखाली १९३५मध्ये आईसाहेब रमाबाई आंबेडकरांची शोक सभा क्राऊन सिगारेट कंपनीमधील कामगारांच्यावतीने झाली. सेंट फ्रांसीस क्लबमध्ये बारा पाखाड्यांच्यावतीने जाहीर सभा झाली अशा अनेक महत्त्वपूर्ण सभा १२ पाखाड्यात झाल्या आहेत. पुढील वस्ती नवी शेरली आहे. नारायण भिकू असगोलकर हे नवी शेरलीतील रहीवाशी १९३९ साली आपल्या कार्याचा अहवाल देणारी जाहीर सभा घेतली सभेचे अध्यक्ष डी. व्ही. प्रधान हे होते येथील सोनुबुवा व राजूबुवा (मुमर्शीकर) यांचे एक तारी भजन मंडळ होते. त्यातून चळवळीचा प्रचार होत होता. त्यांचे एक गीत होते.

''सेनानीचा हुकूम सुटला व्हा सावधान!
वाजली तुतारी आता युद्ध रंगणार''!!

गोपाळ देवजी पवार (चिंचविलकर) हे पहिलवान होते. सिताराम गणू पवार (कासेकर) हे

औषध देणारे (वैद्य) होते. भिकू शिवराम सोवळे हे पंचाग बघणारे जोतिषी होते. जाणू रूके (उंब रशेतकर) हे जोतिषी होते. लक्ष्मण धोंडू मोरे (तेरडकर) बाबाजी धर्मा जाधव (घराडकर) बाळा सुडकाजी धोत्रे (कुंभराडकर) आदि प्रसिद्ध कार्यकर्ते होते. यांच्या प्रयत्नाने नवी शेरली ही वस्ती झाली. या परिसरातील विहीरीना मुबलक पाणी होते ते गोडे होते. नळाची योजना तेव्हा अस्तित्वातच नव्हती. या मुबलक पाणी पुरवठ्यावर भाजीचे मळे, भात शेती या परिसरात विपुल प्रमाणावर होत होती. त्यामुळे या वस्त्या स्थलांतरित झाल्या. काठेवाडी समाजाचे लोक पावसाळा ते विजयादशमीपर्यंत भाजीचे मळे, भात शेती करीत. झेंडूच्या फुलांची शेती या मोसमात होत असे. घोसाळी, वांगी, पडवळ, भेंडी, दुधी, चिबूड सहज रस्त्याने जाताना लोक तोडून घेऊन जात त्यामुळे कुणीही विचारीत नसे. या जमिनीला खाचर असे म्हणत येथील घरे झोपडीच्या स्वरूपात असत. ती ताडाच्या झावल्यानी शाकारली जात बहुतेक झोपड्या पूर्वी गवताच्या पेंढ्यांनी शाकरत त्यांनतर, झावल्या, नळ्याची कौले, मेंगलोरी, कामठ्यांचे कुड, मातीच्या भिंती त्यात देवळ्या किंवा घासलेटच्या बत्त्या, कंदील (फानस) ठेवण्यासाठी व्यवस्था, अंगणांस वृंदावन, साखण करून स्वच्छता या गोष्टीची पूर्तता केली जाई बहुतेक झोपड्या चौपाकी असत. घराना पडव्या ओटे असत खेड्यातील बाबी येथे दिसत एका गावठाणात साधारण पंधरा झोपड्या असत. त्या दुतर्फा बांधून मध्ये रस्ता असे त्यामुळे लग्नकार्य समारंभास अधिक शोभा येई

# बारा पाखाड्यांचा राजकीय इतिहास

महाराष्ट्रात आर्य वसाहत झाली तशी ती अपरान्तांत म्हणजे कोकणात स्वतंत्रपणे झाली कोकणचे लाट, डांग, शूपरिक, अष्टागर, कोकण, गोमान्तक व वनवासी असे सात विभाग पडतात दमण गंगेपासून मुंबई पर्यंतचा प्रदेश तो शूपरिक ठाणे जिल्ह्यात तर अष्टागर कुलाबा जिल्ह्यात मुख्य ठिकाण सोपारे तर अष्टागारांतील चौल त्याचा उल्लेख शिला लेखातून येतो. कोकण म्हणजे रत्नागिरी जिल्हा मुंबईचा कान्हेरी बेटाशी येतो. मुंबईचा उल्लेख कोकण असाच प्राचीन साहित्यात येतो.

महाराष्ट्राला मल्लराष्ट्र अशी संज्ञा होती मल्ल आणि मार-महार-महार म्हणून महाराष्ट्र या संज्ञेचा अर्थ महारांचे राज्य महारांचा पाडाव झाला आणि विस्मृत महाराष्ट्राचा मोठे राज्य अर्थ निघाला महाराष्ट्र या लोकवाचक संज्ञेचे विवरण ज्ञानकोशकार केतकरानी केले आहे. ते त्यांच्या प्राचीन महाराष्ट्र या ग्रंथामध्ये त्यांचा सिद्धांत असा की, जेथे महाराष्ट्रीय भाषा बोलली जाते तो महाराष्ट्र महाराष्ट्राच्या आद्य विकासाचा काल ख्रि-पू- दुसऱ्या शतकांत जातो. महाराष्ट्रात अत्यंत प्राचीन काळी आगमन झाले ते भोजाचे वररूचीकाळी राष्ट्रीक आले. मग महार आले. पुराणातील नागाची कुलनामे महारात आडनावे या रूपाने शिल्लक आहेत.

महार हेच नागांचे प्रतिनिधी आहेत. महार रठ्ठ व भोज यांच्या एकीकरणाने महाराष्ट्री हे भाषा नाम निर्माण झाले. रठ्ठांची कुलनामे महारांत गेली महारांची रठ्ठांत आली. महाराष्ट्रातील प्राचीन वाड:मय म्हणजे हालाची सप्तशती. प्रमुख जानपद हालिक होता. तसेच सर्व जानपद महाराच होता. महारांच्या वस्त्या कोकणात अधिक प्रमाणात आहेत बारापारवाड्यांत बहूसंख्य वस्ती अस्पृश्य म्हणजे महार समाजाचीच होती. महाराष्ट्रातील महार हे मूळचे रहिवाशी असून जमिनीची मालकी त्यांच्याकडेच होती. आर्य लोकांची वस्ती जसजशी पसरत गेली तसतशी त्यांनी त्यांच्या जमिनी हिरावून घेतल्या आणि त्यास गावकुसाबाहेर हाकून लावले. शेताची राखण करणे, मैला उचलणे आणि गावातील लोकांचे निरोप गावोगाव पोहचविणे इत्यादि हलक्या कामावर त्यांची योजना केली. या लोकांची वस्ती गावाच्या सीमेवर स्वतंत्र भागात असून तो भाग ''म्हाखाडा'' या नावाने ओळखला जातो. भूमीपुत्र किंवा धरणीचे पूत्र हे नाव महारांचा पूर्वीचा व आताचा संबंध दर्शविते. कांठी हे महाराचे विशिष्ट लक्षण मानण्यात येते. इतके की, काही ठिकाणी कोर्टातून व रजिस्टर कचेरीतून काठी ही महाराची निशाणी स्विकारण्यात येते. वेसकर म्हणजे रात्रीचा पहारा करणारा जातिभेदाने आपसातच हा समाज विखुरलेला होता

## महाराष्ट्रातील त्रेपन्न जाती (पोटजाती)

१) अबने २) आन्दवन किंवा अन्धोन ३) अनंत कुल्य ४) औट कांबळे ५) बल्टा ६) बाल कांबळे ७) बारके ८) बावन किंवा बावने ९) बावचा १०) बाविसे ११) बेल, बेले किंवा बेलिया १२) बेन १३) बंकर १४) बोले १५) चळेकर १६) डौले १७) धेड १८) धार्मिक १९)डोम किंवा डोंब २०) गरदी २१) गवसाई किंवा गवशे २२) घडशी २३) घाटकांबळे २४) गोडवन किंवा गौडवन २५) गोपाळ २६) हेडशी २७) होलर किंवा हुवळ २८) हाडे २९) जोगती ३०) जुन्नरे ३१) कबुले ३२) कडवन किंवा कडू ३३) कांबळे ३४) कासारे ३५) खडसे ३६) कोचरे, खोसरे किंवा कोसारे ३७) लादवन किंवा लाधवन ३८) मटकांबळे ३९) मुरळी ४०) निराळे ४१) पाण किंवा पाठ्य ४२) प्रधान ४३) पुलार ४४) रती ४५) सालादी यालादे ४६) सिलवन ४७) सिरसाळकर ४८) सोम, सोमवंशी ४९) सोमकांबळे ५०) सोनकांबळे ५१) सोनाइबल ५२) सुताड ५३) तिळवण

*संदर्भ : मुंबई इलाख्यातील जाती-माटे अस्पृश्यांचे प्रश्न-महारांच्या पोटजातीत अस्पृश्य जातीतील महार जमातीने केलेल्या अनन्य साधारण पराक्रम अज्ञानामुळे जनता विसरली होती.*

शिवाजी महाराजांच्या पदरी असलेल्या महारांनी स्वत:च्या मर्दुमकीवर किल्ले सर करून दिले होते. राजाराम महाराजांच्या कारकीर्दीत नागनाक महार याला वैराटगड हा मोगलांच्या ताब्यात असलेला किल्ला सर करण्यासाठी खुद्द राजाराम महाराजांनी नेमले होते. थोड्याशा महार सैनिकांच्या साहाय्याने मोगलांच्या प्रचंड सेनेला किल्ल्यांतून पळवून लावले व किल्ला सर करून मराठी साम्राज्यात सामील करून दिला.

रायगडावर इंग्रजांनी हल्ला चढविला तेव्हा त्या गडाचा प्रमुख रायनाक महार याने १५ दिवस मोर्चे बांधणी करून इंग्रज सेनेचा धुव्वा उडविला आणि शहीद झाला.

- पेशव्याच्या काळात खडर्याच्या लढाईत महार सरदार शिदनाक याने अप्रतिम शौर्य दाखवून पठाणांच्या तडाख्यात सापडलेल्या परशुराम पटवर्धन या ब्राह्मण सरदाराचे रक्षण केले. हिरोजी पाटणकरासारख्या सरदाराकडून ज्याची तलवार खंबीर तो हंबीर अशी शाबासकी मिळविली.

अफगाण युद्धात कर्नल वार्ड बी यांच्या नेतृत्वाखाली पराक्रम गाजवून धारातीर्थी पडलेल्या महार सैनिकांची नावे हुतात्मा चौकाजवळील बी रोडवरील इंग्रजी शाळेत आहेत.

सैन्यात नोकरी केल्यामुळे बँडवाले, सैन्यातील जखमींना वाहून नेणारे व त्यावर उपचार करणारे, बागेत काम करणारे बागवान साफ सूफ करणारे खान सामा, बटलर आदि नोकर होते. बाबासाहेबांच्या नेतृत्वाने मरगळ नष्ट झाली आणि बारा पाखाड्यात चैतन्य निर्माण झाले.

बारा पाखाड्यांतील लोकवस्ती का वाढली ?

पश्चिम समुद्र किनाऱ्यावर कोळीवाडे आहेत. उपनगरात बारापाखाड्यांच्या हद्दीतच जर पाहिले तर बँडस्टँड नंतर चिंबई, दांडा, जुहू हे कोळीवाडे येतात. कोळी समाज हा बहूसंख्य आहे. पोर्तुगीजांनी व इंग्रजांनी सत्ता असल्यामुळे बाटविण्याच्या. प्रकारास सुरूवात केली (दातारी) ख्रिस्ताव हा मूळ हिंदू असलेल्या नवीन लोकांचा समुदाय निर्माण झाला. ते चर्चला देऊळ म्हणू लागले. काही स्थानिक संस्कार भिनेलेले तसेच राहिले व देवीच्या जत्रेचे (गावसय) नवस सायास पाळू लागले. ख्रिस्ती धर्म स्वीकारल्याने सरकारने त्याना जमिनी दिल्या. मूळ निवासी असल्याने त्याना भात शेतीची माहिती होती. भाजीपाल्याच्या मळ्यांची माहिती होती. फुलांची शेतीही होत होती. हा सर्व व्यवहार सांभाळण्यास घरकामे करण्यास त्यांना माणसांची जरूरी भासू लागली. येथील अस्पृश्य समाजाने त्यांची गरज लक्षात घेतली. व त्यांना सहकार्य केले परिणामत: दोन पैसे मिळू लागले व तेथे रहाणाऱ्या आपल्या ज्ञाती बांधवाबरोबर संबंध वाढविल्याने गावावरून आपल्या मुलां-माणसाना बोलावण्याचे सत्र सुरू झाले अशा तऱ्हेने ठाणे, कुलाबा, रत्नागिरीतील बहुसंख्य लोक येऊ लागले. त्यांच्या समुदायाने बारा पाखाड्यात लोकवस्ती वाढली.

बारा पाखाड्याचा इतिहास फार जुना आहे बारापाखाड्या या ठाणे जिल्ह्यात व साष्टी बेटात अंतर्भूत होतात. बारा पाखाड्या नाम संबोधन होण्यापूर्वी ''पाडा'' ''वाडा'' हे नामाभिधान शिलाहार राजांच्या राजवटीपर्यंत पोहचते. त्यानंतर सम्राट अशोक राजाच्या काळात या परिसराचा संबंध आला. पश्चिम किनाऱ्यावरील अथांग पसरलेल्या समुद्र किनाऱ्यावर नालासोपारा ही त्यांची प्रांतिक राजधानी होती. त्या काळात खऱ्या अर्थाने जंबूद्वीपांत सुवर्ण युग होते समुद्र किनारी राहाणारे कोळी, आग्री, भंडारी, महार, रामोशी, मांग, बेरड आदि समुदायाचे लोक हे सम्राट अशोक राजाचे सैनिक होते. मुस्लीम राजवटीला बाराव्या शतकात सुरूवात झाली. मोगलशाही, आदिलशाही, कुतूबशाही, निजाम शाही मुघलशाही या राजवटी साष्टी बेटानी पाहिल्या तसेच छत्रपती शिवाजी महाराजांची शिवशाही ही साष्टीने अनुभवली आहे. डच, पार्तुगीज, इंग्रजांचा या भागाशी संबंध आला. पेशव्यांचे आरमाराचा वांद्रे बंदराशी संबंध आल्याचा पुरावा भायखळ्याच्या भाऊ दाजी लाड संग्रहालयात पहावयास मिळतो.

पोर्तुगीज राजवटीच्या धर्मवेडामुळे कोळीवाड्या शेजारी धर्मांतरीत झालेल्या ख्रिश्चनांच्या वस्त्या आहेत. पोर्तुगीज राजसत्ता सुरू होण्यापूर्वी सन १९३२ पर्यंत नालासोपारा या बंदरांतून व्यापार होत होता. मोठी व्यापारी जहाजे होती तशीच छोटी ही होती त्यात शिडाची जहाजे असत. सुकाणू डोलकाठी यांनी नियंत्रण केले जाई. त्यात खांब हा मुख्य आहे त्या खांबावर चढणे उतरणे होई. शारिरीक कसरत होई. त्यातूनच मल्लखांब निर्माण झाला असावा. महारांमध्ये क्षात्रतेज मुळातच आहे. कर्तबगारी साहस व धाडसाची आवड तर समशेरीशी आधीपासूनच नाते. पार्तुगीनांनी धर्मप्रसारांकडे व्यापारांपेक्षा जास्त लक्ष दिले. अस्पृश्य समाजाला शिक्षणापासून वंचित रहावे

लागल्यामुळे अतोनात नुकसान झाले. मुस्लीम समाज व ख्रिश्चन समाज बहुसंख्येने असल्याने आपल्या समाजावर अनन्वित अत्याचार होत असत. इंग्रज सत्ता असल्याने न्याय संस्था अधिकारी हे आपल्या विरूद्ध होते त्यामुळे प्रतिकार करण्याची शक्ती नष्ट झालेली सतत अन्याय, अत्याचार सहन करण्याने आपला कुणीही वाली नाही. अशी भावना झालेली होती. छत्रपती शिवमहाराजांच्या पूर्व काळापासून आपल्या समाजातील लोक लढवय्ये होते. किल्लेदार, जमादार, सुभेदार, जंगबहादूर, समेशेर बहादूर अशा पदव्या त्यानी प्राप्त केलेल्या होत्या. तालमी, आखाडे हे आपलेच होते. त्यात मल्ल खांब, दांडपट्टा, छडी पट्टा, भाला, तलवार, चक्री, बरची, खंजीर, लाठी, बनाठी यामध्ये कुशल होते. काठी तर महारांची निशाणीच होती. बारा पाखाड्यातील प्रसिद्ध नाव होते बावनडाववाला भाग्या, शंकरदादा रोविलकर, पांडूरंग गमरे (मानकर) यांच्या आखाडा व व्यायामशाळा होत्या. कृष्णादादा खरवतकर, बुध्या दादा, राघोदादा, रामचंद्र धराडकर, सदाशिव तुळसकर, गोपाळ देवजी पवार, बावन डाववाल्या भाग्याची मुलगी सोनाबाई: बायजाबाई बढेकर, बेबी फर्नांडीस या स्त्रिया ही बारापाखाड्यात प्रसिद्ध होत्या. ठुणाजी तुकाराम शिर्केसारख्या मुत्सुद्दी नगरसेवकाने एकजुटीने या ख्रिश्चन समाजाला व मुस्लीम समाजाला झुंज देणारी वीर श्री निर्माण केली. याचा फायदा असा झाला की बारापाखाड्या हा आंबेडकरी चळवळीचा बालेकिल्ला गणला जाऊ लागला व चळवळीची मुहूर्तमेढ रोवली गेली. अनेक वेळा येथे बाबासाहेबांचा संबंध आला आहे. महाड, दापोली, मंडणगड, ठाणे रत्नागिरी जिल्ह्यातील निष्ठावान कार्यकर्त्यांची फळी निर्माण झाली. त्यामुळे संबंध मुंबईत जे जमले नाही ते बारापाखाड्यातील लोकांना जमले. स्वतंत्र मजूर पक्षांतून १९३८ साली ठुणाजी तुकाराम शिर्के व नारायण भिकू असगोलकर हे बहुमताने निवडून आले. त्यानंतर त्यांनी सी.एन.मोहिते गुरूजी व रामचंद्र अर्जुन भोसेकर यांना निवडून आणले. सातामकर भगिनी, धर्माजी सोन् जाधव, सखाराम भिकू धोत्रे आदि मंडळीने योगदान दिले.

शेड्युल्ड कास्ट फेडरेशनचे अध्यक्ष होण्याचा मान दि. ठुणाजी तुकाराम शिर्के व नारायण भिकू असगोलकर यांना मिळाला त्यामुळेच महाराष्ट्राचे सुप्रसिद्ध लेखक, कवी, नाटककार, पत्रकार आणि विचारवंत दि. आचार्य अत्रे म्हणत शेड्युल्ड कास्ट फेडरेशन ही संघटना बाबासाहेबांची कवच कुंडले आहेत. महनीय व्यक्तिीने दिलेली पोचपावती बारा पाखाड्याच्या इतिहासाची साक्ष आहे.

# बारा पाखाड्यातील निसर्ग रचना

बारा पाखाड्यांच्या रचनेत निसर्गाने विविध प्रकारची उधळण केली आहे. जुहू कोळीवाडा ते दांडा, चिंबई, बॅन्ड स्टॅण्ड पर्यंतचा अथांग पसरलेला अरबी समुद्राचा किनारा या परिसराला लाभला आहे. पेशव्यांच्या दप्तरांत वांद्रे बंदराचा उल्लेख आहे. सी-रॉक नांवाचा किल्ला येथे आहे. हे टेहळणीसाठी व सागरी युद्धात शत्रूवर मात करण्यासाठी वांद्रे बंदर हे महत्त्वाचे ठरले होते. खिस्ती धर्माचे प्राबल्य वाढल्यामुळे माऊंटमेरी या खिस्ती धर्माच्या देवतेचे महत्त्व वाढले. चर्चची निर्मिती झाली. माऊंट मेरीची जत्रा आठ दिवसाची श्रद्धेमुळे सुरू झाली. ती आजतागायत आहे. जवळच फादर आग्नेल आश्रम आहे. त्याचे पूर्वीचे जे प्रवेशद्वार होते ते बौद्ध संस्कृतीतील प्रवेशद्वारावरील कमानीचे अस्तित्व राखून होते. बौद्ध धम्मीयांच्या उदासीनतेमुळे वहिवाट नसल्यामुळे ख्रिस्ती धर्माच्या धर्मगुरूनी आपल्या सोयीनुसार प्रवेशद्वाराची निर्मिती केली आहे हे वास्तव आहे.

पाली हील परिसरात इंग्रजांचे छोटे छोटे बंगले होते. देश स्वतंत्र झाल्यावर ते सोडून गेले. त्या जागी श्रीमंत लोक व सिनेकलाकार रहायला आले उदा. दिलीप कुमार, पी. जयराज बाबू भाई पटेल, मास्टर विनायक, बेबी नंदा, नौशाद अली, कमल आमरोही, मीना कुमारी, प्राण, आगा, गोप मारूती, कुमकूम जॉनी वॉकर, कैफी आझमी गुलजार ते आताच आघाडीचे अमीर खानपासून नायक व नायिका रहात आहेत.

हा गर्द वनराजीचा प्रदेश असल्यामुळे यांस युनियन पार्क असे म्हणतात. बाई आवा बाई पेटिट या पारशी समाजातील दानशूर व शैक्षणिक महत्त्व जाणणाऱ्या महिलेच्या नावाने १९१३ साली शाळा व बोर्डिंग सुरू करण्यात आली. येथपासुन ते दांडा (कोळीवाडा) कार्टर रोड येथपर्यंत पृथ्वीने जणू हिरवा शालू परिधान केलेला आहे. अशी हिरवळ संबंध डोंगरावर पसरलेली होती. व त्यावर गोल्फ खेळणारी ग्राऊंड बनविलेली होती. त्यांचा एक क्लब पाली हील हॉटेल समोर होता. येथे घोड्यावरून इंग्रज लोक खेळण्यास येत असत. दांडा स्मशान भूमीजवळून वसईचा किल्ला आजही दिसतो. दुसऱ्या बाजूने सी रॉक हॉटेलपर्यंत दृष्टि पोहचत असे. गोल्फ या खेळामुळे गोल्फ लिंक असे नाव या परिसराला पडले आहे. पश्चिम समुद्र किनाऱ्यावरून सम्राट अशोकाचा पुत्र महिंद्र व कन्या संघमित्रा हे बहिण भाऊ बोधीवृक्षाची फांदी घेऊन श्री लंकेला गेले. तेथे त्यांनी विजय नावाच्या राजास धम्मदीक्षा दिली. त्याने बौद्ध धम्म स्विकारला. समुद्र मार्गे व्यापार सुरू झाला. सोपारा, चौल, कल्याण आदि बंदरे प्रसिद्ध झाली. आजही समुद्र किनारे सुशोभित करण्यात आल्यामुळे वांद्रे उपनगराची शोभा वाढली आहे.

बारापाखाड्यातील काही टेकड्या विकासाच्यामुळे नष्ट झाल्या आहेत. सांताक्रुझ जवळील मिलीटरी कॅम्प येथे असलेली टेकडी तोडण्यात आली. पाली मळा येथील टेकडी तोडून रस्ता बनविण्यात आला. वेगवेगळ्या औषधी वनस्पती या प्रदेशात प्राप्त होत असत. उपयुक्त वृक्षाची लागवड होत असे. वळवाच्या पहिल्या पावसाने मातीला अप्रतिम सुगंध येत असे. ओहोळ, ओढे, तलाव, झरे, विहिरी तुडूंब भरलेले असत. पाणी जमिनीत मुरत असे. वातावरणात आर्द्रता निर्माण झाल्याने गारवा निर्माण होत असे व तो आरोग्याला हितकारक ठरत असे समुद्र किनाऱ्यापासूनच डोंगराळ भागाला सुरूवात झाल्यामुळे खालील विवरणाप्रमाणे विविधता दिसून येई

| | |
|---|---|
| **प्राणी :** | वानर, तरस कोल्हे, खवले, मांजर, नाग, धामण, मन्यार, घोणस, फुरसे, झाडावरील टोळ, खारकुंडी, मुंगूस |
| **वृक्ष :** | पांगारा, शेवरी, करंज, उंबर, वड, पिंपळ, कडूनिंब, भेंडी, तिवर, मेहंदी, कोयनेल. |
| **फळझाडे :** | आंबा, फणस, ताड, नारळ, चिंच, जांभूळ, बोर, जाम, केळी, आवळा, बदाम, खजूर, सुपारी |
| **औषधीयुक्त :** | फडे निवडूंग काटे निवडूंग, अडूळसा, आपटा, गोवर्धन, धतूरा, कडू निर्गुडी, |
| **वनस्पती** | एरंड, टाकळा, तुळस, रूई, शिकेकाई, पित्तफळ, रिठे कोलजान धावटी |
| **पक्षी :** | मोर, घार, गिधाड, वटवाघूळ, घुबड, कावळा, चिमणी, पोपट, बगळे, साळुंकी, कोकिळा, सुतार, तितर, पारवा. |
| **वेली-कल्लारी :** | (वृक्षावर वाढत जाणारी) खाज खुजली, ब्राह्मी फुले-सदाफुली, कुडा, चाफा, कवठी चाफा, पारिजात, सोनचाफा, जाई, जुई, मोगरा, अबोली, रातराणी |
| **खेळ :** | आट्यापाट्या, विटी दांडू, खो-खो, हुतूतू, कसरतीचे खेळ- दांडपट्टा, छडी पट्टा, तलवार, भाला, बरची घाव (खंजिर), चक्री, लाठी, काठी, बनाठी, मल्लखांब |
| **वाद्य :** | सनई, खालुचा बाजा, ढोल, मडके, खंजिरी, डफली, तंबोरा (एकतारी) सतार, मृदुंग, तबला, हार्मोनियम, संबळ, चिपळ्या |
| **दागिने स्त्रियांचे :** | वजरटीक, चिक मोत्यांची माळ, पुतळ्या, कुड्या, पाटल्या, तोडे, येळा, सोनसाखळी, मासोळ्या, बाजूबंद, कमरपट्टा, नागुंत्रे, मंगळसुत्रे. |
| **पुरूष :** | भीकबाळी सलकडी, गोफ, साखळी, कडे |

**ऋतूप्रमाणे :** फुगडी, बस फुगडी, नाच गो घुमा, कोंबडा, किसबाई

**महिलांसाठी दंड :** किस, पिंगा, आगोटा पागोटा, झिम्मा, टिपरी, गोफ

**पुरूषांची नृत्य :** शिमग्यांतील सोंगे, गणपतीचा नाच, डबल पांवडा, सिंगल पांवडा, जलसा, नमन, लावणी, पालखी नाचविणे

**गाणी :** भोंडल्याची गाणी, गौरी गणपतीची गाणी, मर्तिकाची गाणी, बहिण भावाची गाणी, उखाणे, लावणी, ओवी, भजन यातून जुन्या संस्काराची ओळख होई.

१) उदा. जाईन सभेतून , वाजू देईना जोडवं
पित्याच्या नावाला, कुणी लावीना आडव
नाव पित्याच राखून।
किती सांगू तुला नीट घे पदर।
पर पुरूषाची नीट नसेन नजर।

२) वांद्रे भागात पालीनावाच एक होत गाव
पाली दांडा रोडला दिल आंबेडकर रोड नांव

३) सेनानीचा हुकूम सुटला व्हा सावधान
वाजली तुतारी आता युद्ध रंगणार।
जय देव जय देव जय भिम राया



# बारा पाखाड्यांतील विहिरी

बारा पाखाड्यातील बृहन्मुंबई महानगर पालिका नोंदीनुसार प्रभाग क्रमांक निवडणूकीमध्ये बदलत असतात. परंतू सी.टी. सर्व्हे क्रमांक बदलत नसतात. मुख्य रस्ता भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर रोड हा आहे. खार विभागामध्ये रस्त्यांना क्रमांक आहेत उदा. खार पहिला रस्ता आताचे नाव चित्रकार एम.व्ही. धुरंधर मार्ग (सी.डी. मार्ग) २ रा रस्ता, ३ रा रस्ता सांताक्रुझ विभागात काही समाज कार्यकर्त्यांची नावे तर पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर अव्हेन्यू अशी आहेत. वांद्रे विभागात संत झालेल्या लोकांची नावे आहेत. त्या त्या भागातील विहिरीची अधिकृत नोंद महापालिकेंत उपलब्ध आहे. विकासाच्या नावाखाली अनेक विहिरी आज अस्तित्वात नाहीत. पण पूर्वी सार्वजनिक नळ नसल्यामुळे डोंगरमाथ्यावरून टेकड्यांमधून पसरून अंतर्गत साखळी निर्माण झाली होती त्यामुळे शुद्ध नैसर्गिक व गोड पाणी मिळत असल्याने आरोग्य वर्धक होते.

## डॉ. बाबासाहेब आंबेडकर रोडच्या परिसरात ती साखळी खालील प्रमाणे होती.

१) डॉ. बाबासाहेब आंबेडकर पुतळ्यासमोर बाळकृष्ण हाटे यांच्या घरामागे १ विहिर होती.

२) संतपती हनुमान मंदिरातील १ विहिर आताच्या शिवांजली इमारतीमध्ये आहे.

३) हौदाची बावडी (यु.पी. नगर) आहे

४) महेलसिंग कंपाऊंड १ विहिर २ झरे आहे.

५) सिताराम गणू पवार कासेकर यांच्या घराजवळ आता लोकनिर्माण टॉवर १ विहिर बंद करण्यात आली.

६) अस्मिता अपार्टमेंट (भगवान भाजीवाला) लोक निर्माण १ विहिर आहे.

७) कालीदिन भय्याची बावडी ''तक्षशिला'' डॉ. बाबासाहेब आंबेडकर सोसायटी १ विहिर आहे.

८) गोकुळ शेट (गफार) राजमहलजवळ १ विहिर होती आता नाही.

९) शीतल इमारत लक्ष्मी स्टोअर्सजवळ १ विहिर होती आता नाही.

१०) प्रिया बिल्डींगच्या बाजूला ॲलाईड गॅरेजसमोर १ विहिर बंद करण्यात आली.

११) सेन्ट इलायस हायस्कूलजवळ २विहिरी १ मोठा तलाव आता अस्तित्वात नाहीत.

१२) सुदास जाधव यांच्या घराजवळ १ विहिर बंद करण्यात आली.
१३) के. एम. कॉलनी नालंदा बुद्ध विहाराजवळ १ विहिर बंद करण्यात आली.
१४) वैशाली बुद्ध विहाराजवळ १ विहिर. नवी पाली १ विहिर बंद करण्यात आली. (नवी पाली बंद करण्यात आली.)
१५) खार जिमखान्याच्या आतमध्ये १ विहिर.
१६) जिमखान्यासमोर भाजीचा मळा १ विहिर बंद करण्यात आली.
१७) भोले अपार्टमेंटमध्ये १ विहिर
१८) लिंकीग रोड कलर्स शोरूममागे (खटवारा दरबार) आहे. तेथे विहीर आहे.
१९) खार टेलि. एक्सचेंजजवळ यशवंत बिल्डींग १ विहिर बंद आहे.
२०) १७ वा रस्ता अभिलाषा बिल्डींगमध्ये १ विहिर बंद आहे.
२१) १५ वा रस्ता १ विहिर बंद आहे.
२२) चुईम व्हिलेज नवाब बिल्डींग १ विहिर बंद आहे.

## वांद्रे, खार, परिसर, पाली, पेररावाडी

१) कन्ह्याची बावडी (जाधव) यांच्या घराजवळ बंद करण्यात आली.
२) १६ वा रस्ता कोपऱ्यावर १ विहिर बंद करण्यात आली.
३) १४ वा रस्ता भगत बिल्डिंगच्या बाजूला १ विहिर बंद करण्यात आली.
४) कमल कुंजच्या बाजूला १ विहिर बंद करण्यात आली.
५) १६ वा रस्ता (रंगवाल्याचे घर) १ विहिर बंद करण्यात आली.
६) होली फॅमिली १ विहिर बंद करण्यात आली.
७) पाली टेकडी जलाशय (तलाव) १ विहिर आहे.
८) पाली मळा रोड राजेंद्र कुमार चौकासमोर (पितळवाला बंगला आहे.
९) पाली नाका ६ नं. शाळेसमोर बंद करण्यात आली
१०) (दाना जयरामवाडी) ६ नं. शाळेसमोर मोठा तलाव बंद करण्यात आला.
११) कॉनव्हेन्ट रोड वाघेला कंपाऊंड बंद करण्यात आला.
१२) नवरोज बिल्डींग कपांऊड (डिमेलो रोड)
१३) सेन्ट ॲन्ड्रयूज शाळेच्यासमोर कंपाऊंडमध्ये बंद करण्यात आली.
१४) सोमनाथ लेन (पारसी विहीर) आहे.
१५) जॉली हायराईज इमारतीत १ विहिर
१६) धरमज्योत बिल्डींग १ विहिर

१७) सेन्ट ॲनी चर्चच्याखाली धोबी घाटाजवळ १ विहिर आहे.

## राजन शेरली

१) मानाची बावडी सी-गल १ विहिर आहे.
२) चीनाची बावडी बंद करण्यात आली.
३) निक्टरची बावडी बंद करण्यात आली.
४) व्हीक्टरची बावडी बंद करण्यात आली.
५) धोबी घाटाजवळ १ विहिर बंद करण्यात आली.
६) परिचय बिल्डींग (खारीबाव) १ विहिर आहे.
७) ओसियानिक बिल्डींगमध्ये १ विहिर आहे
८) निब्बानाच्या खाली १ विहिर आहे.
९) झवेरीच्या चाळीत मुर्झीलो कंपाऊंड (कॉन्टिनेटल टायर) विहीर आहे.
१०) स्वीट होम (नांदवीडकर रामजीचे घर) बंद करण्यात आली
११) राजन टँक (तलाव) बंद करण्यात आला.

## वांद्रे

१) पंखावाडी १ तलाव अस्तित्वात नाही
२) जरीमरी मंदिर १ तलाव अस्तित्वात नाही
३) वारोडा १ विहिर अस्तित्वात नाही.
४) हिलरोड कॅनरा बँकेसमोर १ विहिर आहे (झाकण बसविले आहे)

## दांडा

१) हनुमान नगरमध्ये १ विहिर आहे
२) शंकराच्या देवळामध्ये १ विहिर आहे
३) राममंदिराच्या मागे १ विहिर आहे

## वाकोला कालिना मस्जीद कोलेरी गाव

२) वाकोला व्हिलेजमध्ये १ विहिर बंद करण्यात आली
३) कालिना मार्केटजवळ १ विहिर बंद करण्यात आली.

## सांताक्रुझ

१) खोतवाडी सांताक्रुझ (भिमवाडा) विहीर बंद करण्यांत आली

# बारा पाखाड्या आणि वांद्रे विभाग

वांद्रे हे उपनगर आताच्या बृहंन्मुंबई महानगरपालिकेच्या ''एच'' पश्चिम विभागाच्या हद्दीत येते. १९५० पूर्वी ते बांद्रा म्युनिसीपालिटी या नावाने ओळखले जात होते. तेव्हा ते साष्टी बेटात व ठाणे जिल्ह्यात पालीमध्ये (षठषटी) सालसेट तालुक्यात येत होते. त्याचे प्राचीनत्व वांद्रे जिमखाना (डिमोंटी पार्क) मध्ये सालसेट जिमखाना नामक फलक जिमखान्याचा पुर्नविकास होई पर्यंत होता. वांद्रे विभागाचे प्रामुख्याने दोन भाग पडतात. पूर्व व पश्चिम वांद्रे स्टेशन इ. स. १८८८ मध्ये बांधण्यात आले. लेडी जमशेटजी मार्गावरील पूल पारसी कुटूंबाने दिलेल्या देणगीतून बांधण्यात आला. वांद्रे स्टेशन ते माऊंटमेरी चर्च पासून वांद्रे पश्चिम भागास सुरूवात होते. ती चिंबई मार्गे पाली हील युनियन पार्क अशा क्षेत्रात येते. वांद्रे स्टेशन जवळ आता असलेल्या वांद्रे बस आगार ''या जागेवर ब्रिटीश कालीन स्लॉटर हाऊस (पशुवधगृह) कत्तलखाना होता. येथे ब्रिटीश कालीन (२ जुन्या चाळी) व चार नव्या चाळी महापालिका कर्मचाऱ्यांना रहाव्यास बांधण्यात आल्या. जुन्या चाळीना अंदाजे १५० वर्षे झाली. ह्या विभागासमोर भोयवाडा नावाची वस्ती तर पूर्वेस नवपाडा नावाची वस्ती होती. तेथे आता नंदी सिनेमा व व्हीना बिना सेंटर आहे. येथील कार्यकर्ते प्रसिद्ध होते. त्यांची प्रसिद्धी बारा पाखाड्यात होती. स्लॉटर हाऊस पशुवधगृह (कत्तलखाना) १९७२ साली मा. श्रीमती कुंदा कदम यांच्या अखत्यारित स्थालांतरित झाला. वांद्रे हे नाव वानर-वांदर-वांद्रे अशा अशा अर्थाने रूढ झाले आहे. हा परिसर डोंगराळ लाल माती व गर्द वनराजी असल्यामुळे घनदाट जंगले होती. त्यामुळे वानर, कोल्हे, तरस, सर्प, नाग, धामण, घोणस, मनेर या भागात खूप असत. वानरांच्या अति वावरामुळे वानर-वांद्रे-बांद्रा असा शब्द प्रयोग अस्तित्वात आला. पोर्तुगीज भाषेत (हें) चांगले बंदर (बोबिंलासाठी प्रसिद्ध) असा अर्थ आहे. कोकण या नावाने मुंबईचा प्राचीन साहित्यात उल्लेख आला आहे. कोकणात जशी फळे जास्त तशीच या परिसरात आमराई जास्त होती. त्यामुळे फळांचा राजा आंबा तो या परिसरात जास्त प्रमाणात होता. तसेच इतर फळे चिंचा, पेरू, केळी, चिकू यांची ही झाडे विपूल प्रमाणावर असल्यामुळे चिंचवाडी, पेरूवाडी, केळी यांच्या खुणा आजही अस्तित्वात आहेत. अथांग पसरलेला समुद्र किनारा जवळच असल्यामुळे समुद्र किनारी रहाणारे (कोलिय) कोळी लोक रहात असल्यामुळे त्या परिसराला कोळीवाडा असे म्हणतात असे मोठे कोळीवाडे चिंबई, दांडा, जुहू परिसरात आहेत. आग्री लोकांची वस्ती या परिसरात आहे पारसी समाजाची वस्ती, आगियारी, पाटकर ब्लॉक (माजी महापौर) एस.आर.पाटकर यांचा बंगला, बँक ऑफ बडोदा जवळ टर्नर रोडवर आहे. तसेच पाठारे प्रभू, सी. के.पी. समाज हा देखील मोठ्या प्रमाणावर खारमध्ये आहे.

हे सारे लोक १५०० वर्षापूर्वी सम्राट अशोकच्या सैन्यात होते. वांद्रे विभागात पाली नावाचे गाव आहे. पाली दांडा रोड (डॉ. बाबासाहेब आंबेडकर रोड) येथे १७ वा रस्ता भारतीय भवन या वसाहतीसमोर व माया महल या इमारतीच्या जागी दौतीची शाई बनविण्याची एक कंपनी होती. कुंपणावर एम्बॉस केलेले बुलडॉग या कुत्र्याचे चित्र होते एक मोठे चिंचेचे झाड होते. ओम साई पॅलेस ही इमारत नव्हती. या चिंचेच्या झाडाला वळसा घालून बस वांद्रे स्टेशनला जात असे.

# बौद्ध स्मशानभूमी खार दांडा (पूर्वेतिहास)

एक लढवय्ये, एकनिष्ठ, स्वाभिमानी आणि स्वामीनिष्ठ अशी एक जात महाराष्ट्राच्या काना-कोपऱ्यात, दऱ्या खोऱ्यात वास्तव्य करीत होती. ती जात म्हणजेच पूर्वाश्रमीचे महार व विद्यमान बौद्ध समाज म्हणून संघटितपणे मानवी जीवनातील सुख, दु:खाशी संघर्ष करून जीवन क्रमण करीत होती. पेशव्यांच्या कारकीर्दीत या जमितीवर अनन्वित अत्याचार, शिरजोरी आणि अमानुष असे अघोरी जोर जुलूम झाले आणि त्याची परिणीती म्हणून या जातीला स्वत:च्या गाव खेड्यातून शहरी आश्रय घ्यावा लागला. महाराष्ट्रातील या पिडित जमातीला मुंबईसारखे शहर हे जीवनातील वरदान असे ठरले आणि आपली लहान मोठी कुटुंबे मुंबई शहरात मिळेल त्या जागेत झोपडी बांधून निवार करीत होती.

ब्रिटीश आमदानीत या मुंबई शहराच्या औद्योगिक विकासाला जलद गती मिळाली. छोट्या मोठ्या कारखान्यात व गोऱ्या साहेबांच्या घरी घरकाम करण्यास या जमातीला नोकऱ्या मिळू लागल्या आपल्या दैनंदिन उदर निर्वाहाच्या यक्ष प्रश्न जेमतेम निपटून ही जमात जीवन गुजार करीत होती.

अशीच एक कोकणी महार जमात वांद्रेखार या परिसरात झावळ्या आणि बाबूच्या झोपड्या बांधून आपापले जीवन कंठीत होती अशा प्रकारच्या झोपड्या वेगवेगळ्या विभागात बारा ठिकाणी विखुरलेल्या होत्या म्हणून या विभागाला बारा पाखाड्या या नावाने संबोधित असत या बारापाखाड्यांतील जनजीवन बाबासाहेबांच्या सामाजिक शैक्षणिक आणि राजकीय चळवळीशी रक्ताने बांधलेले व एकनिष्ठ, नेकीने ओतप्रोत भरलेले एक जीव असे संघटित होते. डॉ. बाबसाहेबांच्या साऱ्या चळवळीची मुहूर्तमेढ याच विभागातून रोवली जात असे. किंबहूना त्यांच्या चळवळीचा बाले किल्लाच हा विभाग होता असे म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही अशी आमची धारणा आहे.

## स्मशानभूमिचे प्रतिष्ठापन

ब्रिटीश आमदानीत सुमारे विसाव्या शतकाच्या सुरूवातीपासून या स्मशान भूमीचे अस्तित्व मान्य करावेच लागेल. आज त्या भूमीत दिवंगत रामजी गो. गायकवाड यांची सन १९१३ सालची समाधी आजही तिच्या अस्तित्वाची साक्ष देत उभी आहे असे खात्रीपूर्वक सांगण्यात येते की, या बारापाखाड्यांतील ज्ञाती बांधवानी स्वत:ला रहाण्यासाठी झोपड्या बांधल्या परंतू निसर्गाच्या नियमाने ओढवणाऱ्या मृत्यू पश्चातल्या मृत देहाची विल्हेवाट योग्य अशा जागेच्या अभावामुळे त्यांचे मृतदेह कुठेतरी समुद्रकिनाऱ्याच्या खाजण झुडूपाच्या आत आडोशाला किंवा गलिच्छ

अशा निर्जन ठिकाणी दफन करून टाकीत असत. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा वर उल्लेख केल्याप्रमाणे चळवळीतून पेटून उठलेली ही जनता स्मशानभूमीच्या जागेसाठी स्थानिक कलेक्टर याना विनवण्या करून कंटाळली होती. त्याची दाद कोणीच घेत नव्हते. १९०५ साली दिवंगत रामजी गेणू गाय कवाड यांच्या मातोश्रींचे निधन झाले. रामजी गाय कवाड हे त्यावेळी कलेक्टर पेरी साहेब यांच्या घरी स्वयंपाकी (बुटलेर) चे काम करीत असत. या घटनेचे निमित्त करून या विभागातील काही समाज सुधारकांनी एकत्र येऊन रामजी गायकवाडाच्या आईचे प्रेत घेऊन कलेक्टर साहेबांच्या घरी गेले आणि त्यांना स्मशान भूमीच्या जागे संबंधीत साकडे घातले. त्यांना सरळ सवाल करण्यात आला की, " आम्ही माणसासारखी माणसे आहोत. या मुंबईत सर्व जाती-जमातीना राहाण्याकरिता जागा आहे. मेल्यानंतर त्यांच्या मृतदेहाची योग्य जागेत विल्हेवाट लावली जाते. मग आम्हाला मानवतेला लाजविणारी वागणूक तुमच्या राजवटीत का नसावी आम्ही हे मावनी प्रेत कुठे दफन करावे ते दाखविण्याची कृपा करावी. या लढाऊ आणि निर्भिड शब्दमाऱ्याने कलेक्टर साहेब स्तिमित झाले आणि गहिवरून त्यांच्या मागून येण्यास सांगितले. प्रेत बँड स्टॅण्डवरून विद्यमान दांड्याच्या स्मशान भूमीपर्यंत आले. घोड्यावरूनच कलेक्टर साहेबांनी हातातील छडीने जागेची निशाणी करून म्हणाले " ही जागा महाराच्या मालकीची म्हणून जाहीर करीत आहे" आणि तेव्हापासून अधिकृतपणे ही स्मशानभूमी "महार स्मशानभूमी" म्हणून आपले अस्तित्व राखून आहे.

## परिवर्तिक स्मशानभूमी

स्मशानभूमीच्या विकासासार्थ या परिसरातील तत्कालिन थोर समाज सुधारकांनी आपले तन-मन व धन समर्पित करून या भूमिला योगदान दिले आहे. समाज संघटनेची एक बांधिलकी या उदात्त विचाराने प्रेरित होऊन कलेक्टर साहेबांनी स्मशानभूमीच्या जागेची सीमा आखून दिल्याबरोबर या समाज धुरीणांनी विभागीय समाज कार्यकर्त्यांना आवाहन करून राखण म्हणून समुद्रातून व समुद्राबाहेर दगड आणून निरपेक्ष भावनेने समाजाची एक अमूल्य वास्तू या अजोड विचाराने प्रेरित होऊन रात्रंदिवस अंग मेहनतीने दगडाचे चौफेर कुंपण घातले. तेच कुंपण त्या पवित्र कार्याला थोर कार्यकर्त्यांच्या कार्याची पोच पावती आपणाला पहावयास मिळाली. इथेच आम्ही धन्य झालो. त्या कार्यकर्त्यांचे आभार मानायला आमच्याजवळ शब्द नाहीत. त्या कार्यकर्त्यांचा उल्लेख करताना अपुऱ्या माहितीमुळे संपूर्ण माहिती देता येत नाही. त्याबद्दल माहितीचा आम्ही खालील प्रमाणे उल्लेख करीत आहोत.

१) रामजी गो. गायकवाड २) महादेव गोठेकर ३) सखाराम भिकू धोत्रे ३) गोविंद संभू आतळेकर ५) धर्मा सोनू जाधव ६) नारायण आसगोलकर ७) चांगदेव नारायण मोहिते ८) ठुणाजी तुकाराम शिर्के ९) नारायण रामजी जाधव १०) मोरेश्वर बी-तांबे १२) रामचंद्र विठ्ठल जाधव (घराडकर) १३) रामचंद्र अर्जून भोसेकर (माजी नगरसेवक) १४) शिवराम गणूजी सावंत १५) दगडू शिवराम सामंत १६) अर्जुन गोविंद जाधव (तुळसकर) १७)

महादेव जी येलवे (आमोणकर) १७) केशव गोविंद्र आडेकर

अशा अनेक थोर समाज कार्यकर्त्यांनी या भूमीला योगदान देऊन स्वत:चे जीवन कृतार्थ करून केले.

१) आमच्या माहितीप्रमाणे या स्मशानभूमीची पहिली समाजमान्य कार्यकारिणी सुमारे १९२० साली कार्यरत होती. त्यानंतर तीन टप्प्यानी कार्यकारिणी बदलत गेली या कार्यकारिणीवर मोरेश्वर बी. तांबे, रामचंद्र विठ्ठल जाधव (घराडकर) आदि कार्यकर्त्यांनी स्मशानभूमीच्या कार्याला गती देऊन तत्कालिन नगरसेवकांच्या सहकार्याने. स्मशान भूमीला तारेचे कुंपण घालून एक छोटीशी धर्मशाळा बांधून घेतली. या त्यांच्या अजोड कार्याबद्दल समाज त्यांचा गौरव करील यात शंका नाही.

२) दुसऱ्या टप्प्यात के.एच.भोणे, एम.जी. आमोणकर, टी.जी. पवार, एस.एस.पवार, आर.जी. गमरे, आर.बी ओव्हळ, आदि सहकाऱ्यांनी आपापल्या कुवतीप्रमाणे या स्मशानभूमीला योगदान दिले आहे. याच कार्यकारिणीच्या काळात तारेच्या कुंपणाचे परिवर्तन पक्क्या, सिमेंटचे कॉक्रीट भितीत करण्यात आले. वरील कार्यास नगरसेवक व महापौर श्री प्रभाकर पै यांचा सिंहाचा वाटा आहे.

## स्मशानभूमीचे नामांतर

प. पू. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी १४ ऑक्टोबर १९५६ रोजी अशोक विजया दशमीदिनी नागपूर मुक्कामी स्वत: बौद्ध धर्माची दीक्षा घेऊन आपल्या तमाम ज्ञाती बांधवांना बौद्ध धम्माची दीक्षा देऊन एक महान धम्मक्रांतीया देशात घडवून आणली त्याची परिणती आपल्या विविध क्षेत्रातील संस्थाच्या नामांतरांत झाली आणि म्हणून पहिल्या टप्प्यांच्या कार्यकारिणीच्या शेवटच्या पर्वात महार स्मशानभूमीचे नामांतर ''बौद्ध स्मशान भूमी'' असे करण्यात आले.

वास्तविक पाहिले असता गेल्या पन्नास वर्षापेक्षा जास्त काळ कार्यरत असलेल्या कार्यकारिणीने स्मशान भूमीच्या जागेसंबंधात कायदेशीर दस्ताऐवज मामलेदार मुंबई उपनगर (साष्टी) विभाग याजकडून त्यांच्या अकलिप्त किंबहूना स्मशानाच्या जागेसंबंधी अभावितपणे विचार न केल्यामुळे सन १९८० च्या दरम्यान स्मशानभूमीच्या जागेची एक वादग्रस्त जमिन म्हणून मुंबई महानगर पालिका वांद्रे विभाग यांनी आपल्या ब्ल्यू प्रिंट नकाशावर बौद्ध स्मशानभूमीचे नाव नष्ट करून तो एक ग्रीन बेल्ट (गुरू-चरण) या नावाने जमिनीची नाव निशाणी बदलून टाकली आणि ही स्मशानभूमी बेवारस आहे असे जाहीर करून टाकले व इशारा फलक स्मशान भूमीवर लावला की,''या स्मशानभूमीचे कोणी वारसदार असतील त्यांनी वांद्रे नगरपालिकेशी योग्य पुराव्यासह लेखी संपर्क साधावा'' असे बजावण्यात आणि सूचना फलक तीन महिने मुदतीचा सप्टेंबर १९८०ते नोव्हेंबर १९८० पर्यंत वारसी कैफियत मिळाली नाही तर वांद्रे नगरपालिका या भूखंडावर आपला ताबा प्रस्थापित करील.

दुसऱ्या टप्प्यातील कार्यकारिणी या घट केला कार्यरत होती. परंतु कार्यकारिणीलाही समाजाकडून प्रोत्साहित करण्याकरिता दाद मिळणे आवश्यक होते तशी दाद कदाचित न मिळाल्यामुळे कार्यकारिणी वैफल्यग्रस्त झाली आणि त्यामुळे त्यांची कार्यगीते मंदावल होती असे वाटते आणि म्हणूनच सदर गंभीर बाबीची दखल ज्या कालावधीत घ्यावयास हवी होती ती घेण्यात आली नाही.

## स्मशानभूमीच्या नव्या हंगामी स्वंभभू कार्यकारिणीचा उगम.

नोव्हेंबर १९८० मध्ये दिवंगत भार्गव घोराजी सावंत यांचे निधन झाले. त्यांच्या अत्ययात्रेला मोठा जनसमुदाय सामील झाला होता. प्रेत दफन झाल्यावर अंत्ययात्रेकरू आपापल्या घरी जाण्यास निघाले. त्याच क्षणी बी.बी. मोहिते, नारायणराव वरघरकर, एच.डी.सावंत, मोरेश्वर बी. तांबे, डी.पी.चाफे आदि मंडळीचे उल्लेख केलेल्या सूचना फलकावर लक्ष गेले असता संपूर्ण फलकाचे वाचन केले गेले आणि ही भूमी दहा दिवसांच्या आत नगरपालिकेच्या घशात जाणार या बातमीनेच या मंडळीना जबर धक्का बसला.

या संबंधात सदर मंडळीने क्षणाचाही विलंब न करता त्याचदिवशी संध्याकाळी एकत्र बसले आणि एका विचाराने या स्मशान भूमीच्या वारसा हक्काची संपूर्ण जबाबदारी स्वत:च्या शिरावर घेतली आणि त्याच बैठकीत एक काम चलावू कार्यकारिणी नियुक्त करण्यात आली ती खालील प्रमाणे

एच.डी. सावंत

एन.जी. वरघरकर (उपकार्याध्यक्ष)

डी.पी.चाफे (सर चिटणीस)

बी.बी. मोहिते (कोषाध्यक्ष)

बी.जी. कांबळे (सदस्य)

## श्री मोरेश्वर बी.तांबे यांचे मार्गदर्शक म्हणून नियुक्ती करण्यात आली.

या कामचलावू कार्यकारिणीने प्रथम सांप्रत कार्यकारिणीशी संपर्क साधून नगरपालिकेने बजावलेल्या नोटीसीसंबंधी सविस्तर चर्चा करून नोटीसबाबत काही उत्तर दायित्व झालेले आहे का? झाले असल्यास त्याची नक्कलप्रत देण्याची व्यवस्था करावी सांप्रत कार्यकारिणीकडून उत्तर नकारात्मक मिळाल्याचे उपयुक्त श्री मती कुंदाताई कदम यांच्या कार्यालयात दाखल झाली आणि बौद्ध स्मशानभूमीचे वारसदार दत्त म्हणून त्यांच्या टेबलावर स्वत:च्या सह्यानिशी निवेदन सादर केले. त्या निवेदनात म्हटले आहेत त्यांचे वारसदार अजून जिवंत आहेत आणि जन्मालाही येणार आहेत. असे निवेदन ठणकावून सांगितल्याबरोबर निवेदनाचा पगडा उपयुक्तांच्या वर्मी बसला आणि हळुवारपणे कुंदाताई कदम यानी कार्यकारिणीशी विचार विनिमय करण्यास

सुरूवात केली. या चर्चेत शब्दाने आम्ही आमचा वारसा हक्क शाबीत केला. त्याला तोड नाही. परंतु महापालिकेने स्व:ताच्या वार्षिक कार्यवृत्तांत स्मशानभूमीची नांवनिशाणी पुसून टाकली आणि त्या ठिकाणी ग्रीन बेल्ट (गुरूचरण) असा जो उल्लेख केला गेला त्या संबधांत विचारले असतां ''तुमच्याकडे ७-१ २ चा उतारा आहे कां ? त्यांच्या या प्रश्नाने आम्ही आवाक् झालो. कारण जमिनीबाबत एक ही दस्ताऐवज आमच्याकडे नव्हता. तरीही आम्ही शाब्दिक हेराफेरी करून ७/१ २ चा उतारा योग्यवेळी सादर केला जाईल असे आश्वासन देऊन त्यांच्या मुख्य प्रश्नाला बगल देण्यात आली. त्यानंतर उपायुक्तांनी साळसूदपणे विचारणा केली की या भूमीची तुम्हा वारसदारांकडून कोणत्याच प्रकारची देखभाल केली जात नाही. त्या भूमीत गुन्हेगार मृतदेह फेकून देतात. बेकायदा दारूच्या भट्ट्या काढल्या जातात. अभिचारासारखे हिडीस प्रकार चालतात, शेळ्या बकऱ्या कापून तेथे खाटिकखाना राजरोस चालतो त्या संबंधीत तुम्ही कार्यकारिणी काय करता? खर पाहिल तर ही वस्तुस्थिती सत्य होती. पैसा अभावी सांप्रत कार्यकारिणी या बाबतीत काहीच करु शकत नव्हती असे जरी असले तरी वारसदार म्हणून आम्ही दक्ष आहोत असे बजावण्यांत आले. बौध्द स्मशानभूमिसमिती - स्मरणिका १९९६

## वाद्र्यांतील जुमा मशिद

वाद्र्यांतील सर्वात जुनी मशिद जुम्मा मशिद ही आहे तिला बडी मशीद असे ही म्हणतात. ही एस . व्ही. रोडवर (स्वामी विवेकानंद रोड) आहे या मशिदीचे वास्तुशास्त्र शिल्प दिल्ली येथील जाम्मा मशीदी प्रमाणे आहे. १९३५ साली या वास्तुचा पाया भरणी समारंभ करण्यात आला. व कामास सुरूवात करण्यात आली. १९४२ साली उद्घाटन झाले. या मशीदीला निव्वळ पांढऱ्या रंगाचा मार्बल वापरण्यात आला आहे संपूर्ण काम ७ वर्षाच्या कालावधीत झाले. येथे ५० वर्षापूर्वी जत्रा भरत असे जरी मरी मंदिरापासून दुकाने लागत असत या मशिदीच्या निर्मितीस फक्त ''बाकर खाटिक जमात'' यांचाच निधी लागला आहे. बक्कर म्हणजे बकरे कापणारे यांच्या व्यतिरिक्त इतर लोकांच्या दानावर किंवा मदतीवर या मशीदीची निर्मिती झाली नाही. त्यांच्या आर्थिक उलाढालीमुळे वाद निर्णयासाठी न्यायालयात गेला - या करिता या समाजाने बॅरिस्टर जीना साहेबांना बोलविले. त्यांनी त्यांचा समझोता करून दिला. आणि त्यांना घटना लिहून दिली. त्यानुसार त्यांची कमिटी तयार झाली. त्या घटनेच्या आधारेच त्यांच्या निवडणूका आणि मुल्ला मौलवींच्या नेमणूका होत असतात.

मशिदीच्या मागच्या बाजूला दोन पीरांचे दर्गे आहेत. एक मौलाना बाबा आणि दुसरे महमद हुसेन बाबा या दोन्ही दर्ग्याना १०० वर्षे पूर्ण झाली.त्यांच्याबद्दल मुस्लीमांत अपार श्रद्धा आहे. २००७ मध्ये एक महोत्सव करण्यात आला.

स्लॉटर हाऊस (कत्तलखाना) वांद्रयांत आल्यामुळे व्यापारी लोक इतर राज्यांतून येऊ लागले. जनावरांना जागा पुरत नव्हती. आताच्या बान्द्रा टॉकीजच्या जागेवर पूर्वी जंगल होते.

तेथे अतिरिक्त जनावरांचा साठा होत असे. आजच्या भाभा हॉस्पिटलच्या जागेवर पूर्वी घोड्यांचा तबेला होता. आताच्या वांद्रे स्टेशनजवळ असलेली मशीद आधी नव्हती, तेथे चर्च होते. स्लॉटर हाऊसमध्ये गर्दी वाढल्याने त्या चर्च मधील मूर्ती कारमेल चर्च येथे नेण्यात आली. शिवा शिव त्यावेळी फार होती. परंतु वांद्रे विभागात बाबा साहेबांची चळवळ फोफावली तेथे जयंती होत असे. मुसलमान लोकांनाही कळू लागले शिवाशिव नष्ट झाली. सहकार्याने वागू लागले जयंतीमध्ये लोक त्यांना प्रमुख पाहूणे म्हणून बोलावू लागले बाबासाहेबांबद्दल त्यांना आदर वाटू लागला व आजतागायत वाद-विवाद केले जात नाही जातीय दंगलीमध्ये देखील आपल्या समाजाला त्रास झाला नाही.

## वांद्रे टाऊन मार्केट

वांद्रे टाऊन मार्केट बझार रोड वांद्रे या बाजाराची स्थापना १९३४ साली झाली त्या वेळेस समुद्राचे पाणी वांद्रे मार्केटपर्यंत येत होते स्लॉटर हाऊस सुरूवातीला क्रॉफर्ड मार्केट परिसरात होते परंतू घारी, गिधाडे हे कापलेल्या जनावरांचे अवयव घेऊन आकाशात उंच उडत असताना ते पडत असत. येणाऱ्या इंग्रज प्रवाशांवर अधिकाऱ्यांवर पडल्यामुळे त्यांचे कपडे घाण होत असत किंवा दुर्गंधीही येत असे. तेव्हा मुंबई ही माहिमपर्यंत होती. वांद्रे हे उपनगरात जंगल, खाडी परिसरामध्ये होते म्हणून त्यांनी स्लॉटर हाऊस स्थांलतरित करण्याचा निर्णय घेतला. त्याप्रमाणे कारवाई होऊन तो उपनगरात जंगल खाडी परिसरात १८८५ साली आणण्यात आला व बांद्रा स्लॉटर हाऊस असे संबोधण्यात येऊ लागले बकरे व गुरे कापणारा विभाग,जनावरांची तपासणी करणारा विभाग, धर्मशाळा, बकऱ्या आत सोडण्याचा विभाग, चक्री,बाजाराचा विशिष्ट विभाग, मीना बाजार, ज्यात मुंडी, पाया, जबान, कलेजी, भेजा याकरिता वेगळा विभाग होता. डिझेलवर चालणारा व हाताने फिरवणारा पंप सदृश्य जनरेटर होता वीज नव्हती. परंतू एका हातपंपावर संबंध कत्तल खान्यामध्ये प्रकाश पडत असे.

वस्ती वाढली मोठमोठ्या इमारती उभ्या राहू लागल्या. विमानतळ झाले स्लॉटर हाऊसमध्ये जनावरांना ठेवण्यास, कामगारांना निवासस्थाने कमी पडू लागली. मुंबईचा विकास होऊ लागला. महापालिका अस्तित्वात आली. पुनरूपी जागेचा प्रश्न निर्माण झाला. वांद्र्यांत जुन्या चाळीना १५० वर्षे झाली आहेत. १ ते ६ नंबरच्या चाळी नंतर बांधण्यात आल्या जनावरे मोठ-मोठी येत असत. काणेकर मोहिते सोनू मास्तरांचे वडील एकतारी भजन मंडळीचे मुख्य होते. रात्रभर भजने, बाबासाहेबांची गीत गात असत. ४ वाजले की महापालिकेत चतुर्थ श्रेणी कर्मचारी असल्याने कामावर जात असत चाळीतील लोकांचे संरक्षण करीत असत येथील स्थानिक कामगारांनाही ही अडचणी सतावू लागल्या. त्यामुळे स्लॉटर हाऊस १९७२ साली देवनारला हलवावा लागला. कामगारांना तेथे वसाहत बांधली आहे. काही कांदिवली येथे राहावयास गेले आहेत.

**NEW TOWN MARKET**

Foundation Stone Was Laid on 30/11/34 Honeble Shah Nawaz Khan

Gulam Murtaza Bhutto Minister for Local Self Govt to the Government of Bombay

President

H. R. Michel

S. K. Mohammadin kadir, bux esq Chairman Standing Committee

Prof I. F. Almeda, B.a.m. Esq chairman Health Committee

Dr. P. Dias

Member of Standing Committee

K.M. Suriya / Francis Coneci

A.V. Misquitta / R.S.Bulsara

J. P. D'mello / P. D. Miranda

Noor Mohammed Haji / Omer Karia / J. H. Pereria

E. B. Gimi, Chief Officer

G. R. K. Ayangav, Municipal Eng.

Contractor Ali Mohammed Jumardi Khan.

वांद्र्यातील हा सर्वांत मोठा बाजार यामध्ये कालिदासाचे दुकान आहे. हे सर्वांत जुने आहे.

वांद्रे विभागात राहणाऱ्या (समुद्रकिनारी) खिस्ती बांधवाच्या घरी घरकाम करणारी मंडळी जरी अशिक्षित असली तरी त्यांचे इंग्रजी अस्सलिखित असे आणि त्यांना शिक्षणाचे महत्त्व कळले. इकडे बाबा साहेबांची चळवळ फोफावत होती. त्याचाही परिणाम समाज जीवनावर होत होता त्यामुळे अनेक लोकांनी आपल्या मुला, मुलींना शिक्षित करण्याचा प्रत्यत्न सुरू केला. त्यांचे परिणाम उत्कृष्ट खेळाडू टेनिसपटू, डॉक्टर, एयर हॉस्टेस, रेल्वे, गिरण्या, कार्यालयामध्ये झाला. वांद्रे विभागातील काही कुटुंबानाही उत्कर्ष व उर्जितावस्था प्राप्त करून घेतली आहे. परंतु दुर्दैवाने त्यांना सामाजिक जाणिवेचा, बांधीलकिचा विसर पडला आहे. हे सत्य अबाधित आहे.

त्याकाळी समाजमनावर हिंदू संस्कृतीचा प्रभाव होता. गुरू करणे व अध्यात्मिक मार्गाकडे वळणे, निर्व्यसनी होणे वारकरी होणे, ग्रंथ पारायण करणे, त्याचा अर्थ निरूपण करणे संबंध रात्री जागून लोकांना परमार्थाकडे वळविणे या कार्यासाठीही बारा पाखाड्याची प्रसिद्धी होती. त्यात भजनी मंडळी आघाडीवर रहात असत.

बाबासाहेबांचे वास्तव्य मुंबईत होते सुरूवातीचे त्यांचे कार्यकर्ते मुंबई, ठाणा, कुलाबा या जिल्ह्यातील होत. त्यांना सन्मान होता.

# वांद्रे विभागातील समता सैनिक दल

मुंबईमध्ये रहाणारी जी कोकणस्थ महार कुटुंबे होती त्यातील बहुसंख्य पलटणीत नसलेली होती. अशी मंडळी रेल्वे, सिगारेट कंपनी (त्या काळात-वांद्र्यात दोन सिगारेट कंपन्या होत्या.) जिमखाना, ब्रिटीशांची घरे (यात बटलर, खानसमा, बाजार आणणारे) शेती, मळे, डुकरे, बदके सांभाळणारे होते. ब्रिटीशांचे घोडे, त्यांच्या पागा (घोडे बांधण्याच्या जागा) आदि कामे करीत असत. तरीही त्यांच्यावर हिंदु, मुस्लिम, खिस्ती लोकांकडून अन्याय अत्याचार होत असत. न्याय मागून मिळत नसे कारण आपला कोणी वालीच नव्हता याकरिता स्वसंरक्षणासाठी त्यानी आखाडे, तालमी, व्यायामशाळा यांची निर्मिती केली. त्यामध्ये बावनडाववाला भाग्या हे वांद्रयातील प्रसिद्ध नाव होते. त्यांचा आखाडा होता. शंकरदादा रोविलकर यांचा आखाडा, पांडूरंग गमरे (मानकर) यांची माता रमाई व्यायामशाळा हनुमान टेकडी येथील बलभीम व्यायाम शाळा सदाशिवदादा (तुळसकर) देऊ दादा खरवतकर रामचंद्र घराडकर, राघो दादा, बुध्या दादा भिक्या दादा आदि निष्णात, दिल्या वचनाला जागणारी, अल्पशिक्षित पण निष्ठावान मंडळी होती. तसेच गोविंद जाधव (तुळसकर) गोविंद संभू आतळेकर, केवनालकर, धर्माजी सोनू जाधव (घाटिवले) सखाराम भिकू धोत्रे (विरसईकर) गोविंद भिकू धोत्रे (विरसईकर) ही मंडळी उपनगरात जाणकार होती. विशेषत: ढुणाजी तुकाराम शिर्के व नारायण भिकू असगोलकर यांना गांधीच्या धोरणामुळे बाबासाहेबांच्या जीवाला फार मोठा धोका हे उमजले होते. म्हणून १९२६ साली आंबेडकर सेवादलाची स्थापना झाली होती बाबा साहेबांचे संरक्षण करणे एवढेच त्यांचे ध्येय्य होते. चार चाळीमध्ये विचारांची ठिणगी पडे. परळमध्ये ज्योत होई व वांद्रयामध्ये त्या ज्योतीची ज्वाळा होऊन महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात प्रकाशमान होई.

या म्हणण्याच्या समर्थनार्थ बाबासाहेबांच्या अनेक सभा वांद्रयात झाल्या होत्या. १९२७ सालातील दोन सभांचा उल्लेख करणे संयुक्तिक ठरेल. पहिली सभा वांद्रे येथील सेन्ट मार्टिन्स क्लबमध्ये झाली. या सभेचे अध्यक्ष होते डॉ. बाबासाहेब आंबेडकर विषय होते दोन ठराव.

१) महाड सत्याग्रहाला सर्वांनी मदत करणे

२) चांगू महाराचे अभिनंदन करणे

दुसरी सभा (पाली दांडा रोड) आताचा डॉ.आंबेडकर रोड (डॉ. आंबेडकर पुतळ्याजवळ नवी पाली येथे)

संपूर्ण वृत्तांत बहिष्कृत भारत पृष्ठ क्र. १५३ व कार्यक्रमाची छापील छायांकित प्रत सवादकर संग्राहलयातून प्राप्त झाली आहे.

**वांद्रे येथील आंबेडकरी बारा पाखाड्यांचा इतिहास**

स्थानिक पुढारी सोनू सजन संदीरकर यांनी १७५ रूपयांची देणगी बाबासाहेबांना दिली वांद्रे विभागातून अनेक गावठाणांतून जाणाऱ्या सत्याग्रहीचे गाडी भाडे, रौप्य पदकांचे पैसे वैयक्तिक देणग्या देण्यात आल्या.

वांद्रे विभागात शेड्युल्ड कास्ट फेडरेशनचे पहिले अध्यक्ष होण्याचा मान ढुणाजी तुकाराम शिर्के यांना मिळाला.

दुसरे अध्यक्ष नारायण भिकू असगोल कर यांना मिळाला.

स्वतंत्र मजूर पक्षाने या दोघांना उमेद वारी दिली. मंजूरीच्या पत्रावर भगवंत सयाजी गायकवाड यांची सही आहे.

१९/२० मार्च १९२७ रोजी महाड येथे परिषद झाली चवदार तळ्याचे पाणी पेटले. सनातन्यांची माथी भडकली, मात्र सत्याग्रहीच्या अंगात बळाचा संचार झाला. बाबासाहेबांवर दगडांचा वर्षाव झाला. बाबासाहेब जखमी अवस्थेत लोकांना शांत करून लागले बाबासाहेबांचे संरक्षण करणारे अनेक लोक जखमी झाले. त्यात गंगाराम घारू कदम (माखजनकर) नांगावाडीतील १५ वा रस्ता येथे रहाणारा तरूण होता. हातात काठी होती. तो आखाड्यातील वीर होता. पण रक्तबंबाळ अवस्थेत बाबासाहेबांचे संरक्षण करीत होता. हे पाहून त्यांच्या एका परिचित गृहस्थाने त्याना म्हटले, ''कायरे गंग्या, हातात काठी असून मार खातोस? आन् षंढासारखा उभा राहतोस? आर आता तरी दाव तुझा डाव''

ताडकन त्या आज्ञाधारक युवकाने उत्तर दिले, ''मेलो तरी बेहतर पण जोपर्यंत बाबांचा हुकूम होत नाही तोपर्यंत काठी चालवणार नाही''

केवढी ही जाज्वल्य निष्ठा आणि अढळ विश्वास धन्य आहे अशा अनुयायांची.

दुसरे उदाहरण बावनडावाला भाग्य यांचे देता येईल. एकदा बाबासाहेब वांद्रयात आले असताना बावनडाववाल्या भाग्याने लाठी काठीचे काही हात बाबासाहेबांना दाखविले व अधांतरी राहून बाबासाहेबांना सलामी दिली. ती ही लंगोटीवर असताना! बाबासाहेबांनी भाग्याला विचारले, ''भाग्या तुझ्या काठीने किती माणसांना मारशील?

भाग्याने उत्तर दिले ''जित परेन मांजी नंदर (नजर) जाल तित परेन'' पण तुमी हुकूम दिला तरच''

१९२७ चा हा गंभीर प्रसंगा अनुभविल्यावर सैन्यातून निवृत्त झालेल्या व नोकरीत असलेल्या सैनिकांनी सैनिकी धर्तीवर ''प्राण यज्ञदल'' नावाची संघटना स्थापन केली. सुभेदार विश्राम गंगाराम संवादकर त्यात अग्रभागी होते. ''आंबेडकर सेवा दल'' व ''प्राण यज्ञ दल'' दोघांचीही काम एकच बाबासाहेबांचे संरक्षण करणे बाबासाहेब शिस्त प्रिय व संघटन प्रिय असल्यामुळे या दोन्ही संघटनातून त्यानी एक तिसरीच संघटना स्थापन केली त्चिे नाव होते ''सोशल इक्वालिटी आर्मी''म्हणजे समता सैनिक दल बाबासाहेबांचा लढाऊ बाणा पूर्वजांचे संस्कार सैनिकी पेशाचे

असल्याने शिस्त आणि अंतिम ध्येय यांना प्राधान्य देण्यात आले.

समता सैनिक दलामध्ये सैन्याप्रमाणे पदे देण्यात आली. सुभेदार सवादकर हे पहिले जी.ओ.सी.झाले. सेक्शन, प्लटून कंपनी, बटालियन, रेजिमेंट या चढत्या क्रमाने बांधणी करण्यात आली. १९५७ पर्यंत एक जी.ओ.सी असायचे. १९५८ साली रिपब्लिकन पक्ष दुभंगला आणि हळू हळू समता सैनिक दल ही दुभंगले ज्या स्वाभिमानी सैनिकानी समतेसाठी प्राणार्पण केले त्यांचे बलिदानही विभागले गेल्यासारखी स्थिती निर्माण झाली.

१९२७ ते १९५६पर्यंत ज्या सैनिकांचे बलिदान झाले होते त्या सैनिकाना ''हुतात्मा'' या नावाने ओळखले जायचे असे एकूण सहा हुतात्मे होते. असे एकूण सहा हुतात्मे होते. त्यांच्या नावाच्या विभागाला डिव्हीजन म्हटले जायचे. अहिरे गांगुर्डे, कांबळे, देवरूखकर व वाघमारे यांच्या नावाच्या डिव्हजन होत्या. हे सहाही वीर आंबेडकरी चळवळीत हुतात्मे झाले होते. त्यांच्या नावाने सैनिकांना स्फुर्ती येत असे आणि अंतिम ध्येयाची जाणीव होत असे.

१) वांद्रे विभागात गांगुर्डे डिव्हिजन होते. त्यांचे जी. ओ. सी ससाळेकर, परेड ऑफिसर घंगाळे होते, शेरली भागात राजन टँक येथे परेड होत असे. कधी कधी अर्जून जाधव नावाचे खार पूर्वेस रहाणारे गृहस्थ परेड घेत असत.

२) प्रो. व्ही. जी. राव शाळेच्या समोरील पटागणात कोकणस्थ कॉलनीत परेड होत असे. सदाशिव रामजी जाधव (तुळसकर) हे परेड घेत असत व लाठी-काठीचे शिक्षण देत असत.

३) जुने पशुवधगृह येथील मैदानात परेड होत असे.

रामीबाई शंकर मोहिते, बायजाबाई बढेकर, नामुबाई गोडावले, गंगूबाई आंबेकर या लाठी काठीत प्रविण असलेल्या महिलाही अग्रेसर असत.

समता सैनिक दलाचा युनिफॉर्म पांढरा शर्ट (जाड कपडा) खाकी पँट, पायात कॅनव्हास ब्राऊन बुट, डोक्यावर निळी कॅप व साडे चार फूट काठी असा असायचा.

पूर्वाश्रमीच्या महाराच्या हातात वर्ण वर्चस्व वाद्यानी ही काठी दिली होती. ती अस्पृश्यतेची द्योतक व गुलामगिरीची प्रतिक होती. ही काठी खुळखुळ्याची होती. ''नेसला मलीन लंगोटी, घोंगडी टाकली पाठी घेतली हातामध्ये काठी करी जोहार दरबारात'' हे महाराचे चित्र जगापुढे उभी करणारी ही काठी होती. ही मापाची काठी होती ही वतनाची काठी होती, ही साक्षीची काठी होती ही महाराच्या महारकीची निशाणी काठी होती वेशीच संरक्षण करणाऱ्या वेसकराची ही काठी होती, गावाचे निरोप पोहचविणाऱ्या निरोप्याची ही काठी होती सरकारी खजिन्याच संरक्षण करणाऱ्या रखवालदाराची ही काठी होती, ढोल बडविणारी ही काठी होती.

या काठीला बाबासाहेबांचा स्पर्श झाला आणि मोठा बदल घडला. या काठीत चेतना आली ही काठी बंधमुक्तेच प्रतिक झाली; आजवर या समाजावर अनिर्बंध, अनियंत्रित, अधिराज्य

ज्यानी केला त्याना कायदा आणि सुव्यवस्था शिकविण्यास ही काठी समर्थ झाली. १९२७ साली महाडच्या परिषदेत टाळ्या वाजविण्याऐवजी हजारो काठ्या एक साथ आकाशाला भिडल्या आणि गगनाला गवसणी घालण्याच सामर्थ्य तिला प्राप्त झालं केवढे मनोहारी आणि विलक्षण दृश्य हे!

ऑफिसरकडे या शिवाय छडी, शिट्टी व खाकी पायपट्टी असायची. खांद्यावरील शर्टात एएअसा बॅच असायची. अधिकाऱ्यांच्या खांद्यावर वळणदार दोरी व प्रत्येक जी ओ.सी.ला टाय असायचा. युनिफॉर्मने सज्ज झालेले सैनिक जेव्हा रस्त्यावर संचलन करीत तेव्हा त्या शिस्तप्रिय कवायतीने अनेक लोक थक्क होत असत.

बाबा साहेबांनी या सैनिकांच्या सांधिक शक्तिला एका सूत्रात ओवले होते. कम्युनिस्ट पक्षाची स्थापना १९२५ साली झाली असली तरी त्यांच्याकडे १९३८ पर्यंत त्यांचे स्वत:चे असे संघटन नव्हते. १९३७ साली बाबासाहेब स्वतंत्र मजूर पक्षाचे नेतृत्व करीत असताना कामगारांनी संप करण्याचा अधिकार नाही असे बिल सरकारने आणले व कायदा केला बाबासाहेबांनी त्याचे वर्णन काळा कायदा असे केले आणि त्याच्या विरोधात ७ नोव्हेंबर १९३८ रोजी मुंबईतील एकूण एक कामगार रस्त्यावर उतरविण्याचे महत्त्वपूर्ण शिस्तबद्ध काम समता सैनिक दलाने केले आहे त्यामुळे समता सैनिक दलाचे नेते म्हणून व्हाईसरायच्या मंत्री मंडळात बाबासाहेबांना कामगार मंत्री म्हणून घेण्यात आले.

समता सैनिक दलासाठी अहर्निश सेवा, त्याग, कष्ट करणाऱ्यामध्ये प्रथम स्मृती येते ती सुभेदार सवादकरांची त्यांना आंबेडकर निष्ठ अनुयायांची साथ मिळाली त्यामध्ये वडवलकर, ग.म. जाधव (मडके बुवा), एम. एम ससाळेकर, बी.आर.माखजनकर, आर.बी. मोरे, दा.सा.संभाजी तुकाराम गायकवाड, सी.एन. मोहिते (गुरूजी) आड्रेकर बाबा, शिवराम जाधव, अर्जून गोपाळ साळवे, सावळाराम ताडीलकर, सखाराम दारोळे, शंकरराव भारूड, शांताराम कोळवणकर, एस.जी. येळवणकर (मास्तर) दादासाहेब पराड, बी.बी. जगताप, जी.एस.जगधने आदिंच्या आठवणीने डोळे पाणावतात.

महाराष्ट्राचे ख्यातनाम कवी पत्रकार, साहित्यीक आचार्य अत्रे यांनी समता सैनिक दल हे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची कवच कुंडले आहेत असे गौरवोद्गार काढले आहेत आता फरक महत्त्वाच्या दिवशीच समता सैनिक दलाचे संचलन पहावयास मिळते. तो गौरवशाली काळपुनरूपी निर्माण व्हावा असे वाटते.

# (राजन शेरली)
# समता सैनिक दल गांगुर्डे डिव्हीजन वांद्रे (प.)

जी.ओ.सी. - एम.एम.ससाळेकर

परेड ऑफिसर - अप्पासाहेब घंगाळे

परेड ऑफिसर - अर्जुन जाधव

**सैनिक**

आयु.गोविंद तानाजी धोत्रे

आयु लक्ष्मण विठ्ठल मोहिते

दि. सोनू गोपाळ घाग

दि. जयराम मोहिते

दि. के.बी. मोहिते

दि. जयराम तानू सावंत

आयु. तुळशीराम रत्नू पवार

दि. रामदास बाळा जाधव

दि. दौलत रत्नाजी पवार

दि. रामा कमलाजी कासारे

आयु. परशुराम लक्ष्मण पवार

दि. रत्न लक्ष्मण पवार

दि. भिवऱ्या सोनू कासारे

दि. शांताराम सुडकाजी कासारे

आयु. हरिश्चंद्र गोविंद मोहिते

दि. रामचंद्र गोपाळ जाधाव

दि. पिठाजी भागुराम येलवे

दि. लक्ष्मण भागुराम येलवे

# पाली गावाच्या बौद्ध काळाशी संबंध

वांद्रे विभागात पाली नावाचे गाव आहे. दुर्लक्षित झालेले काळाच्या ओघात नष्ट झालेले पाली गाव फार पूर्वी येथे बौद्ध संस्कृती होती. हे सांगणारे-दर्शविणारे पाली या नावात भरपूर पुरावे आढळतात. या गावाने अश्म युग, पाषाण युग, लोह युग व ताम्र युगातील परिवर्तन काळ पाहिला आहे.

अश्म युगाशी अत्यंत जवळचा संबंध असलेला पाली टेकडीवर झालेल्या उत्खननाममध्ये स्पष्ट झाला आहे. आज जो प्रदेश मुंबई म्हणून ओळखला जातो त्या प्रदेशाचा इतिहास फार जुना आहे या प्रदेशात मानवाने प्रथम पाऊल टाकले तेव्हा तो अश्म युगात होता. हा शोध लेप्ट कमांडर टॉड यानी लावला. मुंबईची मागची खाडी (बँकबे) भरून काढण्यात आली तेव्हा तेथील अश्मयुगीन माणसाच्या अस्तित्वाचे अवशेष म्हणजे त्यांची दगडी हत्यारे त्यांना मिळाली. हे अवशेष पाली टेकडी येथेही मिळाले आहेत. श्री एच.सी. मलिक व डॉ. एस.डी. सांकलिया यांनी पुन्हा संशोधन केले असता त्यानाही तेथे काही हत्यारे सापडली वरील सर्व हत्यारे इंग्लंडमधील म्युझियममध्ये ठेवण्यात आली आहेत व त्यांची प्रतिकृती ''भाऊ दाजी लाड '' संग्रहालयात ठेवण्यात आली आहेत. पेशव्यांच्या दप्तरात वांद्रे या बंदराचा उल्लेख सापडतो.

पाली याचा अर्थ पंक्ती अथवा ओळ असा ही केलेला आहे. ज्या भाषेत सूत्रे एकमेकात गोवली जातात. किंबहूना सुत्रांच्या ओळी पंक्ति ओवल्या गेल्या आहेत तो असावा. प्रकांड पंडित धर्मानंद कोसंबीच्या मते पालिती-वा-रक्खति बुद्ध-वचनं ती पाली जी भाषा बुद्ध वचनांचे प्रकट पाअड-पालन करते ती पाली भिक्षू जगदीशांच्या मते ''परियाय'' या शब्दाचा अपभ्रंश होऊन ''पलियाय''असा होऊन पाली असा झाला तसेच बुद्ध तत्त्वज्ञान पसरविण्यास शिल्पकला, शिलालेख, गुहालेख, चैत्य, विहार व लेणी कारणीभूत झाली आहेत. ध्यान मार्गाकडे जाणारी प्रेरणा देण्यात जो आनंद होतो त्याची सर कशालाही करता येणार नाही. गिरी कंदराची ओढ साधनेला अनुकूल पार्श्वभूमी लाभते. डोंगर माथ्यावरून वाहत जाणारे पाणी व्यर्थ जाऊ दिलेले नाही स्थापत्य कलेचा उपयोग करून कुंड बांधून उंच टेकडी असो वा नदी असो पाणी शुद्ध राखण्याचे तंत्र त्या काळी विकसित झालेले होते. अशाच तऱ्हेचा मोठा जलाशय पाली टेकडी परिसरात आहे तो महापालिकेच्या ताब्यात असून त्या परिसरातील लोकांना पाणीपूरवठा होत आहे. पाणी साठवून शुद्ध राखण्याच्या तंत्रज्ञानाची बौद्धकालीन कल्पना नाकारता येत नाही. पाली टेकडीवर जुने कौलारू चर्च होते. पायथ्याशी क्रुस होता. दगडाने बांधून काढलेल्या पायऱ्या आजही अस्तित्वात आहेत.

क्रुसजवळ मदर मेरीची एक उभी मूर्ती होती. हे चर्च जुहू येथील लिडो सिनेमाकडून दिसत असे लोक प्रार्थनेस येत असत. फादरचा मृत्यू चर्चमध्ये सर्प दंशाने झाल्यामुळे भितीने ही वास्तू नष्ट झाली. १९५८ साली सेंट ॲनी स्कूल व चर्च बांधण्यात आले. चर्चच्या बांधणीमध्ये शिखरे उंच व निमूळती होत जातात. आतील भाग प्रार्थनास्थळ हे खोलीप्रमाणे असते. पण बुद्ध विहार, स्तूप हे गोलाकार असतात पोर्तुगीजांनी धर्म प्रसार करण्यासाठी विधी निषेध न बाळगता गोलाकार ही ठेवला. प्राचीनत्वाची साक्ष देणारी बुद्ध विहारे नष्ट झाली आहेत.

# पाली टेकडीवर येणारे मार्ग

१) पाली नाका मार्केट जवळून जाणारा रस्ता जलाशयाकडे जातो.
२) इम्पा हाऊस जवळील झिग झॅग रोड
३) पाली पठार रावबहादूर म्यु. शाळेजवळून
४) खारपाली रोड
५) ओम पॅलेस टॉवरच्या मागून
६) क्रिझन्ट इमारतीच्या मागून
७) नर्गिस दत्त रोडने (पूर्वीचे युनिन पार्क नं. १)
८) चुईम व्हिलेजमधून नवकेतन थियेटरच्या बाजूने
९) पाली मार्केटच्या मागील मार्कोपोलोपासून
१०) डिमोंटी पार्ककडून
११) कांत वाडीकडून
१२) रेल्वे कॉलनी कार्टर रोडकडून
१३) कमिशनर ऑफ पोलीस कार्यालयाकडून
१४) रिझवी कॉम्प्लेक्सकडून (येथे पूर्वी भातशेतीचा मळा होता)
१५) मेट्रोपोलेटियन इमारतीमधून
१६) शतरंज हॉटिलकडून
१७) सेंट थॉमस रोड
१८) सेंट सिरील रोड

# बारा पाखाड्यांतील नगरसेवक

## ठुणाजी तुकाराम शिर्के (पोलादी खांब)
## नगरसेवक



दिवंगत ठुणाजी तुकाराम शिर्के यांचा जन्म १८९९ साली मुक्काम; गोरेगाव; तालुका माणगाव; जिल्हा कुलाबा (रायगड) येथे झाला. त्यांच्या घरची परिस्थिती अत्यंत गरीबीची होती. त्यांचे वडील तुकाराम नामदेव शिर्के हे फारच दयाळू आणि परोपकार करणारे गृहस्थ होते. त्यानी गोरेगाव येथे मराठी शाळेत शिकण्यास मुलाचे नाव टाकले. अत्यंत गरीब परिस्थिती असतानासुद्धा ते इंग्रज ६वी पर्यंत शिकले. त्याकाळी मराठी ७ वी पास झाल्यानंतर शाळा मास्तरची नोकरी मिळत होती. परंतू ती न करता नोकरीसाठी ते मुंबईला आले.

मुंबईत वांद्रे उपनगरात आताच्या भाभा हॉस्पिटलमागे सध्याचे (आल्मेडा पार्क) येथे आपल्या समाजाची मोठी वस्ती होती. तेथे गोरेगावचे विठ्ठल सुभाना साळवी यांच्याकडे राहिले. तेथे त्यांना वांद्रे येथे असलेली मोकरोपोलो कंपनीत कामाला लागले. त्या कंपनीत आपल्या समाजाची बरीच मंडळी कामाला होती. त्यावेळी वांद्र्यात होणाऱ्या अत्याचाराची चर्चा व्हायची तसेच डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या चळवळीचीही चर्चा व्हायची त्या चर्चेत ते हिरीरीने भाग घेत असत. समाजावर होणाऱ्या अत्याचाराबद्दल त्यांना चीड यायची समाजाची संघटना करावी असे त्यांनी मनाशी ठरविले. त्याप्रमाणे ते कामाला लागले त्यावेळी वांद्रे विभागात १२ पाखाड्यात होत्या. काही गावे व आसपासची लहान खेडी मिळून तयार झाल्या होत्या. १२ पाखाड्यांची नावे खालील प्रमाणे होती

१) वारूडा २) चिंबई ३) कांतवाडी ४) राजन शेरली ५) च्युईम व्हिलेज ६) नवा मळा ७) पाली गाव ८) आंबेवाडी ९) स्लॉटर हाऊस १०) भीमवाडा ११) नळाचा पाडा १२) मानीपाडा

या मुख्य पाखाड्या व आसपासची बहुसंख्य वस्तीची नावे खालीलप्रमाणे होती

१) भोयवाडा २) नांगावली ३) चिंचवाडी ४) पाली पठार ५) जुनीखार ६) कांत वाडी ७) नवी शेरली

अत्याचाराचा बीमोड करण्याचा चंग त्यांनी बांधला. अत्याचार करणाऱ्यांना सामोपचाराने सांगायचे त्यांनी ऐकले तर ठिक नाही तर त्यांच्या जवळ प्रसंगी भिडायचे आणि हा प्रश्न कायमचा

धसास लावायचा त्यांना आपल्या एकीची व समाजाची दहशत बसली पाहिजे. बारा पाखाड्यात आपली संघटना मजबूत झाली होती. लोकांचा विश्वास बसला होता. लोक एकत्र येऊन प्रसंगी अत्याचाराचा प्रतिकार करीत होते.

वारूडा ह्या ठिकाणी पपाण्या रामा नावाचे एक गृहस्थ रहात होते. त्यांना सरकारने बांद्रा नगरपालिकेत मागासलेल्या वर्गाचा प्रतिनिधी म्हणून नियुक्त केले होते. ते गृहस्थ अशिक्षित होते बांद्रा नगरपालिका चाळीस सदस्यांची होती. तिची हद्द बँडस्टॅण्ड ते जुहू (पश्चिम) आणि पूर्वेच कालीनापर्यंत होती. दर तीन वर्षांनी नगरपालिकेची निवडणूक होत असे. पिपाण्या रामा याला सरकार १ घोंगडी, १ दारूची बाटली वर्षाला देत असे त्यांचे काम फक्त हातवर करणे होते व अंगठा देणे मागासलेल्या वर्गाला दोन जागा होत्या. त्या राखीव होत्या. एफ वार्ड व आय वार्ड असे दोन भाग मतदारसंघाचे होते. १२ पाखाड्याची लोकांची बैठक घेऊन मा. शिर्के यांनी लोकांसमोर या दोन जागासाठी ठराव मांडला. ही निवडणूक आपण आपल्या पक्षाच्या वतीने लढण्याचे ठरविले तेव्हा स्वतंत्र मजूर पक्ष होता. बाबासाहेबांनी स्थापन केलेला पक्ष होता. एफ, वार्डातून ठुणाजी शिर्के व आय वार्डातून नारायण भिकू असगोलकर हे दोन अधिकृत असे उमेदवार ठरले. बाबासाहेबांची मान्यता घेण्यासाठी वांद्रयातील १२ पाखाड्यामधील लोक डॉ. बाबासाहेब यांच्या ''राजगृह'' या बंगल्यावर गेले. बाबासाहेबांनी या सर्वांना येण्याचे कारण विचारले तेव्हा श्री ठुणाजी तुकाराम शिर्के यांनी सर्व लोकांचा निर्णय सांगितला. वांद्रे भागातून आपले दोन उमेदवार आम्ही उभे करू इच्छितो आहोत. बाबासाहेबांनी सर्व ऐकून घेतल्यावर सर्वांना सवाल केला की, निवडणूकीला पैसा, श्रम आणि प्रचार करणे हे काम सोपे नाही. त्यात आपला समाज हा व स्त्रिया अशिक्षित आहेत. त्या फुल्या कश्या मारणार ? त्याना पेन्सिल सुद्धा नीट धरता येत नाही. तुम्ही निवडणूक न लढविणे चांगले हे काम सोपे नाही. बाबासाहेबांच्या या बोलण्यावर निराश न होता ठुणाजी शिर्के यांनी सर्व प्रकारची हमी दिली परंतू बाबासाहेबांनी त्यांना मान्यता दिली नाही तेव्हा सर्व कार्यकर्ते माघारी आले पुन: सर्व वांद्रयातील कार्यकर्त्यांची बैठक झाली ती बैठक फारच कडाक्याची झाली वांद्रयातील कार्यकर्ते जिद्दीला पेटले होते. त्यानी भूमिका घेतली आम्ही निवडणूक लढविणाराच! त्यामुळे बाबासाहेब खवळून उठले व म्हणाले की तुम्ही निवडणूक लढवित आहात पण जर का पडलात तर राजगृहाची पायरी तुम्हाला चढू देणार नाही. त्यावर ठुणाजी शिर्केनीही आम्ही जर पडलो तर राजगृहाची पायरी चढणार नाही. हे जिद्दीचे बोल ऐकल्यानंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर खुश झाले. शिर्के यांना एफ वार्डातून व असगोलकरांना आय वार्डातून निवडणूक लढविण्याची परवानगी देण्यात आली. त्यामुळे सर्व कार्यकर्त्यांमध्ये असंतोष जाऊन आनंद निर्माण झाला. निवडणूकीला एक महिना उरला होता, आपल्या निरक्षर स्त्रियांना व पुरूषांना पाटी घेऊन फुल्या कशा मारावयाच्या ह्याचे शिक्षण सुशिक्षित पुरूषानी दिले. त्यात रामचंद्र अर्जून भोसेकर हे आघाडीवर होते. त्यानी ही सर्व बाजू सांभाळली. सर्व स्त्रियांना व पुरूषांना सात फुल्या कशा मारावयाच्या त्या त्यानी योग्य रितीने दाखविले.

निवडणूकीची प्रचार सभा आयोजित करण्यात आली. ती सभा वांद्रे चिंचवाडी येथील

सर्कसच्या मैदानात (आताचा वाटर फिल्ड रोड व लिंकींग रोड) या जोड रस्त्यावर झाली. या जाहिर सभेला डॉ. बाबासाहेब आंबेडकर आले. त्यांच्यासोबत बॅ. वामनराव पाठारे, प्रो. व्ही. जी. राव साहेब, प्रबोधनकार ठाकरे, मडके बुवा, काशिनाथ सवादकर वगैरे मंडळी हजर होती त्यानी या दोन उमेदवारांना (टी.टी.शिर्के व नारायण भिकू असगोलकर) यांना निवडून देण्याचे आवाहन केले. त्याप्रमाणे वांद्रयातील कार्यकर्ते कमाला लागले. त्यानी अहोरात्र मेहनत करून आपल्या अशिक्षित भगिनीना व बांधवांना फुल्या कशा मारावयाच्या ते शिकविले. वांद्रयात एक प्रकारे चैतन्य आले होते. दिनांक २८/११/१९३८ रोजी निवडणूक झाली. काँग्रेसने खूप अडथळे आणले. तरी आमच्या जनतेने न डगमगता धैर्याने तोंड दिले आणि ठुणाजी शिर्के व नारायण भिकू असगोलकर यांना प्रचंड बहुमताने निवडून आणले. निवडणूकीचा निकाल रात्री ११ वाजता लागला मा. शिर्केयांना प्रचंड मतदान होऊन श्री चव्हाण यांची अनामत रक्कम जप्त झाली. त्यावेळचे मुंबई राज्याचे मुख्यमंत्री बाळासाहेब खेर (बी.जी.खेर) यांनी चव्हाण यांना शिर्केच्या विरोधात उभे केले होते ही बातमी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना बॅरिस्टर वामनराव पाठारे यांनी फोनने कळविली. डॉ. बाबासाहेब आंबेडकर ताबडतोब वांद्रयात आले. ज्या ठिकाणी निकाल लागला तेथेच मोठी विजय सभा झाली. त्या सभेत डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे भाषण झाले. शिर्के आणि आसगोलकरांना शाबासकी दिली आणि इमाने इतबारे काम करण्याचा सल्ला दिला. रात्री १ वाजता सर्व वांद्रयातून विजयी मिरवणूक निघाली. सर्व विभाग आनंदाने बेहोश झाला.बाळासाहेब खेरांनी आपला पराभव मान्य केला. शिर्केना त्यावेळी सांताक्रुझ पूर्व वाकोला ब्रिज ते कलानगरपर्यंतची जागा देऊ केली. परंतू स्वाभिमानी शिर्केनी ती नाकारली. कारण कोणत्याही स्वार्थाला बळी पडणार नाही असे वचन त्यानी बाबासाहेबाना दिले होते. बाबासाहेबांना त्यांच्याबद्दल आदर व स्वाभिमान वाटला. त्यांनी शिर्केना भेटण्यास राजगृहावर बोलावले शिर्के आपल्या भुमिकेवर ठाम रहाणारे आहेत असा विश्वास बाबासाहेबांना वाटला त्यांची खात्री करुन घेतली. त्यामुळे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना एक विश्वासु सहकारी मिळाला. तेव्हापासुन डॉ. बाबासाहेब आंबेडकरांशी त्यांचा घनीष्ट संबंध आला. बाबासाहेबांनी नागपुर या ठीकाणी अधिवेशन घेतले. आणि शेड्युलकास्ट फेटरेशनच त्यांना अध्यक्ष केले त्यांना पोटदुखीचा त्रास होता. त्यामुळे त्यांच्या पोटावर के.इ.एम. हॉस्पीटल (परळ) येथे शस्त्रक्रिया करण्यात आली. ते ठीक होवुन घरी आले. त्यावेळी संयुक्त महाराष्ट्राची चळवळ सुरु होती. १०५ हुतात्मे झाले. बहुसंख्य मंडळी लाठीमार, गोळीबारांत जखमी झाले होती. त्यां वातावरणात डॉक्टरांना त्यांच्या प्रकृतीकडे नीट लक्ष देता आले नाही. त्या मुळे दिनांक २६ जानेवारी १९५६ रोजी सायं. ७.३० वाजतां त्यांचे निधन झाले. त्यांच्या निवास स्थानापासुन अंत्ययात्रा निघाली ती बारापाखाडयांत फिरुन दांडा स्माशानभुमि येथे आली त्यांच्या अंत्ययात्रेला दहा हजाराच्यावर जनसमुदाय होता. त्या मध्ये शे.का.फे.अध्यक्ष , बॅ. पाठारे, समता सैनिक दलाचे जी. ओ. सी. सासळेकर, मा.पी.जी.खेर, एल.एफ.हिंदळेकर जे.जी.भातनकर, आणि बारा पाखाड्यांतील कार्यकर्ते हजर होते. अशा अष्टपैलु, नेतृत्वास वांद्रे विभाग मुकला आहे.

# नारायण भिकु असगोलकर
## द्रष्टा नगरसेवक



डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या निष्ठेबद्दल अत्यंत पात्र असलेल्या व्यक्तीमध्ये ज्यांची गणना केली जाते. अशा महत्वपुर्ण व्यक्तीमध्ये आदरणीय दिवंगत नगरसेवक नारायण भिकु असगोलकर यांचा उल्लेख होतो. रत्नागिरी जिल्ह्यांतील गुहागर तालुक्यांत असलेले असगोली हे त्यांचे जन्मगांव कोकणचा नैसर्गिक समुद्र किनारा व शेजारी कोळी बांधवांची वस्ती. घरची परिस्थीती अत्यंत गरिबीची व बेताची त्यांच्या वडिलांचे नाव होते भिकू म्हादू म्हार. आईचे नाव सखुबाई.त्यांना तीन बहिणी व दोन भाऊ होते. गोपाळ भिकु असगोलकर व धोंडु भिकु असगोलकर बहिणीची नावे लक्ष्मीबाई उर्फ (चंदा) हीचाविवाह भिकाजी गमरे (दाभोळकर) त्यांच्याशी झाला. गोदीबाई हीचा विवाह विठ्ठल पवार (वरविलकर) यांच्याशी झाला. लाडाबाई हीचा विवाह बाबु मोहीते (चिखलकर) यांच्याबरोबर झाला. नारायण भिकु पवार यांचे आडनाव पवार असे होते. त्यांचे आजोबा सैन्यात समशेर बहादुर होते. त्या काळातील मानाच्या तलवारी त्याना ईनाम देण्यात आल्या होत्या. ब्राह्मण मंडळी त्याना वचकून असत. पवार हे आडनांव त्यांना कसे तरीच वाटे. इतरांची नांवे सुटसुटीत होती. त्यामुळे या कुटुंबात त्यांनी स्व:ताचे आडनांव आसगोलकर असे केले. नारायण भिकु आसगोलकर यांचा स्वभाव जीद्दी होता. त्याचे शिक्षण मराठी चौथी पर्यंत झाले होते. क्षुल्लक कारणावरुन वडिलांशी मतभेद झाल्याने त्यांनी मुंबइची वाट धरली.

ते काही काळ कोकणस्थ कॉलनीत सातामकर कांबळे यांच्याकडे राहीले त्यांचे आते भाऊ गंगाराम नागे (पालशेलकर) हे नवी शेरलीत गोपाळ देवजी पवार (चिंचिवलकर) यांच्या झोपडयांत भाडयाने रहात होते ते रंग काम करित असत त्यांच्या ओळखीने आसगोलकरांनी स्वत:चा व्यवसाय सुरु केला.

त्यांच्या शेजारीच शंकर काणेकर हे व्यायामपटू रहात होते त्यांना अनेक पारितोषीके मिळाली होती. शरिर सौष्ठवाची आसगोलकरांना आवड निर्माण झाली. घराणे शमशेर बहादुर असल्याने त्यांना ही दांडपट्टा, छडी पट्टा, बनाठी यांचे ज्ञान होते. शंकर मोहीते काणेकर यांची पत्नी रामीबाई ही त्यावेळची सामाजीक कार्यकर्ती होती.

माननीय आसगोलकर यांना बारापाख्याड्यानी दिलेल्या पाठींब्यामुळे स्वतंत्र मजुर पक्ष या बाबासाहेबांच्या पक्षाकडे अर्ज केला (दिनांक २१/८/३८) होती वांद्रे विभाग, पाली गांव व आसपासची साष्टी बेटातील खेडी यांच्यावतीने १४/८/३८ रोजी बैठकीत त्यांची निवड

करण्यात आली होती. स्वतंत्र मजूर पक्षाचे चिटणीस माननीय भगवंत सयाजी गायकवाड यानी पक्षाने मंजूरी दिल्याचे कळविले व रू. २५/-फक्त पक्षाची फी भरण्यास सांगितले निवडणूकीनंतर झालेल्या कामांचा अहवाल नारायण भिकू आसगोलकर यांनी शनिवार दिनांक २७/४/४० रोजी रात्री १० वाजता न्यू शेरली पाली दांडा रोड येथे स्वतंत्र मजूर पक्षाचे जनरल सेक्रेटरी मे.डी.व्ही. प्रधान साहेब यांच्या अध्यक्षतेखाली सभा भरून सभेच्या कामकाजास सुरूवात झाली. प्रथम बाबासाहेबांच्या फोटोस पुष्पहार अर्पण करण्यात आला. झेंडा वंदन हे गीत मुला-मुलींनी म्हणून दाखविले. अध्यक्षाच्या सुचनेवरून बांद्रा म्युनिसीपालिटीत निवडून दिल्याबद्दल मी आपला सर्वांचा अत्यंत ऋणी आहे. स्वतंत्र मजूर पक्षातर्फे माझी निवड झाली असल्यामुळे त्या स्वतंत्र मजूर पक्षाच्या झेंड्याचे वंदन करणे हे आपले पहिले कर्तव्य आहे. ज्या वेळेस आपल्यातर्फे माझे मित्र शिर्के व मी निवडून आलो त्या वेळेस म्युनिसीपालिटीत इन्डिपेंट व काँग्रेस अशा दोन पार्ट्या होत्या व त्याच्यात समान मेंबर्स असल्यामुळे दोन्ही पार्ट्या आम्हास आपापल्याकडे घेण्यास पाहू लागल्या. आम्ही त्यांना बाबासाहेबांचे नाव सांगितले. तेव्हा दोन्ही पार्ट्यांचे लोक बाबासाहेबांकडे जाऊ लागले.

बाबासाहेबांनी डॉ. डायसच्या बाजूने आम्हांस राहाण्यास सांगितले. ती त्यांची आज्ञा शिरसावध मानून आम्ही डॉ. डायस यांच्या पार्टीत मिसळलो डॉ. डायसची प्रेसिडेंटच्या जागेवर नियुक्ती झाली. माझी आणि शिर्के यांची अनुक्रमे स्टॅंडिंग कमिटीत निवड झाली. डॉ. डायस यानी माझ्या बाजूने पुष्कळ मदत केल्यामुळे मला यश आले. जी कामे मी केली ती बाबासाहेबांच्या कृपेने झाली आहेत. गाढवबाव, नळ, चिंचवाडी, बाळकृष्णाची वाडी, नळ, न्यू शेरली नळ, जुनी शेरली नळ, (राजन पाखाडी) चुना भट्टी, नळ कोली कल्याणजवळ, नळाचा पाडा नळ ८ नळाच्या बाबतीत आम्हांस फार त्रास झाला नाही. पण ९ व्या नळाकरिता म्युनिसीपालिटीची परवानगी होती. आम्ही पुष्कळ प्रयत्न केले. पण निष्फळ ठरले. शेवटी बाबासाहेबांकडे जाऊन त्यांच्याकडून कमिशनरला भेटून व्यवस्था झाली. तेव्हा नळाचा म्हारोडा येथे नळ देण्यात आला.

दोन ठिकाणी पाण्याची टंचाई भासत आहे. ती माझ्या विभागात आहे. परंतू या वर्षी मी स्टॅंडिग कमिटीत नसून मि. शिर्के आहेत. पण नळाची व्यवस्था मी करणार आहे. सांताक्रुझ चुनाभट्टी महारवाड्यात पावसाळी गुडघ्यापर्यंत पाय जातील इतका चिखल होत. असे त्या ठिकाणी डॉ. डायस व मी गेलो तेथील परिस्थिती वाईट आहे. तेथे झोपड्याच्या खोलीपर्यंत पायाला चिखल लागला जाता येईल असा ३ फुट लांबीचा रस्ता करून दिला आहे. तेथे ही पावसाळी चिखल होतो. स्मशानभुमीमध्ये एक शेड २०x३० फूटाचा बांधून घेतला आहे. यासाठी स्टॅंडीग कमिटीत ता. १८/२/३९ ला ठराव लिहून पाठविला तो तारीख ३/३/३९ ला पास झाला तसेच खारला आपल्या कामगारांकरिता दोन चाळी बांधण्यात आल्या व पुढे दोन चाळी बांधण्याचे ठरले आहे. अशा प्रकारे आपली फार सेवा केली आहे. इतके बोलून माझे भाषण संपवितो. त्यानंतर अध्यक्ष मा.डी.व्ही. प्रधान, मि. शिर्के श्रीमती जाधव वगैरे ची भाषणे झाली व बाबासाहेबांच्या हुकूमा प्रमाणे वागण्याचे ठरले.

असगोलकरांनी केलेला महत्त्वपूर्ण पत्र व्यवहार खालीलप्रमाणे आहे.

## पत्र क्र. १

**मेहरबान एज्युकेशन इन्सपेक्टर सो. मुंबई भाग यांचे हुजूरास**

मी खालील सही करणार मागासलेल्या वर्गातर्फे वांद्रे म्युनिसिपल स्कूल बोर्डावर असलेले सभासद खालील गोष्टी आपल्या नजरेस आणून देत आहे. त्याबद्दल योग्य तो न्याय द्याल अशी आशा करतो,

वांद्रे म्युनिसिपल शाळांमध्ये आमच्या मागासलेल्या जातीपैकी शिक्षकांची संख्या अगदी कमी आहे व जेव्हर्नाकुलर फायनलची परिक्षा पास झाले आहेत त्यापैकी बऱ्याच जणांना ५० टक्क्यांपेक्षा कमी मार्क मिळाले असल्यामुळे त्यास शिक्षक नेमले जात नाही. तपासाअंती आपल्याकडे तसा हुकूम असल्यामुळे त्यांना नोकरीवर ठेवता येत नाही असे समजते.

**(व्हर्नाकुलर फायनल)** : ठराविक आमच्या जातीचे लोक व्ह. फा पास होत आहेत हे खरोखरच भाग्य आहे. पण अशा तऱ्हेने त्यांना नोकऱ्या मिळाल्या नाही तर त्यांचे फार नुकसान होऊन त्याचा परिणाम कदाचित कोणी आमच्या वर्गापैकी शिक्षण घेईनासे होईल. असाही होण्याचा संभव आहे शिवाय नोकरीच मिळाली नाही तर कॉलेजलाही जात येत नाही तरी मागासलेल्या जातीतील व्ह. फा. परीक्षा पास झालेल्या इसमांना कमीत-कमी ४० टक्के असणाऱ्यांना नोकरी देण्यास हरकत नाही.

**- ना. भि. असगोलकर**

## पत्र क्र. २

अस्पृश्य वर्गामध्ये पिण्याच्या स्वच्छ पाण्याचे फार हाल होत आहेत. व संडासचीही फार गैरसोय आहे करीता नवीन नळ व संडास असणे फार जरूरीचे आहे. एफ वॉर्ड व आय वार्डात व्यवस्था व्हावी. म्युनिसीपालिटीचे नळ आहेत. त्या नळाखाली पाणी भरण्याचे बासण भांडी ठेवण्याकरिता पाणेरी ४५ फुटाची बांधावी साफसूफ करण्यात यावी. कचरा टाकण्यास टिनाच्या डबा ठेवण्यात यावा पाली दांडा म्हार कॉलनी नजीक म्यु. शाळेत मराठी व इंग्रजी लिहिता वाचता येईल एवढी शिक्षणाची सोय करण्यात यावी आजुबाजूस व म्हार कॉलनीत अत्यंत गरीब लोक रहात असल्यामुळे वांद्रे येथील सर्व गरीब वस्तीत दोन फिरत्या नर्सेस मेडीसीन चेस्ट सह त्यायोगे बाळंतपणा व इतर तऱ्हेच्या दुखण्यास गरिबांस त्यांचा उपयोग होईल. वांद्रे हॉस्पिटल बऱ्याच लोकांना लांब आहे तसेच अशिक्षितपणामुळे बरेच गैरसमज असल्यामुळे बहुजन समाज हॉस्पिटलचा फायदा घेऊ शकत नाही. तसेच पुष्कळवेळा गरोदर स्थितीतसुद्धा मोलमजूरी व इतर त्रासामुळे कधी कधी अकाली बाळंतपण येते तरी फिरत्या नर्सेस असल्या व त्यांचा गरीबांस उपयोग करून घेता येईल.

त्याप्रमाणे नर्सेसची व रात्रीच्या शाळांची सोय बाजार रोड, नौपाडा, गोळीबार, कोलीकल्याण वगैरे ठिकाणी करण्यात यावी.

मेहरबानास जाहिर व्हावे! - **ना. कि.असगोलकर**

## पत्र क्र. ३

**मेहरबान मेडीकल कमिटीचे चेअरमनसो. वांद्रे यांसी २/९/३९**

वांद्रे भाभा हॉस्पिटलच्या कंपाउंडमध्ये भंगी क्वाटर्स आहे तरी त्याला पुढच्या बाजूला वरांडा नसल्याकारणाने भंगी लोकांस पावसाळी व उन्हाळी फारच त्रास होतो. त्याकरिता त्याला ६ फुट रूंदीचा वरांडा शक्य तितक्या लवकर करून देणे व वरांड्याला शाहाबाद स्टोन बसविणे तसेच वरील छपरांना उभे खांब देण्याची मनाई असल्यास वरचेवर भिंतीमध्ये ब्राकीट घालून छपरा तयार करणे म्हणजे त्या गरीब लोकांची गैरसोय होणार नाही. जाहिर व्हावे.

**- ना. भि. असगोलकर**

## पत्र क्र. ५

**मेहरबान चेअरमेन साहेब स्टँडिग कमिटी वांद्रे म्युनिसीपालटी ३०/४/४२**

येत्या अजेंड्यामध्ये माझा खालील ठराव दाखल करून घेण्यासाठी मेहरबानी करावी.

ज्या अर्थी बांद्रे म्युनिसिपल हद्दीतील पाली दांडा रोडवरील महार कॉलनीतील रहिवाश्यांसाठी चालू युद्धाचे परिस्थितीचा विचार करता हवाई हल्ल्यापासून संरक्षण करण्याच्या दृष्टिने काही ही आवश्यक अशी योजना झालेली नाही. त्या अर्थी या म्युनिसीपल स्टँडिग कमिटीपुढे वर लिहिलेल्या हद्दीतील रहिवाश्यांसाठी ट्रँचीस खणून देण्याची म्युनिसीपालीटी व्यवस्था लवकरच करण्यात यावी असा ठराव मी मांडत आहे जाहीर व्हावे.

**- ना. भि. असगोलकर, ३०/४/४२**

## पत्र क्र. ६

मे. चेअरमेन सो. स्कूल बोर्ड यांस पुढील स्कूलबोर्ड सभेपुढे मी खालील ठराव मांडणार आहे. अजेंड्यामध्ये दाखल करून घ्यावे.

या वर्षाकरिता व पुढील प्रत्येक वर्षाकरिता तारीख १४ एप्रिल रोजी डॉ. बी.आर.आंबेडकरांच्या जन्मदिवसानिमित्त सर्व म्युनिसीपल शाळांना रजा देण्यात यावी. ३ मे ते ३० मे चालू वर्षाच्या सुट्टयांच्या यादीमध्ये उन्हाळ्याची रजा रविवार धरून २८ दिवस धरली आहे. तरी सदर रविवार काढून २७ दिवस केल्याने कोणत्याही शाळेची गैरसोय होण्याचा संभव आहे तरी सदर १ दिवस कमी करावा.

**- ना. भि. असगोलकर, १/३/४३**

## पत्र क्र. ७

**मेहरबान हेल्थ कमिटी चेअरमेन सो. वांद्रे म्युनिसीपल ऐसा जे**

येत्या हेल्थ कमिटीच्या मिटिंगमध्ये खालील ठरावावर मी बोलणार आहे. तरी तो ठराव येत्या हेल्थ कमिटीच्या मिटिंगमध्ये अजेंड्यामध्ये दाखल करून घेण्याची मेहरबानी करावी.

१) वांद्रे भागात भोयवाडा येथे राहाणारे गरीब म्हार लोक भागीबाई जानू खेडेकर, तानी म्हादू लोनचेकर (मर्चंडे) धर्मा जानू वोवळे ह्या तिघांवर म्युनिसिपल बोरो ॲक्ट १ ९ ३ कलमा खाली वांद्रे ब्रँच कोर्टात फिर्याद काढून घेण्यात यावी.

२) वांद्रे भागात म्हार लोकांच्या वस्तीत भोयवाडा, नांगावली, गाढवबाव, ह्या ठिकाणी झाड्याला जाताना पुरेसे पत्र्याचे संडास टेंपररी म्युनिसीपालटीकडून बांधण्यात यावे.

३) दांडा हद्दींत चुईम गाव म्हारवाडा येथे गावठाणची जागा आहे त्या ठिकाणी रहात असलेल्या म्हार लोकांना संडासची सोय नाही करिता कायम संडास त्यांना पुरेसे बांधून देण्यात यावेत.

कळावे. **- ना. भि. असगोलकर, २२/६/४०**

अशी अनेक महत्त्वपूर्ण पत्रे असगोलकरांची लिहिलेली लेखकाकडे एकूण २५ प्रकाराची पत्रे आहेत. त्यातील महत्त्वपूर्ण पत्रेच विस्तारभयास्तव व स्थलाभावी दिली आहेत.

वार्धक्यामुळे नारायण भिकु असगोलकर हे आजारी झाले.

त्यांना अर्धांगवायूचा झटका आला. ते आपल्या जन्मगावी गेले. दिनांक १५/२/१९५५ रोजी गेले. त्यांची प्राणज्योत मालवली आणि एका तेजस्वी पर्वाचा अंत झाला. प्रो. व्ही. जी. राव साहेब यांनी त्यांच्या दु:खवट्याची जाहीर सभा दिनांक २७/३/५५ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर रोड येथे घेतली.

# सी. एन. मोहिते गुरूजी
## नगरसेवक



डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे विश्वासू सहकारी दिवंगत चांगदेव नारायण मोहिते (पोयनारकर) उर्फ सी.एन.मोहिते गुरूजी यांचा जन्म १८ मे १८९९ मध्ये एका गरीब कुटुंबात झाला. कोकणातील निसर्गाने उधळण केलेल्या दापोली तालुक्यातील निसर्गरम्य पोयनार हे त्यांचे मूळ गाव वयाच्या १२ व्या वर्षीपर्यंत ते पालगडजवळ गुरे राखण्याचे काम करीत वडिलांनी कोकणातून मुंबईस १९१२ साली आणले व कामाठीपुरा येथील म्युनिसीपल मराठी शाळेत घातले. या शाळेत शिक्षण घेऊन ते व्हॅर्नाकुलूर फायनल परीक्षा प्रथम श्रेणीत पास झाले. त्यांनी म्युनिसीपल शाळा खात्यामध्ये शिक्षकाचा पेशा पत्करला. योग्य ते प्रशिक्षण घेऊन महाविद्यालयीन शिक्षण पूर्ण केले. शिवाय इंग्रजी व हिंदीचेही शिक्षण घेतले. धुळ्याच्या टिचर्स ट्रेनिंग कॉलेजमध्ये डिप्लोमा शिक्षण घेतले व पूर्ण केले. वरळीच्या एका शाळेत मुख्याध्यापक पदी त्यांची नेमणूक झाली. तसेच बाबासाहेबांनी त्यांची शिक्षणाधिकारी म्हणून नेमणूक केली. अस्पृश्य विद्यार्थ्यांनी शिकावे म्हणून त्यांनी परिश्रम केले.

मातोश्री अनुसया हे त्यांच्या पत्नीचे नाव या सुशील, सुविध, सुसंस्कारित अशी सहचारिणी त्याना मिळाली. त्यांची एकूण सहा अपत्ये! दत्ता, कृष्णा, मधूसुदन हे पुत्र मंजुळा, यमुना व प्रतिभा या कन्या दिवंगत सहकार महर्षी वैकुंठलाल मेहता हे मुंबई इलाख्याचे अर्थमंत्री होते. ते बाबासाहेबांचे मित्र होते. १९३५ साली खार पश्चिम येथे के. एम. कॉलनीची स्थापना झाली. या कॉलनीत मोहिते सभासद झाले. त्यांना स्वतंत्र घर मिळाले. आंबेडकर चळवळीतील अन्य धुरीण दिवंगत गोविंदराव आडेकर, सातामकर कांबळे, एन.आर.जाधव (तुळसकर) आदि शिक्षणाचे महत्त्व पटलेली मंडळी खारमध्ये आजही रहात आहेत. सेवानेवृत्तीपर्यंत गुरूजींनी मुख्य शिक्षक सामाजिक, धार्मिक क्षेत्रात जागृतीचे व संघटनेचे कार्य केले.

कोकणातून मुंबईस येऊन शिक्षण घेतल्याने शिक्षक, मुख्य शिक्षक, समाज सेवक होण्याचा मान त्यांना लाभला. बांद्रा म्युनिसीपालिटीमधून ते सभासद व नगरसेवक म्हणून निवडून आले मुंबईत महार सेवा संघाची स्थापना करण्यात आली त्यात त्यांनी भाग घेतला. त्यावेळी समाजात जागृति व उन्नती व्हावी. त्यावेळी संभाजी तुकाराम गायकवाड हे प्रमुख कार्यकर्ते होते. त्यांचे गुरूत्व त्यानी स्विकारले होते. कोकणातील आपल्या बांधवाची उन्नती व्हावी शिक्षणाचा फैलाव व्हावा म्हणून जे नवचैतन्य निर्माण झाले त्यात दिवंगत गायकवाडबाबा यांच्याबरोबर शिवराम गोपाळ जाधव, गोविंद रामजी आडेकर, केशवराव आडेकरांनी भाग घेतला या सर्वांच्या नेतृत्वाखाली काम करण्याची संधी मिळाली.

पददलित समाजाच्या कार्याचा व्याप दिवसे दिवस वाढू लागला म्हणून डॉ. आंबेडकर समता सैनिक दल स्थापण्यात आले. यात त्यांनी महत्त्वपूर्ण योगदान दिले आणि याच दलाचे नामांतर समता सैनिक दलात करण्यात आले मुंबई शहर व उपनगरात निरनिराळ्या उत्सवांना संधी साधून पंचायतीच्या कामाचे सूत्र सुरू केले आणि जागृती व प्रबोधनाद्वारे लोकमत अनुकूल होताच सेवा संघाचे महारज्ञाती पंचायत समिती मुंबई असे नामांतर करण्यात आले. सदर पंचायत म्हणजेच हल्लीची बौद्धजन पंचायत समिती होय.

महार सेवा संघाचे मुख्य चिटणीस व अध्यक्ष म्हणून त्यानी अनेक वर्षे काम केले. १९२७ साली महाड येथे जी कोकण प्रांतीय परिषद भरली होती आणि चवदार तळ्याच्या पाण्याचा सत्याग्रह झाला त्यात मोहिते गुरूजींची कामगिरी उल्लेखनीय होती. ती परिषद यशस्वी होण्यात त्यानी बहुमोल कार्य केले. प्रसिद्धीच्या प्रकाश झोतात न राहता आपले समाज सेवेचे कार्य सतत करीत राहणे हे त्यांचे ध्येय होते. महाड सत्याग्रहानंतर नाशिकच्या काळाराम मंदिराच्या सत्याग्रहासाठी व लढ्यासाठी मुंबईत जी प्रबळ संघटना तयार करण्यात आली त्यात मोहिते गुरूजी प्रमुख होते. १९३६ साली नायगाव, दादर येथे अखिल मुंबई इलाखा परिषद भरली होती. त्यात प्रमुख सहकारी चिटणीस म्हणून मोहिते गुरूजी होते. मोहिते गुरूजींनी योजना आखून परिषद यशस्वी केल्यामुळे धर्मांतराचा निर्णय घेणे उचित ठरले. २५ मे १९४१ साली महार ज्ञाती पंचायत समितीची स्थापना दिवंगत गणपत विठ्ठल कासारे (लाटवणकर बाबा) यांच्या निवासस्थानी करण्यात आली. मात्र कार्यालय चार चाळी येथे होते. या पंचायतीचे मुख्य चिटणीस म्हणून त्यानी १९५० पर्यंत काम केले. पंचायतीच्या कार्यासाठी तन मन धन अर्पण करणारे ते कर्तव्यदक्ष विश्वासपात्र व्यक्तिमत्व होते. १९४५ साली बांद्रा म्युनिसीपालिटीमध्ये निवडून आल्यानंतर त्यांनी स्टँडिंग कमिटीमध्ये वांद्रे विभागात पाली नाक्यापासून दांड्यापर्यंत असणाऱ्या रोडला नाव देण्यामध्ये त्यांचा सिंहाचा वाटा होता.

महाड डॉ. बाबासाहेब आंबेडकर स्मारक समितीच्या मध्यवर्ती कमिटीचे ते सभासद होते. मातोश्री रमाई विद्यार्थी आश्रम दापोली पी.ए.सोसायटीच्या ताब्यात आणण्यात गुरूजीचे योगदान होते. त्यांनी मुंबई प्रदेश रिपब्लिकन पक्षाची निवडणूक लढविली होती त्यानंतर त्यानी भारतीय बौद्ध महासभेच्यावतीने धम्म प्रसार केला ते कोकणस्थ कॉलनीचे आजीव सभासद होते. १९५३ साली डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी मोहिते गुरूजींचे आज पर्यंतचे कार्य लक्षात घेऊन ट्रस्टी या पदावर पिपल्स एज्युकेशन सोसायटी मध्ये म्हणून त्यांची नेमणूक केली. सदर सोसायटी मार्फत मुंबई शहरात १) सिध्दार्थ कॉलेज ऑफ आर्टस अॅन्ड सायन्स, २) सिध्दार्थ कॉलेज ऑफ कांमर्स अॅन्ड इकॉनॉमिक्स,३) सिध्दार्थ कॉलेज ऑफ लॉ.,४) औरंगाबाद येथे मिलींद कॉलेज ऑफ आर्टस अंन्ड सायन्स, कॉमर्स, ५) महाड येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकर कॉलेज ऑफ कॉमर्स अॅन्ड सायन्स चालविली जातात. त्यांचे निधन १३ एप्रिल १९८४ मध्ये झाले व एका तेजस्वी पर्वाचा अंत झाला. श्रावस्ती सांस्कृतिक मंच या संस्थेने खार पश्चिम येथे १९X१३ व्या रस्त्यावर त्यांच्या निवास स्थानाजवळ असलेल्या चौकाला त्यांचे नाव दिले आहे. त्यांच्या पुण्य स्मृतीस श्रावस्ती सांस्कृतिक मंचचे विन्रम अभिवादन!

# रामचंद्र अर्जुन भोसेकर
## नगरसेवक



दिवंगत रामचंद्र अर्जुन भोसेकर यांचा जन्म सातारा जिल्ह्यातील भोसे या गावी ५/१/१९११ रोजी झाला. त्याच्या वडिलांचे नाव अर्जुन महार (भोसले) व आईचे नाव भागीबाई असे होते. महाड तालुक्यातील रामजी जाधव खुटीलकर या कार्यकर्त्याची ती भगिनी होती. रामचंद्र, परशुराम, बयो आणि लीला अशी चार अपत्ये त्यांना होती. त्यांचे प्राथमिक शिक्षण गावी होऊ शकले नाहा. म्हणून त्यांचे वडील मुंबईस आले. ते आंबेवाडी येथे राहू लागले. त्यांच्या घरची परिस्थिती फार गरीबीची होती. त्यांचे वडील सेंट्रल रेल्वेमध्ये काम करीत होते. देहू रोड येथे त्यांची नोकरी होती. शनिवारी-रविवारी ते घरी मुंबईस येत असत. त्यांचे मावसभाऊ धर्माजी सोनू जाधव (घाटिवले) हे म्हार कॉलनीत रहात असत. कालातरांने परशुराम हे एयर इंडियात कामाला लागले. बयो नावाच्या त्यांच्या बहिणीचे लग्न कालिना (कोलेरी व्हिलेज) येथे झाले. लीला नावाच्या बहिणीने लग्न आंबेवाडी येथे झाले.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या चळवळीचे काम नुकतेच दिवंगत ठुणाजी तुकाराम शिर्के यांनी सुरू केले होते. त्यांच्या सान्निध्यात धर्माजी सोनू जाधव (घाटिवले) हे निष्ठावंत कार्यकर्ते काम करू लागले. हे दोघे समविचारी असल्यामुळे त्यांची मैत्री दृढ झाली मुसलमानांच्या अन्याय अत्याचाराला त्यांनी निकराने झुंज दिली. लाठी-काठी चे ज्ञान असल्यामुळे, कमावलेली मजबूत शरीर यष्टी असल्यामुळे अन्यायाचा प्रतिकार करण्याची जिद्द, माय बहिणींच्या अब्रुचे प्राणपणाने संरक्षण केले व म्हाराच्या काठीचा दणका वांद्रे विभागात दाखवून दिला. एके दिवशी धर्माजी सोनू जाधव (घाटिवले) हे ठुणाजी तुकाराम शिर्के यांच्याकडे आले असता त्यांची व भोसेकरांचे वडील अर्जुन यांची गाठ पडली. त्यांनी त्यांची ओळख शिर्के यांच्याशी करून दिली व हे माझे मावसभाऊ आहेत त्यांचा मुलगा रामचंद्र हा हुशार आहे. त्याच्याकडे तुम्ही जरा लक्ष द्या शिक्षणासाठी त्याला मदत करा. परोपकाराच्या भावनेने व मित्रप्रेमाने आनंदित होऊन शिर्के यांनी घाटिवले यांना वचन दिले की मी त्याला योग्य प्रकारचे शिक्षण देईन तसेच इंग्रजीचेही शिक्षण देईन आणि वांद्रयातील सुजाण कार्यकर्ता बनवेन

सामाजिक कार्य करीत असताना शिर्के हे वसाहतीतील मुलांना रात्री शिक्षण देत असत. त्यात तानाजी तांबे (मांडवकर) शंकर सोनू तांबे (सुरळकर) विठ्ठल खैरे (कुंबळेकर) सखाराम तांबे (मांडवकर) वगैरे दहा बारा कार्यकते मुलांना शिकवित असत. त्यात रामचंद्र अर्जुन भोसकर हुशार असल्यामुळे ते सर्वांच्या पुढे असत. समाज प्रबोधनाचे काम आंबेवाडीत चालले होते. त्यामुळे गावात शिस्त होती. सर्वजण मान मरातब ठेवीत होते. भोसेकर हे मराठी ४ थी इयत्ता पास झाले.

शिर्के यांनी त्यांना वांद्रे येथील ए.व्ही.हायस्कूल येथे दाखल केले. ही शाळा बाजार रोड वांद्रे येथे होती. त्यानंतर छबिलदास मुलांची शाळा, आर्यन एज्यूकेशन सोसायटी असा त्यांचा शैक्षणिक प्रवास झाला. वांद्यांच्या शाळेतील प्रिन्सिपल हे शिर्के यांचे चांगले मित्र होते. त्यांनी भोसेकरांना शैक्षणिक चांगली मदत केली. भोसेकरांनी मॅट्रीकच्या वर्गात प्रवेश केला.

बॅरिस्टर पाठारे हे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे चांगले मित्र व सहकारी होते ते आपल्या समाजाच्या पाठिंब्यावर वांद्रे नगरपालिकेत निवडून आले त्यानंतर त्यांनी काँग्रेस पक्षात प्रवेश केला. त्यामुळे वांद्रयातील जनता फारच चिडली होती. त्या जागेवर भोसेकर या तरूण विद्यार्थ्यांची लोकांनी नेमणूक करण्याचा निर्णय घेतला. वांद्रयातील काही आपमतलबी मंडळी श्री महादेव गणपत गोठेकर (जाधव) यांनी पुढाकार घेऊन भोसेकर यांना निवडून आणावयाचे नाही असे ठरविले त्यात बॅरिस्टर पाठारे यांनी जाधव यांना पुढे करून वाईट प्रचार सुरू केला.

त्यात कहर म्हणजे शिर्के यांचे भाऊ पोलीस जमादार यांनी व त्यांच्या पत्नीने तसेच विठ्ठल सुभाना साळवी (गोरेगावकर) यांनी आपला मुलगा सुभान विठ्ठल साळवी यांचे नाव पुढे आणले. ठुणाजी शिर्के यांनी परोपरीने त्यांना विनवणी करून समजावण्याचा प्रयत्न केला. परंतू त्यांनी जराही ऐकले नाही. अर्ज भरण्याची वेळ जवळ आली. परंतू भोसेकर हे विद्यार्थी असल्यामुळे निवडणूकीत उभे राहू शकत नाही. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या आज्ञेप्रमाणे भोसेकरांचा फॉर्म भरण्यात आला. बॅरिस्टर पाठारेना वाटले एक विद्यार्थी माझ्यासमोर काय टिकाव धरणार ? परंतू वांद्रयातील जनता जागृत होती. त्यांनी निवडणूकीच्या दिवशी भोयवाडा, नौपाडा, कसायवाडा, चिंचवाडी वगैरे भागांनी भोसेकरांना प्रचंड बहुमताने निवडून दिले. त्यामुळे बॅ. पाठारे, गोठेकर, सुभान गोरेगावकर, जमादार चांगदेव व शिर्के यांची हार झाली. हीच संधी साधून बॅ. पाठारे यानी भोसेकरांविरूद्ध ठाणे न्यायालयात केस केली. जवळ जवळ सहा महिने ठाण्याच्या कोर्टात केस चालली. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या सल्ल्यामुळे भोसेकर निवडून आले. ते (आर.ए.बी.) या नावाने बॅ. पाठारे यांनी हरकत घेतली. हे भोसेकर नाहीत. खरा भोसेकर कोण आहे ? जजने पाठारेना विचारले मग रामचंद्र अर्जुन भोसेकर हेच खरे उमेदवार म्हणून ठाणे कोर्टाने जाहिर केले. ही सारी युक्ती बाबासाहेब आंबेडकरांची होती. सन १९४२ साली भोसेकर वांद्रे नगरपालिकेचे नगरसेवक झाले. दुसऱ्या बाजूला चांगदेव नारायण मोहिते हे निवडून आले. मध्यंतरीच्या काळात श्री भोसेकर हे वांद्रा नगर पालिकेत जवळ जवळ सहा महिने हजर नव्हते. ते भिवंडी येथे राहावयास गेले होते त्यामुळे त्यांचे नगरसेवक पद जाणार होते. ते फारच बेचैन झाले होते. त्यानी ठुणाजी शिर्के यांना पत्र लिहिले. माझे नगरसेवकपद कसे ही वाचवावे. शिर्के यांनी त्याना अभय दिले. व बांद्रा नगरपालिकेत ठराव मांडून त्यांचे नगरसेवक पद व सभासदत्व टिकवले. पुढील तीन वर्षे नगरपालिकेत सभासद राहिले. १९५० साली मुंबईचा विकास झाला. त्यात नगरपालिका महापालिकेत विलीन झाली त्यामुळे आपल्या चारही उमेदवारांचे नगरसेवकपद आपोआप गेले.

वांद्रे उपनगरात चार नगर सेवक होते. परंतू १९४५ सालापर्यंत शे-का-फेडरेशन मुंबईमध्ये एक ही नगरसेवक येऊ शकला नाही. वांद्रे विभागाचे उदाहरण डोळ्यासमोर ठेवून १९४६

साली मुंबईत चार नगरसेवक निवडून आले तेव्हा शे.का. फेडरेशनचे अध्यक्ष आर. जी. खरात हे वरळी मधून व्ही. वाय. मोहिते (दहिविलकर बुवा) लोव्ह ग्रोव्ह मधून श्री.एस.डी चिपळूणकर, सातरस्ता येथून हिरजी पटेल हे निवडून आले. अशी ही वांद्र्याची परंपरा आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकर दिल्लीहून मुंबईस आले की शिर्केना बोलावित असत. शिर्केबरोबर भोसेकर असायचे. संघटना कशी असावी याचे उदाहरण वांद्रे विभागाचे मुंबईच्या कार्यकर्त्यांना द्यायचे.

## संग्रह-गजानन ठु-शिर्के

दिवंगत भोसेकरांचे चिरंजीव उल्हास रामचंद्र भोसेकर हे माहिम येथील मित्र संगम गृहनिर्माण संस्थेत कुटूंबिया समवेत रहातात. ते बौ.प.स.शाखेचे अनेक सामाजिक संघटनेमध्ये त्यांचा सहभाग आहे भोसले हे नाव भोसेकर या नावात कसे बदलले याचे वर्णन करताना ते म्हणतात.

माझ्या वडिलाना दिवंगत ठुणाजी तुकाराम शिर्के यांनी पुत्रवत प्रेम दिले. दादरच्या छबिलदास हायस्कूलमध्ये असताना त्यांच्या वर्गात सुर्यपूत्र भय्यासाहेब आंबेडकर आणि अन्य काही विद्यार्थी आपल्या समाजाचे होते. एकदा डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी शाळेला भेट दिली. शाळेतील शिक्षकांची धावपळ उडाली. बाबासाहेबांनी वर्गशिक्षक आणि मुख्याध्यापक यांना विश्वासात घेऊॅन त्यांनी भय्यासाहेब यांच्या अभ्यासांची चौकशी केली. भय्यासाहेबांचा अभ्यास चांगला आहे हे पाहून त्यांना समाधान वाटले. त्यानंतर त्यांनी आणखी काही अस्पृश्य असलेल्या विद्यार्थ्यांच्या अभ्यासाची चौकशी केली तेव्हा रामचंद्र अर्जुन भोसेकर हे विद्यार्थी हुशार असलेले कळले आणि ते भय्यासाहेबांचे मित्र असलेले ही कळले आणि बाबासाहेबांनी त्यांची आस्थेने चौकशी केली. त्यांचे नाव विचारले व रजिस्टरही पाहिले.

रामा अर्जुन म्हार (भोसले) असे दिसले बाबासाहेबांनी पालकांना बोलावण्यास सांगितले यांची आई घाबरली. मुलाने काही केले का ? असे त्यांना वाटले. बाबासाहेबांच्या समोर उभे राहाणे म्हणजे केवढे दिव्य ! बाबासाहेबांनी भोसेकरांच्या आईला याचे नाव काय म्हणून विचारले रामा अर्जुन भोसले असं सांगितले. बाबासाहेबांनी रजिस्टर घेतले आणि भोसले हे नाव किंवा इतिहास हा ब्राह्मणांनी रचलेला खोटा इतिहास आहे. आपण लढवय्ये लोक आहेत. त्यामुळे भोसले हे नाव आपल्याला नको आजपासून भोसेकर नांव लावायचे आणि भोसेकर हे नाव प्रचलित झाले. बाबासाहेबांच्या हातून घडलेला बदल आमच्या जीवनातला अविस्मरणीय प्रसंग आहे.

दिवंगत रामचंद्र अर्जुन भोसेकर हे वांद्रया मधील के.एच.भाभा रूग्णालयात महापालिकेच्या सेवेत होते. त्यांनी सामाजिक, धार्मिक, राजकीय कार्याबरोबरच आंबेवाडीत आंबेडकरी चळवळीचे बीजारोपण केले. मुंबईमध्ये प्रत्यक्ष आंबेडकरी चळवळीत त्यांनी भाग घेतला आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा सहवास त्यांना लाभला अनेक गरजू लोकांना त्यानी सहाय्य केले जीवनाच्या अंतापर्यंत समाजसेवा करीत असतानाच दि.१२/११/८५ रोजी त्यांची प्राणज्योत मालवली.

# बारा पाखाड्यातील महत्त्वपूर्ण सभा

वांद्रे येथील सेंट मार्टिन्स क्लबमध्ये तारीख २३/१०/२७ रोजी सकाळी १० वाजता (स्टॅ.टा) महार समाज सेवा संघाच्या विद्यमाने डी. मेक्रोपोलो व दि क्राऊन कंपनीतील कामगार मंडळीची जाहीर सभा लोकाग्रणी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखली भरविण्यात आली होती. महाड सत्याग्रहास सर्वांनी मदत करणे व रा.रा. मांगू महार यांनी देवालय प्रवेश करून आपला माणूसकीचा हक्क लोक निदर्शनास आणला. यांसबद्दल त्यांचे अभिनंदन करणे अशा आशयाचे दोन ठराव मांडण्यात आले. ठरावावर स्पृश्य, अस्पृश्य वर्गातील वक्त्यांची अनुरूप अशी भाषणे होऊन ते सर्वानुमते टाळ्यांच्या प्रचंड गजरात पास करण्यात आले. समारोपादाखल अध्यक्षानी आपल्या अधिकारवाणीने जो उपदेश केला तो ऐकण्यासाठी श्रोतृवर्गात अद्भूत एकाग्रता उत्पन्न झाली होती सत्याग्रह करण्यात अस्पृश्य वर्गाच्या ठायी किती थोरपणा आहे हे विशद करून सांगताना म्हणाले अस्पृश्य वर्ग केवळ आपल्याच कल्याणाकरिता सत्याग्रहासारखे खडतर व्रत करीत नसून अखिल हिंदू संस्कृतीच्या जीवनार्थ ही चळवळ आपण चालविले आहे. तीत भाग घेणे आपल्या प्रत्येकाचे कर्तव्य आहे स्पृश्य व अस्पृश्य वर्गातील लोकांच्या मनोवृत्तीची तुलना करिताना अस्पृश्य म्हणविणारे ब्राह्मण्यग्रस्त लोक किती कुजक्या मनाचे असतात याची छाननी इतक्या उत्तम रितीने केली की सभेस उपस्थित असणाऱ्या ब्राह्मणांना देखील त्यांचे भाषण पटले. नंतर सभेच्या व्यवस्थापकांनी महाड सत्याग्रहास ५० रूपयांची देणगी दिली. सत्याग्रह कमिटीचे सेक्रेटरी श्री शिवतरकर यांनी देणगी देणाऱ्यांचे व संभेस आलेल्या मंडळीचे आभार मानल्यावर सभा बरखास्त झाली.

*संदर्भ : बहिष्कृत भारत पान क्र. १२३(१३)*

**सभा क्र.२**

**बारा पाखाडी, पाली, दांडा रोड वांद्रे येथील मंडळीच्या विद्यमाने जाहिर सभा**

रविवार तारीख ११/१२/२७ रोजी संध्याकाळी ४ वाजता वांद्रे मुक्कामी डॉ. भिमराव आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली महाड सत्याग्रहाच्या मदतीकरिता जाहिर सभा भरली होती. सभेकरिता मंडळींनी शोभिवंत मंडप उभारला होता. वांद्रे व आसपासच्या खेड्यातील मिळून एक हजारावर जनसमुदाय जमला होता. मुंबईहून डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्याबरोबर मेसर्स शिवतरकर, प्रधान, गुप्ते, जाधव, गंगावणे, गायकवाड, खोलवडीकर वगैरे मंडळी गेली होती. शिवाय बहिष्कृत हितकारिणी सभेने नवीन उभारलेले आंबेडकर पथक सभेच्या व्यवस्थेकरिता मुद्दाम सभा चालकानी बोलाविले होते. मुंबईची मंडळी स्टेशनवर उतरल्यावर वांद्रेकरांनी

त्यांच्याकरिता खास रिझर्व्ह करून ठेवलेल्या मोटारीने मंडळी सभा मंडपाकडे गेली तेथे गेल्यावर लागलीच सभेच्या कामकाजास सुरूवात झाली व पुढे लिहिलेला ठराव सभेपुढे मांडण्यात आला. ''आम्ही बारा पाखाडी मुक्काम वांद्रे येथे राहाणारी मंडळी ता.२५ डिसेंबर १९२७ पासून डॉ. आंबेडकर यांच्या नेतृत्वाखाली महाड येथे सुरू होणाऱ्या सत्याग्रहाला १७५/- रू. देणगी देत आहोत. तसेच येथे आलेल्या इतर मंडळीस विनंती करीत आहोत की त्यांनी शक्य तितकी जास्त मदत सत्याग्रहाकरिता करावी या ठरावावर स्थानिक मंडळी पैकी मेसर्स जयगुरू देगांवकर, सखाराम भिकू, काशिराम हवालदार,गोविंद तुळसकर यांची भाषणे झाली. तेथील स्थानिक पुढारी सोनू सजन संदीरकर यांनी भाषण करून १७५ रू. देणगी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या स्वाधीन केली. डॉ.बाबासाहेबांनी आभारपूर्वक देणगीचा स्वीकार करून पुढील प्रमाणे भाषण केले ते म्हणाले, सद्‌गृहस्थ हो आपण देणगी दिल्याबद्दल मी आपला आभारी आहे आज येथे जमलेल्या लोकांनी आपल्या पूर्वजांच्या पराक्रमाचे सिंहावलोकन केले तर आपणाला मान खाली घालावी लागेल. कोकणात दापोली मुक्कामी पूर्वी सुभेदार, जमादार, हवालदार वगैरेचे टोलेजंग वाडे होते. पण त्या वाड्यावर मुसलमान लोकांनी नांगर फिरविला आह. त्या वाड्यांचा तुम्हाला मागमूसही लागणार नाही ही आपली दशा का झाली याचा विचार करा ईस्ट इंडिया कंपनी येथे आली. त्या कंपनीला राज्य स्थापन करण्याकरिता आपल्या लोकांनी मदत केली आणि जो पर्यंत आमचे लोक फलटणीत होते तो पर्यंत आपली भरभराट होती. फलटणीचा दरवाजा बंद होताच आपली स्थिती खालावत गेली. आज आपल्या लोकांना पोलिसात घेत नाहीत व इतर ठिकाणी नोकरी मिळण्याची मारामार पडत आहे. पुण्यात आपल्यापैकी एक ग्रॅज्युअेट झालेला मुलगा आहे. त्याला नोकरी मिळण्याकरिता मी आज दोन वर्षे सरकारांबरोबर झगडत आहे काही वरिष्ठ अधिकारी आहेत ते याच्या आड आहेत. हे मी जाणून आहे महाडला जो आम्ही सत्याग्रह करणार आहोत आणि ज्या करिता तुम्ही ही चंदी देता. हे काम सर्वांचे आहे महाडच्या चवदार तळ्यावर जो सत्याग्रह करावयाचा तो स्पृश्य हिंदू व आपण बरोबरीचे आहोत आपला तो हक्क आहे आणि हा हक्क बजावण्यासाठी सर्वांनी सिद्ध झाले पाहिजे तेथे कोणताही अनिष्ट प्रकार होणार नाही अशी माझी खात्री आहे म्हणून तुम्ही अगदी निर्भय मनाने या सत्याग्रहात भाग घ्यावा अशी माझी इच्छा व विनंती आहे. त्यानंतर बी.बी.वर्कशॉपमधील शिपाई लोकांकडून १० रू मौजे कुभांड ता. खेडच्या मंडळीकडून १० रू. गोविंद भाग्या साकुडकर ५ रू. व इतर किरकोळ २० रू ८ आणि महाडला जाणाऱ्या लोकांचे गाडी भाडे रू.५५/- व पदकाचे १ रू.६ आणे मिळून एकंदर २७६ रू १४ आणे मिळाले. देणगी मिळाल्यावर मेसर्स खोलवडीकर, गंगावणे, गणपत बुवा जाधव, धोंडीराम गायकवाड याची सुश्राव्य भाषणे झाली नंतर रा. शिवतरकर यांनी सत्याग्रहाला जाणाऱ्या लोकांच्या व्यवस्थेबद्दल भाषण केल्यावर आभार व हार तुरे झाल्यावर डॉ. आंबेडकर यांच्या जयजयकारात सभेचे काम संपले.

*संदर्भ : १) बहिष्कृत भारत पृष्ठ क्र. १५३*

*२) सदर कार्यक्रमाची छापील पत्रकाची छायांकित प्रत सुभेदार संवादकर संग्रहलयातून प्राप्त झाली आहे.*

**सभा क्र.३**

तारीख २/१२/२६ रोजी दांडा रोड, नवी पाली बांद्रा येथे सोमवंशी क्षत्रिय मंडळीच्या विद्यमाने जाहिर सभा डॉ. सोलंकी एम.एल.सी यांच्या अध्यक्षतेखाली भरून वतन बिलास व वतन परिषदेस पाठिंबा देण्यात आला.

*संदर्भ : बहिष्कृत भारत-पाक्षिक-शुक्रवार ७/१२/२६*

**सभा क्र.४**

जाहीर दु:ख प्रदर्शन

क्राउन सिगारेट कंपनीतर्फे

कै. सौ. आईसाहेब (रमाबाई आंबेडकर)

अखिल अस्पृश्य समाजाचे सर्वश्रेष्ठ पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या सुशील पत्नी कै.सौ. रमाबाई उर्फ आईसाहेब यांच्या निधनानिमित्त दुखवट्याची जाहीर सभा अस्पृश्य समाजाचे पुढारी मे. सुभेदार सवादकर यांचे अध्यक्षतेखाली रविवार तारीख १६/६/३५ रोजी दिवसा पाली हील बांद्रा शाळा नं. ६ मध्ये भरणार आहे. तरी सर्वत्र बंधू भगिनीनी या दु:खात वाटेकरी होण्याकरिता सभेस अवश्य हजर राहावे. तसेच मे. सिताराम नामदेव शिवतरकर हे ही हजर रहाणार आहेत.

**आपले नम्र**

जाणू रामा म्हागावकर, धोंडूराम चांगू चिखलकर

मास्तर गौऱ्या शिवा तळवटकर, गोविंद धर्मा वागावकर

**व्यवस्थापक**

क्राऊन सिगारेट कंपनी

*संदर्भ : छापील पत्रक-भारत भूषण प्रिटींग प्रेस कामाठीपुरा मुंबई नं. ८ (संवादकर संग्रहलय)*

**सभा क्र.५**

मुंबई इलाखा महार परिषद (जुन्या परंपरा व बहुजन लोक)

तारीख २८ ऑगस्ट १९३७ रोजी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अध्यक्षतेखाली वांद्रे मुंबई येथील म्युनिसीपल हॉलमध्ये अस्पृश्य वर्गाची जंगी जाहिर सभा होऊन खालील ठराव पास झाले.

**ठराव १ ला** मुंबई इलाखा महार परिषदेच्या ठरावाप्रमाणे आपल्या बंधू भगिनींनी हिंदू

धर्माचे सणवार व्रत वैकल्ये वगैरे धार्मिक विधी आणि उपोषण वगैरे धार्मिक आचार पाळू नयेत.

**ठराव २ रा** वांद्रे म्युनिसिपालिटीत अस्पृश्य वर्गासाठी एक राखीव जागा दिल्याबद्दल मे. कलेक्टर साहेबांचे ही सभा आभार मानत असून अस्पृश्य वर्गाच्या लोकसंख्येच्या मानाने एक जागा अपुरी असल्यामुळे अधिक जागा देण्याबद्दल ही सभा मे. कलेक्टर साहेबांना विनंती करीत आहे.

**ठराव ३ रा** स्वतंत्र मजूर पक्षाचे सभासद होण्याबद्दल सर्व जनतेस या सभेची आग्रहाची विनंती आहे.

**ठराव ४ था** श्री संभाजी तुकाराम गायकवाड यांच्या मानपत्रासाठी वांद्रे पंचायतीकडून २५ रूपये देण्यात येत आहेत. तरी इतर ठिकाणच्या पंचायतीनीही या कार्यास सढळ हाताने मदत करण्याची कृपा करावी.

सदर ठरावावर श्री ढुणाजी तुकाराम शिर्के, सखाराम भिकू धोत्रे, अमरसिंग, शंकर लक्ष्मण वडवलकर, धर्मा सोनू जाधव, महादेव गणपत जाधव, चांगदेव नारायण मोहिते, नारायण भिकू असगोलकर वांद्रे स्कूल बोर्ड मेंबर शा. अ. उपश्याम आदि मंडळीची भाषणे झाली.

नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर बोलावयास उभे राहिले. सूचना वजा ते म्हणाले, धर्मांतराबद्दल मुंबई इलाखा महार परिषदेने केलेल्या ठरावाची आठवण देण्याकरिता विशेषता आजची सभा आहे. म्हणून धर्मातराबद्दल कोणास काही शंका विचारावयाच्या असल्यास त्यानी त्या अवश्य विचाराव्यात. शंका विचारावयास कोणीच पुढे न आल्यामुळे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी आपल्या भाषणास सुरूवात केली ते म्हणाले,

**प्रिय भगिनीनो व बंधूनो,**

मी या सभेला येणार नव्हतो. परंतू मला समजले की, येथे जुन्या परंपरा आहेत. त्यांना चिकटून राहाणारे काही लोक आहेत व ते महार परिषदेने पास केलेल्या धर्मांतराबद्दलच्या ठरावाची अंमलबजावणी पूर्णपणे करीत नाहीत तेव्हा अशा लोकांच्या शंका निरसनासाठी मी येथे आलो आहे. माझे मते यापूर्वीच मी अनेक वेळा बोलून दाखविली आहेत.

त्याबद्दल तुमच्या मनात शंका असू नये. १९३५ साली भरलेली मुंबई इलाखा महार परिषद ही महार जातीच्या इतिहासात सुवर्णाक्षरानी लिहून ठेवण्यासारखी झाली आहे ती परिषद अपूर्व, अवाढव्य व पूर्ण प्रतिनिधीक अशी झाली आहे. तेव्हा अशा परिषदेने पास केलेले ठराव वास्तविक सर्व महार जातीने मानावयास पाहिजे व महार जातीतील बहुसंख्याक लोक ते ठराव मानतात ही मात्र महार जातीतील काही लोक थोडे आहेत जे जुन्या परंपरेला धरून आहेत असे माझ्या कानावर आले आहे अशा लोकांना मला असे सांगावेसे वाटते की, अल्पमतवाल्या

लोकांना नेहमी बहुमतवाल्या लोकांप्रमाणेच वागावे लागते. सध्याच्या कौन्सिलचेच उदाहरण घ्या सध्या कौन्सिलमध्ये काँग्रेसचे बहुमत आहे. त्यामुळे ते करतील त्या कायद्याना मान देणे आपणस भागच पडते ''जातीसाठी खावी माती'' अशी म्हण आहे मग जातीने धर्मांतराबद्दल दिलेला निर्णय मानणे आपले कर्तव्य नाही काय?

अनेक कार्यासाठी आपणास जातीकडे जावे लागते. मग जातीने ठराव केला तो मान्य का नसावा? हिंदु धर्माप्रमाणे आपण जे पाळीत होतो ते सर्व धार्मिक विधी सणवार सोडून दिले पाहिजेत हे सोडून देण्याचे कारण आज जे मी सांगणार आहे ते फार निराळे आहे. हिंदू धर्माप्रमाणे जे काही विधी करतात ते धर्माच्याच नव्हे तर नितीच्या दृष्टिने रास्त असतात काय? याचा आपण विचार केला पाहिजे. काही विधीत तर अतिशय बाष्कळपणा भरलेला असतो. उदाहरणार्थ शंकराच्या नावाने अनेक लोक उपास करतात. व शंकराच्या पिंडीची बहुतेक प्रकारे पूजा करतात. परंतू शंकराची पिंडी ही काय वस्तू आहे याचा कोणी विचार केला आहे? ती दुसरी तिसरी काहीही नसून पुरूष-स्त्रीच्या संभोग क्रियेची प्रतिमा आहे अशा बीभत्स प्रतिमेचे गोडवे आपण गावे का? रस्त्यावर श्वानाप्रमाणे जर नर-नारी वाह्यतगिरी करू लागले तर आपण त्यांची फुलाने पूजा करायची की जोड्याने? मग पार्वती शंकर यांच्या त्याच क्रियेच्या प्रतिमेला म्हणजे देवाच्या बीभत्सपणाला आपण पूजावे काय?

गणपतीचासुद्धा तसलाच प्रकार! गणपतीची कथा अशी आहे की एकदा पार्वती स्नान करीत होती. यावेळेस शंकर कोठे तरी दुसरीकडे गेला होता म्हणून पार्वतीचे आपणास कोणापासून उपसर्ग पोहचू नये म्हणून आपल्या अंगावरचा मळ काढून त्याचा रक्षणकर्ता गणपती बनविला. तेव्हा मळातून उत्पन्न झालेल्या अमंगळाला देव कसे मानावयाचे? ईश्वर निष्कलंक, मुर्तिमंत पवित्र असावयास पाहिजे. परंतू हिंदू धर्मातील देव मोठे विचित्र आहेत! म्हणून त्यांची पूजा करू नये अशी माझी प्रामाणिक समजूत आहे.

तिसरी गोष्ट दत्तात्रेयाची. अत्री ऋषीची बायको ही महान पतिव्रता आहे असे ब्रह्मा, विष्णू, महेश या तीन देवांच्या बायकांना नारद सांगत गेला आपल्यापेक्षा कोणी स्त्री अधिक पतिव्रता असावी हे त्यांना पहावेना. तेव्हा या तिन्ही बायकानी आपापल्या नवऱ्याना अनुसयेचे पावित्र्यहरण करण्यास सांगितले व बायकांचे म्हणणे ऐकून हे तिघेही वीर त्या कामास तयार झाले. हे तिघेही जण अनुसयाच्या घरी गेले. तिच्या नवऱ्याला काही कारण सांगून दुसरीकडे पाठविले व आपण अनुसयेच्या सहवासात राहू लागले. या अवस्थेत तीने एका मुलाला जन्म दिला आणि या बालकाचे जनकत्व कोणाकडे हा प्रश्न पडल्यामुळे त्या तिघांवर सारखीच जबाबदारी टाकण्याकरिता त्याला तीन तोंडे लावली व तोच हा दत्तात्र्याचा अवतार! पुष्कळ लोकांचा असा समज झाला आहे की धर्मांतराची लाट आता थंडावली आहे. परंतू तसे नाही हे तुम्ही पक्के लक्षात ठेवा. पुष्कळ हिंदु लोक मला म्हणतात की, तुमच्या धर्मांतराच्या प्रश्नाने आमचे डोळे उघडले आहेत. आम्ही आता सावध झालो आहोत त्यामुळे तुमच्या बाबतीतल्या कर्तव्यात आता

आम्ही चुकणार नाही म्हणून तुम्ही धर्मांताची चळवळ परत घ्या परंतू आतापर्यंत मी जे बोललो त्या कारणासाठीच मला चळवळ परत घ्यायची नाही. तुम्ही साठीच मला चळवळ परत घ्यायची नाही. तुम्ही पूर्ण विचार करा दुसरा धर्म स्विकारायचा तो पूर्ण तावून सुलाखूनच स्विकारला पाहिजे. मला आशा आहे की, महार जातीतील सर्व लोक महार परिषदेने केलेल्या ठरावाप्रमाणे वागतील डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे भाषण झाल्यावर आभार प्रदर्शन हार तुरे, होऊन डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या जय जयकारीत सभा संपली.

**सभा क्र. ६**

निवडणूकीची जाहिर सभा

दिवंगत ठुणाजी तुकाराम शिर्के हे स्वतंत्र मजूर पक्षाच्या तिकिटावर निवडणूकीसाठी एफ् वार्डातून उभे होते आणि नारायण भिकू आसगोलकर हे आय वार्डातून उभे राहिले होते.

२८ ऑक्टोबर १९३८ रोजी निवडणूकीची प्रचार सभा आयोजित करण्यात आली होती सदरहू सभा चिंचवाडीतील सर्कसच्या मैदानात (आताचा वॉटर फिल्ड रोड व लिकिंग रोड) या जोड रस्त्यावर झाली. या जाहीर सभेला डॉ. बाबासाहेब आंबेडकर आले होते. त्यांच्या सोबत बॅ. वामनराव पाठारे; प्रो. व्ही. जी. रावसाहेब प्रबोधनकार ठाकरे, मडकेबुवा, सुभेदार संवादकर वगैरे मंडळी हजर होती.

**सभा क्र. ७**

दिवंगत ठुणाजी तुकाराम शिर्के व नारायण भिअसगोलकर यांनी बाळासाहेब खेर यांच्या उमेदवाराचा पराभव केला त्यांचे डिपॉझिट जप्त झाले व स्वतंत्र मजूर पक्षाचे एफ व आयवार्डातून ठु. तु. शिर्के व ना.भि. आसगोलकर बहुसंख्य मताने निवडून आले. तारीख २८/११/३८ साली निवडणूक वांद्रा येथे झाली. रात्री ११ वाजता निकाल लागला. ही बातमी डॉ. बाबासाहेब आंबेडकराना बॅ. वामनराव पाठारे यानी कळविली. बाबासाहेब ताबडतोब वांद्रे येथे आले. रात्री १ वाजता विजयी मिरवणूक निघाली. संबंध वांद्रे विभागात जल्लोश झाला होता. लोक आनंदाने बेभान झाले होते.

**सभा क्र.८**

वांद्रा येथील कुलाबा जिल्ह्यातील मंडळीच्या वतीने दु:ख प्रदर्शनार्थ जाहीर सभा तारीख ४/२/३९ शनिवार रात्री ८.३० वाजता कै. सुभेदार विश्राम गंगाराम सवादकर व कै. सुभेदार यांचे जावई कै. हिरूजी म्हाळुंगकर यांचे शोचनीय मृत्युबद्दल दुखवट्याची सभावरील मंडळीच्या वतीने ठि. गुलाबवाडी टर्नर रोड, येथे घेण्याचे ठरविले आहे. सभेचे अध्यक्षस्थान श्री शंकर लक्ष्मण वडवलकर हे स्विकारणार आहेत तसेच या प्रसंगी समाजातील कार्यकर्ते, वयोवृद्ध बाबासाहेब संभाजी तुकाराम गायकवाड मा. शांताराम शिवराम शेणालकर, ठा बो. स. डी खांबे

वगैरे सदगृहस्थ हजारणार आहेत तरी सर्व अस्पृश्य बंधू भगिनीनी वेळेवर हजर राहाण्याची कृपा करावी.

**आपले नम्र**

श्री ठुणाजी तुकाराम शिर्के, दशरथ देऊ वागावकर, सिरविलकर चिंगू विठ्ठल चांढीवकर

विठोबा सुभानजी गोरेगावकर, सोनू हरी नातेकर, झालाजी पांडुरंग नागावकर, शंकर बाळा नागावकर, महादेव गणपत गोठेकर

भारत भूषण प्रिटिंग प्रेस मुंबई दादर

सुभेदार सवादकर संग्राहलय

**सभा क्र. ९**

स्थळ-कोकणस्थ कॉलनी खार मुंबई कोकणस्थ महार को. ऑ. हौ. सोसायटी, खार मुंबई तर्फे श्री चांगदेव नारायण मोहिते, गणपत विठ्ठल कासारे आणि श्रीमती मुक्ताबाई दगडू सातामकर या तिघानी खार येथे नवीन टुमदार घरे बांधली त्या आनंदोत्सवा प्रित्यर्थ त्यांनी रविवार तारीख २२ सप्टेंबर १९४० रोजी ४ वाजता आपल्या घरी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांना थाटाची टी पार्टी दिली. प्रथम मोहिते यांनी स्वगृही त्यांना पुष्पहार अर्पण केला. नंतर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या समवेत सर्व पाहुणे मंडळीचा ग्रुप फोटो घेण्यात आला. फोटो नंतर सर्वांना थाटाची गार्डन पार्टी देण्यात आली. नवीन तीन घरे, कॉलनी तर्फे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना पुष्पहार अर्पण करण्यात आल्यानंतर मोहिते मास्तर यांनी बाबासाहेबांचे आणि आलेल्या पाहुणे मंडळी तर्फे समयोचित शब्दात आभार मानले. पाहुणे मंडळी तर्फे सुरबा टिपणीस यांनी यजमानाचे आभार मानले. शेवटी डॉ. बाबासाहेब आंबेडकर बोलावयास उभे राहिले.

''मला तुमची घर पाहून फार आनंद होत आहे. तुम्ही हे धाडस केल्याबद्दल मला अभिमान वाटतो. त्याबद्दल मी तुमचे अभिनंदन करतो. हे तुमचे सुख पुत्र पौत्रापर्यंत कायम टिकेल असा प्रयत्न झाला पाहिजे घराचे हप्ते व्यवस्थित देऊन संसार सुखाचा करा. तद नंतर त्यांनी दापोली कॅम्प येथील सेवानिवृत्त सुभेदाराचे वैभव आणि जीवनक्रम सांगितला त्यानंतर त्यांच्या मुलाबाळांची झालेली दुर्दशावर्णन केली. बाप सुभेदार व मुलगा झाडूवाला असे अत्यंत दुर्देव्य होय. तेव्हा तुम्ही सर्वांनी दुरदृष्टिने आणि काटकसरीने वागून तुमचे हे वैभव भावी पिढीने टिकविले पाहिजे. ज्याना शक्य असेल त्यानी अशा तऱ्हेची घरे जरूर बांधावी आणि आपला संसार सुखाचा करावा. तुमच्या शेजारी झोपड्यात जीवन कंठणाऱ्या आपल्या गरीब भाऊबंदाशी गुण्या गोविंदाने वागा त्यांच्यासाठी चांगली घरे बांधून देण्याविषयी मी सरकार व बांद्रा म्युनिसीपालिटीकडे प्रयत्न चालविला आहे.

शेवटी यजमानांचे कार्याबद्दल समाधान व्यक्त करून त्यानी आपले भाषण संपविणे. सदरहू प्रसंगी प्रो. व्ही. जी रावसाहेब बॅ.एस.माने मे.कमलाकांत चित्रे, भाई चित्रे, सुरेन्द्रनाथ टिपणीस,

इझीकेल , जगन्नाथ जी. भातणकर, के.व्ही. सवादकर, टी.टी शिर्के, एन. बी. असगोलकर, एस.एल.वडवलकर, संभाजी तुकाराम गायकवाड, बी. बी उनवरकर वगैरे मंडळी हजर होती.

*संदर्भ :*

*बहिष्कृत भारत.*

आणि बाबासाहेब कडाडले

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे सुपूत्र दिवंगत भय्यासाहेब आंबेडकर व पुतणे मुकूंदराव आंबेडकर यांच्याकरिता कोकणस्थ को. ऑ. हौ. सोसायटीने निवासस्थाने बांधली सदरहू निवासस्थाने खार पश्चिम येथे १९ व्या रस्त्यावर आहेत. सी.एन. मोहिते गुरूजींच्या निवांसस्थानासमोर अशोक भवन नावांची इमारत आहे १९५५ मध्ये ते टुमदार कौलारू घर होते. त्याच्यापुढे आताचा जॉली भवन ही इमारत आहे येथे भैय्यासाहेब आंबेडकर यांचे निवासस्थान आहे.

या निवासस्थानांच्या उद्‌घाटन समारंभास डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या समवेत आपल्या राखाडी रंगाच्या मोटारीतून आले. त्यांनी शेखानी परिधान केली होती. हातात काठी होती. कोकणस्थ सोसायटीचे कार्यकर्ते मोरेश्वर, बी. तांबे, सी.एन. मोहिते गुरूजी, एन.आर.जाधव आदि उपस्थित होते. बाबासाहेबांनी ही निवासस्थाने पाहिली ते रागाने लालबुंद झाले आणि कडाडले ''कायरे माझ्या मुलांना ही घरे बांधलीत की म्हशीचे गोठे ? आणि आपल्या गाडीत बसून निघून गेले. कार्यकर्ते गोंधळून गेले बाबासाहेबांना समजावणार कोण ?

अशोक भवन या निवासस्थानात मुकूंद राव रहात होते. त्यांना विद्या, अशोक, दिलीप व सुजाता अशी चार अपत्य आहेत.

सुर्यपूत्र भय्यासाहेब आंबेडकरांना प्रकाश उर्फ (बॉबी) रमा उर्फ (बेबी) आनंदराज व भिमराव अशी चार अपत्ये आहेत.

सगळ्यांचे बालपण, शालेय जीवन आणि सामाजिक, राजकीय, वक्तृत्व कर्तृत्व, नेतृत्व खार पश्चिम मुंबई येथील १९ व्या रस्त्यावर सुरू झाले आहे.

# बारा पाखाड्यातील स्त्री पुरूषांनी ऐकलेले बाबासाहेबांचे भाषण

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी मनुने स्त्रियांविषयी काय म्हटले आहे शूद्राविषयी काय म्हटले आहे आणि मनुस्मृति दहना नंतरचे येथे स्त्रियांसमोर केलेले भाषण यांनी अमूलाग्र अशी क्रांती घडविली आहे. या दोन्ही कार्यक्रमामध्ये बारा पाखाड्यातील स्त्री पुरूषांनी प्रमुख उपस्थितीने योगदान दिले आहे.

## मनुने शुद्रावर लादलेले नियम

१) शुद्राने ब्राह्मणादि उच्च वर्णीयांना अश्लील शब्दांनी दुखावल्यास त्याचा जिव्हाछेद करावा

२) शुद्राने ब्राह्मणाच्या नामोच्यराने जातीपूर्वक निर्देश करून अश्लील शब्द उच्चारल्यास अपराध समजून त्याच्या तोंडात तापवून लाल केलेला दहा बोटे लांबीचा खिळा घालावा.

३) शूद्राने उद्दामपणे शिवीगाळ करू लागल्यास ब्राह्मणाला उपदेश करू लागल्यास राजाने त्याच्या तोंडात व कानात तप्त तेल ओतावे.

४) शूद्राने हातपाय इत्यादि अवयवांनी वरिष्ठ जातीस ताडन केले तर त्यांचे ते अवयव कापून टाकावेत.

५) शूद्राने ब्राह्मणदिकांवर हात किंवा काठी उगारल्यास त्याचा तो हात कलम करून टाकावा. तो रागाने पाय आपटून प्रहार करीत असल्यास तो पाय छाटून टाकावा.

६) शूद्राने ब्राह्मणा उच्च वर्णियासोबत एका आसनावर बसणाऱ्या शूद्राच्या कमरेला डाग देऊन त्याला देशातून हाकलून द्यावे. अथवा तो न मरेल अशा बेताने त्याच्या ढुंगणाची कातडी कापावी.

७) ब्राह्मणापुढे उद्दामपणे थुंकणाऱ्या शूद्राचे ओठ कापून टाकावे आणि वायू विसर्जन केल्यास त्याचे ढुंगण कापावे. लघवी करणाऱ्याचे मुत्रेंद्रिय कापावे. इत्यादि गणवीर रत्नाकर डॉ. आंबेडकर आणि हिंदू कोड बिल १९८२ रत्न मित्रा प्रकाशन बेसन बाग-नागपूर) पृष्ठ १३

## मनुने स्त्रियाविषयी मनुस्मृतीत म्हटले आहे.

१) पुरूषांना आकर्षित करून भ्रष्ट करणे हे स्त्रियांचे जीवन वैशिष्ट्य होय. या कारणामुळे ज्ञानी लोक स्त्रियांच्या सान्निध्यात सदैव जागरूक अवस्थेत राहतात.

२) कारण स्त्री ही या जगातील केवळ मूर्ख पुरूषानाच नव्हे तर विद्यासंपन्न पंडीतानाही वाम मार्गाला नेऊन त्याला काम आणि क्रोध यांचा गुलाम करते.

३) आपली माता, भगिनी आणि कन्या यांच्या सहवासात, एकांतात, कोणीही राहू नये. कारण इंद्रिये ही प्रबळ आहेत. आणि ती विद्या संपन्न पंडितानाही आपल्या जाळ्यात ओढतात.

४) स्त्रिया पुरूषांच्या सौंदर्याकडे लक्ष देत नाहीत. ''हा पुरूष आहे एवढेच मनात आणून त्या स्त्रिया पुरूषांच्या आधीन होतात. मग तो सुंदर असो वा कुरूप असो.

५) स्त्रियांना पुरूषाबद्दल इतके आकर्षण असते की पतीने त्यांच्यावर कितीही कडक पहारा ठेवला तरी स्वभावताच चंचल व निर्दयी असल्यामुळे पर पुरूषांशी व्यभिचार करतात आणि पतीचा विश्वासघात करतात.

६) परमेश्वराने स्त्रियांना निर्माण करताना त्यांच्यात हे विघातक दुर्गुण घातले ते लक्षात घेऊन प्रत्येक माणसाने स्त्रियांपासून स्वत:चे संरक्षण करण्यासाठी दक्ष राहिले पाहिजे.

७) शय्येबद्दल ओढ, आराम व चैन यांचे आकर्षण, दागिने व अपवित्र वासनांची हाव क्रोध, लबाडी, मत्सर आणि दुर्वतन हे सर्व दुर्गुण स्त्रियामध्ये असतात.

मनु स्त्रियांना किती हीन लेखीत होता हे त्याच्या या धार्मिक कायद्यावरून स्पष्ट होते. त्याचे स्त्रिया संबंधीचे इतर कायदे ही याच नमुन्याचे असत. कोणत्याही परिस्थितीत ते स्त्रियांना स्वातंत्र्य देऊ नये असे मनुचे मत होते. ते कायदे असे.

१) कुटूंबातील पुरूषांनी आपल्या स्त्रियांना रात्रंदिवस आपल्यावर अवलंबून ठेवावे या स्त्रियांचा कल जर आपल्या कुटुंबातील वैषयिक उपभोगाकडे आहे असे दिसून आल्यास पुरूषांनी त्यांना आपल्या कह्यात ठेवावे.

२) स्त्रीच्या लहानपणात बाप तिचे पालन पोषण करतो. नवरा तिच्या तरूणपणात तिचे संरक्षण करतो आणि तिचे मुलगे वृद्धावस्थेत तिचे संरक्षण करतात. स्त्री ही स्वातंत्र्याला कधीही लायक नसते.

३) वाममार्गाकडे यत्किंचितही जरी स्त्रीचा कल दिसू लागला. तरी त्या वाममार्गापासून तिला परावृत्त करण्याची विशेष दक्षता घेतली पाहिजे. तसे केले नाही तर स्त्री

दोन्ही कुळाना खाऊन टाकील.

४) सर्व जातीच्या श्रेष्ठतम कर्तव्याचे महत्त्व लक्षात घेतले तर असेच ठरते की अगदी नेभळट नवऱ्यानीसुद्धा स्वत:च्या बायकांना मुठीत ठेवून त्यांचे संरक्षण करण्याचे प्रयत्न करीत राहावे.

५) कुटुंबातील मुलगी, तरूणी, वृद्ध स्त्रीयांना कुटुंबातील व्यवहाराच्या बाबतीत स्वतंत्रपणे काहीही करण्याचा अधिकार नाही.

६) स्त्रीने लहानपणात वडिलांच्या आज्ञेत वागले पाहिजे. तरूणपणी पतीच्या आज्ञेत पतिच्या मृत्यूनंतर तिने आपल्या पुत्राच्या आज्ञेत राहिले पाहिजे. स्त्रीने स्वतंत्रपणे कधीच राहू नये.

७) पिता, पती आणि पुत्र यांच्यापासून विभक्त ध्यैर्य स्त्रीने करू नये. त्यांना सोडून ती राहू लागली तर दोन्ही कुटुंबे (पतीचे आणि पित्याचे) इतरांचे तिरस्कारास पात्र होते तिला घटस्फोट देण्याचा हक्क नाही.

८) पती स्वत:च्या पत्नीबरोबर एकजीव झाला असे मानण्यात येते त्याचा अर्थ असा की स्त्री एकदा विवाहित झाली की पत्नीपासून तिला वेगळे राहणे त्रिकाल अशक्य होते.

९) स्त्रीला पुरूषाबरोबर जखडून ठेवणे आणि पुरूषाला हवे तसे वागण्याचे स्वातंत्र्य देणे हा मनुचा हेतू.

१०) पतीने पत्नीची विक्री केली किंवा त्याने तिचा त्याग केला तरी ती पतीपासून विभक्त होऊ शकत नाही.

११) मनुच्या धार्मिक कायद्याप्रमाणे स्त्रीला देहात शिक्षा देता येते.

१२) स्त्रीला ज्ञानार्जनाचा हक्क नाही वैदिक मंत्र स्त्रीने म्हणू नयेत. यज्ञविधी स्त्रियांना अशक्य व्हावेत म्हणून मनूने हे कडक निर्बंध घातले आहेत.

अशा तऱ्हेने मनुचा अमानुष कायदे करण्याचा उद्देश हा होता की, बौद्ध काळात स्त्रीला जे संपूर्ण स्वातंत्र्य होते ते हिरावून घेणे. स्त्री स्वातंत्र्य मनुच्या डोळ्यात सलत होते म्हणूनच ते नष्ट करून त्याने स्त्रीला दास्य कर्दमात रोवून धरले.

*(संदर्भ : डॉ. बाबासाहेब आंबेडकर हिंदू स्त्रियांची उन्नती आणि अवनती पृष्ठ २८ ते ३२)*

# मनुस्मृती दहनानंतरचे भाषण

मनुस्मृति दहनानंतर दुसऱ्या दिवशी सत्याग्रहीची जंगी मिरवणूक तळ्याला वळसा घालून मंडपात आली. या मिरवणूकीत ५० स्त्रियांनी पुरूषांच्या बरोबरीने भाग घेतला. बाबासाहेबांना पाहायलाही बऱ्याच स्त्रिया आल्या होत्या.

रात्री स्त्रियांसमोर बाबासाहेबांनी भाषण केले हे भाषण स्त्रियांच्या जीवनात क्रांती करणारे ठरले. हे भाषण खालीलप्रमाणे-

बाबासाहेब म्हणाले, ''आपण या सभेत आल्याबद्दल मला अत्यानंद होत आहे. प्रपंचाच्या अडचणी स्त्री व पुरूष मिळून सोडवितात त्याप्रमाणे समाजातील संसारातील अडचणी स्त्री पुरूषानी सोडवावयास पाहिजेत पुरूषानीच हे काम अंगावर घेतले तर ते पार पाडण्यास त्यांना पुष्कळ अवधि लागेल. या बद्दल शंका नाही तेच काम स्त्रियानी जर अंगावर घेतले तर त्या कामात लवकर यश प्राप्ती करून घेतील असे माझे मत आहे. परंतू त्यांना एकट्याने जरी हे काम अंगावर घेता आले नाही तरी जो पुरूष वर्ग हे काम करीत आहे त्याच्याशी सहकार्य केल्याशिवाय राहू नये. यासाठी तुम्ही या पुढे नेहमी परिषदेला हजर राहिले पाहिजे असे माझे तुम्हांस सांगणे आहे. खरे म्हटले असता अस्पृश्यता निवारण्याचा प्रश्न पुरूषांचा नसून तुम्हा स्त्रियांचा आहे.

तुम्ही आम्हा पुरूषांना जन्म दिला आहे. आम्हाला इतर लोक कसे जनावरापेक्षा ही कमी लेखतात हे तुम्हास ठाऊक आहे काही ठिकाणी आमची सावलीदेखील घेत नाहीत. इतर लोकांना कोर्ट कचेऱ्यामध्ये मान सन्मानाच्या जागा मिळतात. परंतू तुमच्या पोटी जन्मलेल्या आम्हा मुलांना पोलीस खात्यातील शिपूर्ड्याची ही नोकरी मिळत नाही. इतका आमचा हीन दर्जा आहे हे तुम्हास सर्व ठाऊक आहे. तुम्ही आम्हास जन्मास का घातले असा प्रश्न तुम्हास कोणी केला तर त्याचे उत्तर तुम्ही काय देऊ शकाल? या सभेत बसलेल्या कायस्थ व इतर स्पृश्य बायांच्या पोटी जन्मलेल्या मुलांत व आमच्यात काय अंतर आहे? तुम्ही विचार करावयास पाहिजे की ब्राह्मणांच्या स्त्रियांत जेवढे शील आहे तेवढे तुमच्यातही आहे. तितके पावित्र्य तुमच्यातही आहे आणि तुमच्यात मनोधैर्य आहे. करारीपणा व धमक आहे. तितकी ब्राह्मण स्त्रियांत ही नाही. असे असतांना स्त्रियांच्या पोटी जन्मलेले बालक सर्वमान्य का व्हावे? व तुमच्या पोटी जन्मलेले बालक सर्व ठिकाणी का अवमानित व्हावे? त्याला साधी माणूसकीचा हक्क का असू नये? याचा तुम्ही जर विचार केला असता तर पुरूषांच्या आधी तुम्ही स्त्रियांनी सत्याग्रह केला असता कारण तुमच्यापोटी जन्म घेतला एवढेच पातक आमच्या हातून घडले आहे व त्याच पातका आमच्या हातून घडले आहे व त्याच पातकामुळे आम्हासही अस्पृश्यतेची शिक्षा भोगावी लागत आहे. तेव्हा तुम्ही विचार करावयास पाहिजे की, तुमच्यापोटी जन्म घेणे हे पाप का ठरले त्याला साध्या माणूसकीचा हक्क का असू नये? इतर स्त्रियांच्या पोटी जन्म घेणे हे पुण्यप्रद का व्हावे? या प्रश्नाचा जर तुम्ही विचार केला तुम्हास एक तर प्रजोत्पती बंद करावी लागेल किंवा तुमच्यामुळे

त्यांना लागत असलेला कलंक तरी तुम्हास धुवून काढावा लागेल. या दोहोंपैकी कोणतीतरी एक गोष्ट तुम्ही करावयाला पाहिजे तुम्ही प्रतिज्ञा करा की ''अशा कलंकित स्थितीत आम्ही या पुढे जगणार नाही'' समाजोन्नति करण्याचा जसा पुरूषांनी निश्चय केला आहे तसा तुम्हीही करा दुसरी गोष्ट आपणास सांगावयाची आहे ती ही की तुम्ही सर्वांनी जुन्या व गलिच्छ चालीरिती सोडून दिल्या पाहिजेत. खरे म्हटले असता अस्पृश्य माणसास तो अस्पृश्य आहे अशी ओळख पटविणारा शिक्का त्याच्या कपाळावर मारलेला नाही. परंतू अस्पृश्य लोकांच्या ज्या काही चालीरितीवरून लोक अमूक एक माणूस अस्पृश्य जातीपैकी आहे असे ओळखतात ह्या चालीरिती एके काळी आपणावर सक्तीने लादण्यात आल्या होत्या असे माझे मत आहे . परंतू इंग्रज सरकारच्या राज्यात तशी सक्ती होऊ शकत नाही. म्हणून ज्या गोष्टीमुळे लोक आपणास आपण अस्पृश्य आहोत असे ओळखतात त्या साऱ्या गोष्टी आता तुम्ही बंद केल्या पाहिजेत. तुमची लुगडी नेसण्याची पद्धत ही तुमच्या अस्पृश्यतेची साक्ष आहे ती साक्ष तुम्ही बुजविली पाहिजे. वरिष्ठ वर्गाच्या बाया ज्या पद्धतीने लुगडी नेसतात त्या पद्धतीने तुम्ही लुगडी नेसण्याचा प्रघात पाडला पाहिजे तसे करण्यात तुमचे काही खर्चत नाही त्याचप्रमाणे गळ्यात भाराभर गरसळ्या व हातात कोपरभर कथलाचे किंवा चांदीचे गोठ, पाटल्याही देखील तुम्हास ओळखण्याची खूण आहे. एका गळसरीपेक्षा अधिकाची जरूरी नाही. दागिन्यापेक्षाही कपड्यांना जास्त शोभा आहे. नवऱ्याचे आयुष्य वाढते किंवा शरीराला शोभा येते अशातला भाग नाही. तेव्हा कथलांच्या किंवा चांदीच्या दागिन्यात पैसे खर्च करण्याऐवज चांगल्या कपड्यात पैसे खर्च करा. दागिना घालावयाचा झाल्यास तो सोन्याचा करून घालावा नाहीतर घालू नये त्याचप्रमाणे स्वच्छतेने वागण्याची खबरदारी घ्यावी.

तुम्ही घरच्या गृहलक्ष्मी अहात घरात कोणतीही अमंगल गोष्ट होऊ न देणे याबद्दल तुम्ही काळजी वाहिली पाहिजे. गेल्या महिन्यापासून सर्व लोकांनी मेलेल्या जनावरांचे मांस खाणे बंद केले आहे ही गोष्ट आनंदाची आहे. परंतू एखाद्या घरी तसे झाले नसल्यास ते घडवून आणण्याची जबाबदारी तुम्ही आपापल्या अंगावर घेतली पाहिजे. जो नवरा मेलेल्या जनावराचे मांस घरात आणिल त्यास तुम्ही स्पष्ट सांगा की, असला प्रकार माझ्या घरी चालणार नाही. आणि माझी खात्री आहे की, ही गोष्ट तुम्ही मनावर घेतली तर हा अमंगल प्रकार अजिबात बंद होणार आहे. स्त्रिया गुडघ्याच्यावर तर कधी मांडीच्याहीवर लुगडी नेसत. मांड्या उघड्या रहात. विशेष म्हणजे या विशिष्ट नेसण्यावरून त्यांची जात लक्षात यावी हा उद्देश. बाबासाहेबांचे भाषण ऐकल्यावर परिषदेला आलेल्या स्त्रिया दुसऱ्या दिवशी ब्राह्मणी पद्धतीने पायघोळ नऊवारी लुगडे नेसून आल्या या कामी त्यांना सौ. चित्रे सौ. टिपणीस, यांनी मदत केली. आपल्या या श्रद्धाळू निष्ठावान माय भगिनीना पाहून बाबासाहेबांचे हृदय भरून आले आणि त्यांनी त्या स्त्रियांना आपापल्या गावी जाताना चोळी बांगडीकरिता आठ आठ आणे दिले. परिषदेतील बाबासाहेबांच्या भाषणाचा परिणाम पुरूषवर्गावरही झाला. त्यानी आपापल्या कानातील बाळ्या व सलकड्या काढून टाकल्या. मृतमांस खाणे सोडले वतनाचा हक्क म्हणून गावातून भाकर तुकडा मागणे सोडले.

ß

# चळवळीतील प्रमुख कार्यकर्ते

## दिवंगत गोविंद रामजी आड्रेकर

दिवंगत गोविंद रामजी आड्रेकर हे सात रस्त्यावरील (सद्याच्या केशवराव खाडे मार्ग) बी.आय.टी. चाळीत रहात होते. मागासवर्गीयातील त्यावेळचे प्रसिद्ध कार्यकर्ते सर्वश्री खोलवडीकर, तानाजी महादेव गुडेकर, डी.पी. गंब्रे, एल.आर. कदम, एल.एम.निकम, देवकाबाई सातामकर आदि त्याच चाळीत रहात होते. दिवंगत गोविंद रामजी आड्रेकर यांचे शिक्षण जास्त झाले नव्हते. मात्र अतिशय स्वस्ताईच्या काळात त्यांना चांगला पगार २०० ते ३०० रू मिळत होता. दिवंगत संभाजी तुकाराम गायक वाड यांनी त्यांना आपल्या हाताखाली उत्तम मोटार मॅकॅनिक घडविले होते ''हाय लँड मोटार कंपनीत ते कामाला लागले. समाजातील सुखवस्तू लोकांप्रमाणे समाजातील लोकांकडे पाठ फिरवून ऐष आरामात त्यांना जीवन जगता आले असते. परंतू त्यांचा पिंड सच्च्या समाज सेवकाचा होता.

दिवंगत संभाजी तुकाराम गायकवाड यांनी अस्पृश्य वर्गात जागृति करण्याच्या दृष्टिने दिनांक १० ऑगस्ट १९२६ रोजी आपले पुत्र भिकाजी यांच्या पुढाकाराने तरूणांना संघटित करून मुंबईत ''महार समाज सेवा संघ'' या नावाची संघटना स्थापन केली. त्यात महत्त्वाचे योगदान गोविंद रामजी आड्रेकर यांचे होते.

दिनांक १९/२० मार्च १९२७ साली कुलाबा जिल्हा बहिष्कृत वर्गाची पहिली परिषद महाड येथे झाली. महार समाज सेवा संघाने परिषदेचा प्रचार धुम धडाक्यात केला. कार्यकर्त्यांचे दोन भाग पाडून संघाचे प्रमुख कार्यकर्ते गोविंद रामजी आड्रेकर आणि रामचंद्र बाबाजी मोरे स्व:खर्चाने कोकणात गेले त्यांनी रत्नागिरी, दाभोळ, दापोली, महाड, माणगाव, रोहा, पेण या ठिकाणी प्रचार केला.

महार समाजसेवा संघाचे चांगदेव नारायण मोहिते, (गुरूजी) शंकर लक्ष्मण वडवलकर, जर्नादन भागाजी गमरे, पांडूरंग बाबाजी मांडलेकर, वरघरकर, गणपतराव केंबुर्लीकर आणि सैन्यांतील अधिकाऱ्याच्या हुद्दयावर काम करीत असतानाही सुभेदार विश्राम गंगाराम सवादकर आदि कार्यकर्ते ठाण मांडून होते.

महाड परिषदेनंतर कोकणातील जवळपास सर्व खेड्यातून स्पृश्य समाजाकडून अस्पृश्य समाजावर अत्याचाराचे सत्र सुरू करण्यात आले अशा अत्याचारग्रस्त गावाना भेटी देण्यात आल्या. यात गोविंद रामजी आड्रेकर अग्रेसर होते. त्यासाठी ''कोकण संरक्षक फंड'' सुरू

करण्यात आला. त्याचप्रमाणे ''खोती विरूद्ध'' प्रचंड आंदोलनात त्यांचा सहभाग होता.

स्टार्टे कमिशनपुढे अस्पृश्य समाजाच्या वतीने जी साक्ष देण्यात आली त्यात संभाजी तुकाराम गायकवाड यानी आपले पुत्र भिकाजी यांच्यावर जशी जबाबदारी टाकली तसेच दिवंगत गोविंद रामजी आड्रेकर यांनी आपले पुत्र केशवराव (उर्फ बाबुराव) यांच्यावर जबाबदारी टाकली. ती मात्र त्यांनी समर्थपणे सांभाळली व आंबेडकरी चळवळीमध्ये आपले नाव अजरामर करून ठेवले आहे.

आड्रेकराचे घर त्यावेळी समाजाचे मुख्यालय होते. बारा पाखाड्यातील लोकांच्या महत्त्वपूर्ण बैठका, गोपनीय तसेच निर्णायक स्वरूपाच्या बैठका येथे चालत असत. त्यामुळे आड्रेकर कुटुंबियांचे योगदान बारापाखाड्यात श्रेष्ठ तम ठरले आहे. वार्धाक्यामुळे त्यांचे दु:खद निधन झाले. त्यांच्या निधनाने एका तेजस्वी पर्वाचा अंत झाला.

# बाबुराव उर्फ केशवराव रा. आड्रेकर

समाज समता संघाचे विद्यमाने बहिष्कृत वर्गातील अभिनंदनीय वैदिक विवाह (ले.वऱ्हाडी)

शनिवार ता.२९ जून रोजी सायकाळी ५ वाजता परळ येथे दामोदर हॉलमध्ये श्रीयुत केशव गोविंद आड्रेकर आणि कु. विठाबाई तिडेकर यांचा विवाह वैदिक पद्धतीने आचार्य सुंदरराव वैद्य यांच्या हस्ते लावण्यात आला. त्या समयी अग्निहोत्री श्रीयुत तानाजी महादेव गुडेकर (महार) हे होते. वर श्रीयुत बाबुराव उर्फ केशवजी हे कोकण भागातील बहिष्कृतांचे एक पुढारी ती. आड्रेकर बाबा यांचे चिरंजीव होत ती. आड्रेरकरबाबा हे जितके सुधारणा प्रिय आणि नवमतवादी म्हणून नावाजलेले होते त्याच्यापेक्षाही कांकणभर जास्त आणि 'बापसे बेटा सवाई'या नात्याने तरुणांतील म्हणून नावाजलेले आहेत. त्यांची समाजसेवा कळकळीची आहे आणि अंत:करणापासूनची आहे. वधू विठ्ठलराव तिडेकरांच्या कनिष्ठ कन्या होत त्या चांगल्या सुशिक्षित आणि गृहकृत्यदक्ष जात्याच हुशार आहेत त्यांच्या मातोश्री जरी जुन्या मताच्या जाज्वल्य अभिमानी असल्या तरी विठाबाई या आपल्या पिताजीप्रमाणे नवमताच्या पुरस्कर्त्या आहेत.

अग्निदेवते समक्ष स्पृश्यास्पृशादि हिंदूच्या साक्षीने बहिष्कृतांच्या भर दरबारात, वैदिक पद्धतीने होणारा असा हा महार समाजातील विवाह होय म्हणून वधू आणि वर ही दोघेही अभिनंदनास पात्र आहेत. या लग्नात अंगाला हळद लावणे, तेलवण काढणे, सुपाऱ्या लपविणे, मासे धरविणे, विड्या तोडणे, पाटा पुजणे वराच्या पित्याच्या कपाळाला मागे पुढे बाशिंगे बांधून त्याला काशियात्रेला पाठविण्याचा फार्स करणे इत्यादि बहिष्कृत समाजातील पूर्वापार चालत आलेल्या जुनाट रूढीना पार टाच देण्यात आली होती. वधू वरांना मंगल स्नान घालताना म्हटली जाणारी आदन्हाही गोंदन्हाही या पुराण्या गीतालाही गचांडी देण्यात आली होती सप्तपावलीच्या समयी प्रत्येक पावलागणिक गाईले जाणारे ''चंद्रासंग चांदणी विष्णू संग लक्ष्मी, सत्यनवाना संगसावित्री आणि नळासंग दमयांते हे सुप्रसिद्ध मंगलगीत ही गाईले गेले नाही! नवरा मुलगा जेवताना सासू बाईच्या समोर जेवरे जावया सासूच्या शेवया ''हे विनोदी गीतही करवल्यांच्या मधूर कंटातून ऐकविणे गेले नाही! फार काय तर ऐन लग्नाच्या धामधुमीत ''गोरेगावच्या म्हाताऱ्याला ''आवतान दिले नाही म्हणून आमचा भगिनी वर्ग थोडासा (वायच) रूष्ट झाला असला तरी या विवाहास पूर्ण सहानुभूति आणि संमती दाखविण्यासाठी मातोश्री सौ. रामाबाई आंबेडकर, सौ. भामगरकर सौ. देवकीबाई सातामकर, सौ जनाबाई आदेकर, सौ. चंद्राबाई निमकर, सौ. शकुंतलाताई वणंदकर आणि ती. गं. भा. अक्काबाई (आड्रेरकर) बाबांच्या जीर्ण मतवादी भगिनी) इत्यादि समाजातील सूत्र चालक आणि प्रमुख कार्यकर्ते महार महिलाही या मंगल समयी वधूवरांना ''मंगल आर्शिवाद'' देण्याकरिता मोठ्या उत्सुकतेने अत्यंत उत्साहाने आणि आपुलकीच्या भावनेने हजर राहिल्या

होत्या. लग्नानिमित्त आलेल्या अलोट समुदायापैकी पुरूष वर्गात डॉ. बाबासाहेब आंबेडकर, एम.एपी. एच.डी.सी.बार अॅट लॉ, मेहरबान डॉ. साहेब सोलंकी एल.एम.अॅण्ड एस.एम.एल.सी. बहिष्कृत हितकारिणी सभेचे सेक्रेटरी शिवतरकर साहेब व मेसर्स गायकवाड, जाधव, आड्रेकर इत्यादि बहिष्कृतातील पुढारी मंडळी ही हजर होती स्पृश्य हिंदूपैकी नवयुगकर्ते रावबहादूर जे.पी. एम.एल.सी समताकर्ते देवराव नाईक, समता संघाचे सेक्रेटरी द.वि.प्रधान स. संघाचे सभासद भा.र.कद्रेकर, गुप्ते, द.मो. चित्रे आणि काही चांभार बंधूही मुद्दाम वैदिक विवाह पद्धती कशी असते ते पाहाण्यासाठी आली होती. बहिष्कृत धर्माच्या पूर्वापार रूढीना पार दडपून बाबासाहेब आंबेडकरांच्या समाज क्रांतीकारक मतांना पूर्ण मान देऊन, महार समाजात लग्नासारख्या धार्मिक कृत्यात देखील ''धार्मिक क्रांती घडवून आणण्याचे महत्त्वकृत्य गायकवाड जाधवबाबा, आणि आड्रेकर बाबा या त्रिमूर्ती आणि त्यातल्यात्यात वर आणि रूढीना पोटाशी धरणारी असली तरी समाजाच्या बदलत्या घडीकडे आणि ती बाबासाहेबांच्या सुधारणाप्रिय मतांकडे लक्ष देऊन त्यांनी या समारंभास पूर्ण संमती आणि सहानुभूति दाखविली याबद्दल आड्रेकर आणि तिडेकर या दोन घराण्यांचे ही आम्ही अभिनंदन करतो. विवाह विधी संपल्यानंतर वधूवरांचा पाहुणे मंडळीसह फोटो घेण्यात आला. रात्री वराच्या घरी श्रीयुत ताराचंद गायकवाड मास्तर यांचे गायन, श्री. शंकरराव येलमकरांचे पेटीवादन आणि एका विद्यार्थ्याचे कविता गायन, नकला आणि ''चिपळूण ते दापोली'' पर्यंतच्या दौऱ्यातील चटकदार वर्णने झाल्यावर नवरदेव बाबूराव यांचे पाहूणे मंडळीचे आभार प्रदर्शनवर भाषण झाल्यावर त्यानी आपल्या लग्नानिमित्त कोकण संरक्षक फंडाला ५ रू. आणि महार समाज सेवा संघाला ५ रू. देणगी दिली. शेवटी रात्री वृध्द मंडळी ती दिलखुश होऊन रंगात आली जुन्या भक्तिवर पदांच्या धुंदीत दिवस उजाडला.

केशवराव आड्रेकर यांनी कोकणस्थ महार कॉलनीत घर बांधले. ते टुमदार आणि कौलारू होते. आता त्याचा पुर्नविकास झाला आहे. आड्रेकर हाऊस असे आताचे नाव आहे. खार पश्चिम १९ वा रस्ता येथे आहे त्यांच्या परिवारात आता चंद्रकांत प्रभाकर व मधुकर दिवंगत झाले आहेत. सुरेश, विजय उर्फ बाजू हे पुत्र व नलिनी (सावंत) नावाची विवाहित कन्या ह्यात आहेत.

# सुर्यपुत्र भय्यासाहेब आंबेडकर

सुर्यपुत्र भय्यासाहेब आंबेडकर यांचा जन्म दिनांक १२/१२/१९१२ रोजी मुंबईतील परळ बी. आय. टी. चाळ नं.१/५० येथे झाला.

भय्यासाहेब लहानपणी सतत आजारी असायचे ते इतके आजारी असायचे की त्याना साडीच्या फटकुरात (सुडक्यात) बांधून ठेवण्यात येत असे. त्यामुळे त्यांचे चुलते बाळाराम त्यांना सुडक्या (सुडक्यात बांधलेला) या नावाने, तर मुकुंदरावाना मुक्या या नावाने संबोधित असत.

मातोश्री रमाई उर्फ आईसाहेब आंबेडकर यांना एकंदर पाच मुले झाली. त्यापैकी भय्यासाहेब हे थोरले त्यांच्या पाठीवर दोन भाऊ एक बहिण व पुन्हा लहान भाऊ ही सारी एक दोन वर्षांची असतानाच वारली. भय्यासाहेब एकटेच जगले.

भय्यासाहेब माध्यमिक शाळेत असताना एक हुशार विद्यार्थी होते. ते सर्वसाधारण विद्यार्थ्यांपेक्षा बुद्धीने व तडफेने कमी खास नव्हते. बाबासाहेब परदेशात असले तरी भय्यासाहेबांच्या शिक्षणाविषयी त्यांना फार काळजी वाटत असे व ते आपल्यसा सहकाऱ्याला सातत्याने सूचना देत असत व भय्यासाहेबांच्या अभ्यासाची चौकशी करीत असत.

भय्यासाहेबांना राऊंड टेबल कॉन्फरन्सच्यावेळी इंग्लंडहून लिहिलेल्या पत्रात बाबासाहेबानी लिहिले होते की, तुला लंडनमध्ये शिक्षणासाठी ठेवण्याचा माझा निर्धार आहे. परंतू माझे मन द्विधा होते. तुझी प्रकृती ठिक नसते येथील हवामान तुला मानवते की नाही....भैय्या साहेबांच्या शिक्षणासाठी बाबासाहेब द्विधा झालेले होते.

भय्यासाहेबाना सुरूवातीच्या काळात भाऊसाहेब असे म्हटले जायचे. प्रेसमधील सखाराम तांबे हे प्रबुद्ध भारतमध्ये भाऊसाहेब असेच छापत असत. या भाऊ साहेसाहेबांचे पुढे भय्यासाहेब झाले. अन् कार्यकर्त्यांचे मोठे बंधू बनूनच जगले.

भय्यासाहेबांचा विवाह दिनांक १८/४/१९५३ रोजी दि. विठ्ठल महादेव साळवी यांच्या मीरा या मुलीशी झाला त्यांना एकूण चार अपत्ये झाली १) प्रकाश उर्फ बॉबी २) भीमराव ३) रमा उर्फ(बेबी) ४) आनंदराज भय्यासाहेबांच्यानंतर आज समर्थपणे भारतीय बौद्ध महासमेच्या अध्यक्षपदाचा मान महाउपासिका मीराताई आंबेडकर या निष्ठेने सांभाळत आहेत.

लहानपणीच न्युमॅनिटीक आणि पायाच्या पोलियोसारख्या आजाराने ग्रासलेल्या भय्यासाहेबांना त्यांचे मामा शंकर भिकाजी धोत्रे यांनी वेगवेगळ्या प्रकारचे औषधपचार केले. समुद्राच्या तप्त वाळूमध्ये पाय गाडून उभे राहणे आणि त्यातून पायात उर्जा निर्माण करणे हा त्यांचा नित्याचा कार्यक्रम असे. याचबरोबर गांवठी औषधांच्या उपचाराने त्यांना बरे करण्यात आले त्यांना व्यवस्थित चालता बोलता यावे म्हणून विविध प्रकारचे खेळही खेळविण्यात येत होते एका

बाजूला भय्यासाहेब आजाराशी मुकाबला करीत होते त्याचवेळी बाबासाहेबांची चळवळ उभारी घेत होती. काही निर्णायक प्रश्नासंबंधी अत्युच्च टोकाला पोहोचत होती अवघे वातावरण आंबेडकरमय झालेले असायचे. याच दरम्यान भय्यासाहेब मॅट्रीकच्या परिक्षेस बसले परंतू ते उत्तीर्ण होऊ शकले नाहीत. जी गोष्ट भय्यासाहेबांची तशीच मुकुंदराव आंबेडकरांचीसुद्धा मुकुंदराव आंबेडकरांचीसुद्धा मुकुंदरावही मॅट्रीक पास होऊ शकत नाहीत ज्या काळात एक आंबेडकर भारतीय समाज व्यवस्थेला पेलता आले नाही त्याकाळात आणखी दोन आंबेडकर कसे काय पेलवणार ? आणि म्हणूनच त्याना मॅट्रीकच्या परीक्षेस उत्तीर्ण होऊ दिले नाही.

दोघानीही पुढे जे लिखाण केले जी भाषणे केली त्यांचा मागोवा घेतल्यास मॅट्रीकची परीक्षा उत्तीर्ण न होण्याइतपत ते निर्बुद्ध होते असे कोण म्हणेल ? व्यवस्थेने त्यांच्यामाथी मॅट्रीक नापासचा ठपका मारला व नंतरच्या काळात ते पदवीधर नाहीत म्हणून समाजातील महोरक्यांकडून सतत अवहेलना स्विकारावी लागली. भय्यासाहेबांना देण्यात येत असलेल्या मनस्तापाचा कधीही आणि कोणीही साकल्याने विचार केला नाही. त्यामुळे भय्यासाहेब हे सतत दडपणाखाली जगले आणि तरीही ते जे काही राजकीय व सार्वजनिक आयुष्य जगले त्याचे ते स्वत: शिल्पकार होते. भोवतालची परिस्थिती त्यांना अगतिक करू पाहत होती तरीही ते विजयी मुद्रेने जगले याचे एकमेव कारण त्याना लाभलेली इच्छाशक्ती भैय्यासाहेबांचा स्वभाव अत्यंत पारदर्शी, साधा सरळ असा. कोठलेही छक्के पंजे त्यांच्या स्वभावात नव्हते. बोलणे अतिशय रोखठोक स्वभावाखाली झाकलेल्या बेडर व कणखरपणामुळेच ते आंबेडकरी चळवळीत आपले महत्त्वाचे स्थान टिकवू शकले. दलितांवर होणाऱ्या अत्याचाराचा सर्व ताकदीनिशी व हातात जी आयुधे असतील ती वापरून प्रभावीपणे प्रतिकार करावा प्रसंगी अत्याचार करणारांची डोकी फोडण्यास किंवा हातपाय तोडण्यास कचरू नये, भय्यासाहेबांचे एक वेगळेच रूप अशावेळी पहावयास मिळे.

बाबासाहेबांनी 'संपूर्ण भारत बौद्धमय करीन' ही घोषणा केली. आपल्या वडिलांच्या मृत्यूनंतर त्यांचे स्वप्न पूर्णत्वास नेण्यासाठी भय्यासाहेब रात्रंदिवस खपत होते त्यांचे महाराष्ट्रभर, देशभर दौरे सुरूच होते. धम्म मेळावे सर्वत्र होत होते. प्रचार सर्वत्र जोरात सुरू होता. दलित समाजातील एक मोठा वर्ग, बौद्ध धम्म स्विकारतो याची चीड सवर्ण समाजात होती. हिंदू महासभा, रा.स्व. संघ या सारख्या संघटनांना मोठा हादरा बसला होता. त्यांच्या मनात एक चीड निर्माण झाली होती. या सर्व धगधगत्या परिस्थितीत भय्यासाहेब आपल्या वडिलांच्या इच्छेला मूर्तरूप देण्याचे काम करीत होते. समाजातील एक मोठा वर्ग त्यांच्याकडे आशेने पाहात होता. बाबासाहेबांची इच्छा पूर्ण करायला त्यांचा मुलगा बाहेर पडला, याचे सर्वांना अप्रुप वाटत होते. भारतीय बौद्ध महासभेच्या कामासाठी भय्यासाहेब खानदेशात असताना हिंदू माथेफिरूनी त्यांच्यावर प्राणघातक हल्ला करून त्यांना संपविण्याचा कट रचला होता पण ज्याप्रमाणे बाबासाहेबांना सवर्ण मित्र होते तसेच भय्यासाहेबांनाही होते. त्याच्यामार्फत भय्यासाहेबांच्या कानीही बातमी आली त्यानी आपल्या सर्व सहकाऱ्यांशी चर्चा केली आणि ज्या सवर्ण हितचिंतकानी या कटाची माहिती देऊन सावध

केले त्यांचे आभार मानले.

भारतीय बौद्ध महासभेचे अध्यक्ष, रिपब्लिकन पार्टी ऑफ इंडियाचे उपाध्यक्ष व मुंबई प्रदेशचे अध्यक्ष बौद्धजन पंचायत समितीचे कार्याध्यक्ष दीक्षा भूमी स्मारक समितीचे सदस्य, पिपल्स एज्यूकेशन सोसायटीच्या गव्हर्निंग बोर्डाचे सदस्य, बॉम्बे म्युनिसीपल कामगार संघाचे अध्यक्ष इत्यादी पदावरून ते अखंड कार्यरत राहिले. महाराष्ट्र विधान परिषदेचे ते सहा वर्षे सदस्य होते. १९७१ साली त्यांच्या नेतृत्वाखाली भारतीय बौद्ध महासभेचे प्रतिनिधी मंडळ श्रीलंका व नंतर सारनाथ येथे गेले होते.

धम्मप्रसार कार्याचा एक भाग म्हणून १९६७ मध्ये ११ व्या धम्मचक्र प्रवर्तनदिनी भय्यासाहेबांनी स्वत: श्रामणेरची दीक्षा घेतली होती. त्यांचे नांव महापंडित काश्यप असे ठेवण्यांत आले होते. दिनांक २३ व २४ नोव्हेंबर १९६८ रोजी मुंबईत पुरंदरे स्टेडिअमवर त्यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या परिषदेला पूज्य दलाई लामा हे प्रमुख पाहूणे लाभले होते. महू ते मुंबई अखंड २१ दिवसाचा ''भीम ज्योतीचा'' कार्यक्रम त्यानी राबविला. दिनांक १४/१२ रोजी पन्नाशी निमित्त गोव्याचे मुख्यमंत्री दयानंद बांदोडकर यांच्या हस्ते सत्कार तर एकसष्टी निमित्त शंकरराव चव्हाण यांच्या हस्ते सत्कार करण्यात आला होता.

भय्यासाहेब, बाबासाहेबांचे सुपूत्र असल्याच्या तोऱ्यात कधी वागले नाहीत; वृथा अभिमान कधी बाळगला नाही. उलट जनसामान्यात मिसळून त्यांची दु:खे जाणून घ्यायची, त्यांच्या समस्या समजून घ्यायच्या आणि त्यावर उपाय शोधण्याचा प्रामाणिक प्रयत्न करायचा ही त्यांच्या समाजसेवेची शैली होती. म्हणूनच जनतेचे त्यांच्यावर अपरंपार प्रेम होते. भय्यासाहेबांची प्राणज्योत १७/९/१९७७ रोजी मुंबईच्या के. ई. एम. रूग्णालयात मालविली.

# मुकुंदराव आंबेडकर

मुकुंदराव हे बाबासाहेबांचे पुतणे. बाबासाहेबांचे मोठे बंधू आनंदराव यांचे ते चिरंजीव मुकुंदरावांचा जन्म १९१३ सालचा आनंदरावांच्या अकाली निधनानंतर बाबासाहेबांनी मुकुंदला आपल्या मुलाप्रमाणे वाढवले. आपला मुलगा यशवंत व पुतण्या मुकुंद यांच्यात त्यांनी कधीच मतभेद केला नाही बाबासाहेबांचे बंधू बाळाराम हे मुकुंदरावाना मुक्या या नावाने संबोधित. या दोन्ही मुलांनी स्वत:च्या पायावर उभे राहून सन्मानाने जगावे यासाठी बाबासाहेबांनी सर्वतोपरी सहकार्य केले. मुकुंदला त्यांनी ''प्रबुद्ध भारत'' च्या संपादकीय मंडळावर घेतले. १४ ऑक्टोबर १९५६ रोजी नागपूर दीक्षा भूमीवर डॉ. बाबासाहेबांच्या हस्ते त्यांनी दीक्षा घेतली जुन्या पिढीत मुकुंदरावांकडे बाबासाहेबांचे वारस म्हणून बघण्याचा जनतेचा दृष्टिकोन होता. दलित वर्गाच्या चळवळीत व पुढे बौद्ध धम्माच्या प्रसाराच्या कामात त्यांनी आपल्या जीवनाची कुर्बानी केली. त्यांचे विस्मरण कोणालाही होऊ शकणार नाही. अमृतसर (पंजाब) येथे शीख धर्माचा अभ्यास करण्यासाठी भय्यासाहेब व मुकुंदरावाना बाबासाहेबानी पाठविले होते.

२ फेब्रुवारी १९५८ रोजी मुंबईत खार येथे त्यांचे हृदय विकाराने निधन झाले. त्यानंतर काही काळाने त्यांच्या पत्नीचेही निधन झाले. त्या महापालिकेच्या शाळेत मुख्याध्यापिका होत्या. त्यांना चार आपत्ये आहेत. विद्या, अशोक, दिलीप आणि सुजाता. मुकुंदरावानी आपल्या जीवनाच्या अंतापर्यंत समाजाची सेवा केली. अनेक खेड्यापाड्यात जाऊन धर्मांतराचे कार्य केले. मुकुंदरावांचा परिवार व भय्यासाहेबांचा परिवार राजगृहावर एकत्रच रहात होता. कोकणस्थ को. ऑ. हौ. सोसायटीने बांधलेल्या १९ वा रस्ता खार येथील अशोक भवन या बंगल्यात मुकुंदरावांचा परिवार रहाण्यास १९५४ साली आला व नंतर जॉली भवन नामक बंगल्यात भय्यासाहेबांचा परिवार रहाण्यास आला.

जर मुकुंदरावांचे अकाली निधन झाले नसते तर आंबेडकरी चळवळीचा इतिहास काही औरच घडला असता. दोन आंबेडकरांनी रिपब्लिकन पक्षाचेही विभाजन होऊ न देता बाबासाहेबांच्या कल्पनेतील रिपब्लिकन पक्ष गटाधीपतीना दिला असता.

मुकुंदरावांच्या स्मृतीला विनम्र अभिवादन!

मुकुंदरावांचे निधन दिनांक २ फेब्रुवारी १९५८ रोजी झाले.

# घाटगे गंगाधरराव राघोराम (यरंडकर)

दिवंगत गंगाधरराव राघोराम घाटगे यांचा जन्म ७ मार्च १९०७ साली मु. फुरूस ता.दापोली जि. रत्नागिरीमधील महार शेतकरी कुटुंबात झाला सैनिकी पेशाचा घाटगे घराण्याचा चार पिढ्यांचा इतिहास लिखित स्वरूपात उपलब्ध आहे. सी. ई. एस. उच्च शाळा पुणे येथे त्यांचे शिक्षण झाले त्यांचा मुख्य व्यवसाय शेती व समाजकार्य.

सैनिकी परंपरा लाभलेल्या प्रसिद्ध घराण्याचा त्यांना वारसा लाभला होता त्यांचे वडील राघोराम सजन घाटगे हे भारतीय सेनेतील एक निवृत्त सुभेदार आणि पुण्यातील डी. सी. मिशनचे एक मानद कोषाध्यक्ष होते. दहा वर्ष इंग्रज सरकारने नेमणूक केलेले ते मानद न्यायाधीश होते.

त्यांना दोन चुलत भाऊ होते. (एस.एस.घाटगे व जी.एस.घाटगे) ज्यांनी सैन्यात भारतीय अधिकारी म्हणून काम केलेले आहे आणि सेवानिवृत्त झाले ज्यानी शालेय जीवनातील एक महत्त्वाचे खेळाडू म्हणून आपले स्वतंत्र स्थान निर्माण केले होते. विशेष करून हॉकी या खेळामध्ये ते प्रवीण असल्याने अनेक नामवंत खेळाडूना त्यानी घडविले. जसे ते हॉकीमध्ये प्रवीण होते तसेच ते फुटबॉलमध्ये ही प्रवीण होते १९३३ ते १९३४ मध्ये ते बहिष्कृत विद्यार्थी संस्थेचे स्पोटर्स सचिव होते.

१९२८ पासून ते ''थिऑसॉफिकल सोसायटी ज युथ लॉ ज चे मेंबर होते. त्यांच्या जिल्ह्यांतील विविध सामाजिक, शैक्षणिक आणि राजनैतिक कामकाजाशी ते संबंधित होते. बहिष्कृत वर्गातील मुलांसाठी त्यांनी दापोली येथे ''देवी रमाबाई आंबेडकर विद्यार्थी आश्रम '' नावाचे वस्तीगृह सुरू केले आहे. जे बौद्धजन पंचायत समितीच्या अख्यातरीत चालत होते त्यानी रत्नागिरी डिस्प्रेड क्लासेस एज्यूकेशन सोसायटीचेसुद्धा आयोजन केले होते त्यांना रत्नागिरी जिल्ह्याचे निवडणूक अधिकारी म्हणून ओळखले जाते ते डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे जवळचे नातेवाईक तसेच कट्टर अनुयायीदेखील होते त्यांचे एक अप्रकाशित पुस्तक दि महार्स इन रत्नागिरी या नावाचे आहे. आई. पी. एल. पी. विभागाचे ते चेअरमन होते. त्यांनी रत्नागिरी बॉम्बेस्टीम नेव्हीगेशन कंपनीमध्ये वाहतूक आयोजक (ट्राफिक ऑर्गनायझर) या पदावर काम केले आहे.

त्यांचे चुलतबंधू सुभेदार घाटगे यांचे निवासस्थान १९ व्या रस्त्यावरील 'सुशिव' या इमारतीत आहे (कोकणस्थ गृहनिर्माण संस्था) शा क्र. १४८ मध्ये ते सक्रिय होते. वांद्रे विभागातील डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची राजकीय , सामाजिक चळवळ यशस्वी करण्यामध्ये त्यांचे महत्त्वाचे योगदान आहे. सिद्धार्थ महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना उत्कृष्ट खेळाडू म्हणून घडविले आहे त्यांना रविंद्र नावाचे सुपूत्र आहेत. त्यांनीही सिद्धार्थ महाविद्यालयात शिकून सेवा केली आहे. आता ते सांताक्रुझ विभागात रहात आहेत. गंगाधररावांचे आकस्मिक निधन वार्धाक्यामुळे झाले.

# सखाराम भिकू धोत्रे (विरसईकर)

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या चळवळीतील वांद्रे विभागातील पहिल्या फळीचे जे कार्यकर्ते झाले. त्या कार्यकर्त्यांमध्ये सखाराम भिकू धोत्रे (विरसईकर) यांचे नाव प्रामुख्याने येते. रत्नागिरी जिल्ह्यात दापोली तालुका विरसई हे त्यांचे मूळ गाव. वडिलोपार्जित शेती न करता ते सैन्यात दाखल झाले. त्या काळी गरीबीमुळे परिस्थिती हालाखीची होती. शिक्षणाचा अभाव होता. व्यायामाची आवड असल्यामुळे सैनिकी पेशा योग्य वाटला.

काही काळ रेल्वेमध्ये सेवा केल्यानंतर त्यांना सामाजिक कार्याचे आकर्षण वाटले. बाबासाहेबांची चळवळ फोफावत होती. शेड्युल्ड कास्ट फेडरेशन स्वतंत्र मजूर पक्ष आणि 'जनता' पत्र यात बाबासाहेबांचे व्यक्तिमत्त्व उभारी घेऊ लागले. सबर्बन भाग हा गावठाणाचा, जंगलाचा, खाडीचा प्रदेश दिवा बत्तीची सोय नाही ढुणाजी शिर्के सखाराम भिकू धोत्रे (लालटेन) कंदील व काठी घेऊन फिरून प्रचार करू लागले.

ठाणे, कुलाबा (रायगड) रत्नागिरी हा कोकण वासीयांचा प्रदेश १९२७ साली महाडचा सत्याग्रह करण्याचे ठरले. सबर्बन भागात आपला समाज रहात होता. त्याला 'महार' म्हणूनच संबोधिले जाई. छोटी गावे वाढली त्या साऱ्यानी एक मुखाने बाबासाहेबांना पाठिंबा दिला. समाजावरील अन्याय, अत्याचार प्रतिकार त्यांनी ठामपणे केला. धर्माजी सोनू जाधव (घाटिवले) हे त्यांचे सहकारी होते. ते थोडे शिकलेले होते. प्रत्यक्ष बाबासाहेबांच्या अध्यक्षतेखाली वांद्रे विभागात सभा होऊ लागल्या. बाबासाहेबांचे मुंबईतील सहकारी सभाना येऊ लागले. पण पडद्यामागचे सुत्रधार, आयोजन, नियोजन आदि महत्त्वपूर्ण भूमिकांमध्ये सखाराम भिकू धोत्रेचा सिंहाचा वाटा होता.

पीळदार मिशा, उंच धिप्पाड शरीर यष्टी आणि पहाडी आवाज यामुळे त्यांचे व्यक्तिमत्व उठून दिसे त्यात सचोटी, प्रामाणिकपणा, निष्ठा असल्यामुळे त्याना मानापमानाची तमा वाटली नाही त्याना कार्य महत्त्वाचे वाटले. म्हणूनच त्यांनी पुढाकार घेऊन कोकणस्थ कॉलनीची स्वतंत्र वसाहत होण्यासाठी जागा मिळविली. त्यांच्याच हयातींत बारापाखाड्यांची एकजुट झाली. चार नगरसेवक निवडून येऊ शकले आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या हयांतीत पूर्वीच्या 'पाली दांडा' रोडला डॉ. बाबासाहेब आंबेडकर रोड हे नाव देण्यात आले त्याकाळातील एक प्रसिद्ध पुढारी म्हणून त्यांची गणना होत होती. वांद्रे पोलीस ठाण्यात डॉ. बाबासाहेब आंबेडकर व भगवान बुद्धाची जयंती एकत्रितपणे साजरी होत असे त्या जयंतीला प्रमुख पाहूणे म्हणून त्यांना निमंत्रित करण्यात येई.

बौद्ध स्मशानभूमी मिळविण्यातही त्यांचा सहभाग होता. त्यामुळे स्मशानभुमीने ''बारा

पाखाड्यांतील '' प्रेते नेण्याकरिता ''शववाहिनी'' तयार केली होती ती शववाहिनी त्यांच्या कंपाऊंडमध्ये ठेवीत असत आणि ज्या भागात प्रेत झाले असेल त्या भागातील कार्यकर्ते तेथून ती घेऊन जात असत त्यांचे भाचे नारायण रामजी तुळसकर हे देखील वांद्रे भागात त्यांची प्रसिद्धी होती. पुढे वयोमानानुसार व अल्प आजाराने त्यांचे दु:खद निधन झाले.

# धर्माजी सोनू जाधव (घाटिवले)

धर्माजी सोनू जाधव हे रत्नागिरी जिल्ह्यातील संगमेश्वर तालुक्यातील घाटिवले गावचे मूळचे राहाणारे होते. त्यांचे वडील उदर निर्वाहाकरिता मुंबईला आले. त्यांनी वांद्रे येथे आपले कायमचे वास्तव्य केले होते.

त्यांचे वडील निवर्तल्यावर त्यांच्या गावची मुकादमी त्यांना देण्यात आली आपण गावचे नेते झालो आहोत त्यामुळे गावची आपल्यावर एक प्रकारची जबाबदारी आहे म्हणून आपले आचरण चांगल्या रितीचे असावे अशी त्यांना त्या वेळेपासून जाणीव होऊन ते नेहमी चार चौघात जाती जमातीत व समाज कार्यात भाग घेऊन सर्वांशी सलोख्याने व मनमिळाऊपणाने वागत त्यामुळे आपल्या लहान वयातच ते लोकप्रिय झाले.

त्यांचे शिक्षण फक्त मराठी चौथीपर्यंत झाले होते. परंतू त्यांना ज्ञानाचे अधिक महत्त्व समजल्यामुळे त्यांनी नोकरी करून रात्रीच्या इंग्रजी शाळेत अभ्यास केला व आपल्या अल्पशा ज्ञानात भर घातली. एवढे शिक्षण त्यानी पुढे आपल्या स्वत:च्या नेतृत्वाच्या मेहनतीने प्राप्त करणे हे खरोखरीच प्रशंसनीय आहे.

धर्माजी यांनी आपला प्रपंच सांभाळून गावची सेवा उत्तम प्रकारची केली. त्यानंतर थोडे पुढे जाऊन आपल्या जातीची सेवा करण्यास सुरूवात केली. सर्वांशी आपुलकीच्या भावनेने वागून लोकांची मर्जी संपादन केली व विश्वासास पात्र झाले. अशा रितीने केलेल्या सेवेचे अंगिकारलेल्या कार्याबद्दल लोकांकडून त्यांना योग्य तो मोबदला मिळू लागला. अगोदर ते लोकांना मानू लागले नंतर लोक त्यांना मानू लागले त्यामुळे कार्य करण्याची ह्यांची प्रवृत्ती अधिक बळावत जाऊन अवघ वयाच्या २१ व्या वर्षी त्यांनी समाजाच्या सार्वजनिक कार्यात प्रवेश केला अशा रितीने त्यानी आपल्या कार्याचा टप्पा उत्तरोत्तर वाढवित नेऊन शेवटी सार्वजनिक सेवेने तसेच आपल्या कर्तृत्वाच्या धडाडीने धर्माजी सोनू जाधव यांनी आपले नाव अजरामर केले आहे.

परमपूज्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी वांद्रयात १९२७ साली अस्पृश्यांची चळवळ सुरू केली. त्या वेळेपासून आजतागायत धर्माजी सोनू जाधव यानी आपले आयुष्य समाज कार्यात खर्ची घातले आहे. वांद्रा ते सबर्बन भागात अस्पृश्यांच्या चळवळीचा प्रसार ज्या काही व्यक्तिनी केला त्यापैकी ते एक प्रमुख होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकर कोण आहेत त्यांची अस्पृश्यांची चळवळ म्हणजे काय आहे वगैरे सबर्बन भागात खेड्यापाड्यातील व आत्मोन्नतीची जाणीव करून देण्याकरिता व अज्ञान लोकांना जाणीव करून देण्याकरिता लोकांना पटवून देण्याकरिता आपल्या माणूसकीच्या चळवळीची जाणीव करून देण्याकरिता जिवापाड त्रास सोसला. दौरा, प्रचार कार्य, सभा ठिकठिकाणी घेऊन सबर्बन भागात जागृतीची ज्योत निर्माण

केली त्यात धर्माजी यांनी आपल्या अंत:करणात तेवत ठेवलेल्या ध्येय्य पूर्तेतसाठी मानापमानाची, सुखदु:खाची पर्वा न करता आपले कार्य सतत सुरू ठेवले.

सन १९२६ मध्ये मुंबई सातरस्ता जेथे महार समाजसेवा संघ स्थापन झाला. त्याचे ते आजीव सभासद झाले. सदर संस्थेने जी जी सार्वजनिक तसेच महार जातीच्या सर्वांगीण उन्नतीची कार्य होती घेतली त्या त्या कार्यात त्यांनी मोठ्या धडाडीने भाग घेतला. इतकेच नव्हे तर मध्यंतरी काही स्वकीयांकडून व परकीयांकडून संस्थेवर चौफेर विरोधी हल्ले होऊ लागले त्या प्रसंगी काही स्वाभिमानी सभासदानी आपल्या जातीच्या हिताकरिता इतकेच नव्हे तर ज्या सवर्ण हिंदुधर्मीयानी आपल्या महार जातीला मनुष्यहीन करून अज्ञानाच्या गर्तेत गुरफटून ठेवलेले आहे त्यातून मुक्त करून जगाच्या दिव्य प्रकाशात आणण्याकरिता अपमान सहन केले शिवाय समाजद्रोही असा आपल्या नावाचा डांगोरा पिटला गेला तरीसुद्धा संस्थेच्या आपल्या निश्चयात तसुभरही फरक केला नाही. उलटपक्षी त्याच निश्चयी सभासदाने मुंबईत आपली महार परिषद भरीपर्यंत व ती यशस्वी करून दाखवीपर्यंत आपले ध्येय सोडले नाही शेवटी आपल्या कृतीने महार समाज सेवा संघाचे महत्त्व सर्व लोकांस पटवून दिले. त्यापैकी धर्माजी सोनू जाधव हे धैर्यवान सभासद होते. या ठिकाणी प्रामुख्याने नमूद करावेसे वाटते की, कै. धर्माजी सोनू जाधव व त्यांचे सहकारी श्री सखाराम भिकू धोत्रे हे केवळ महार समाज सेवा संघात सामिल आहेत म्हणून वांद्रा येथील सारे लोक त्यांचे विरूद्ध गेले होते. काही प्रसंगी त्यांना छळ सहन करावा लागला व काही ठिकाणी त्यांना मारही खाण्याचा प्रसंग आला होता. अशा बिकट परिस्थितीला न डगमगता आपले कार्य येथेच थांबविले नाही तर स्वजातीची सेवा करण्याचे व्रत अव्याहतपणे चालू ठेवले.

नैसर्गिक पाण्यावर व हिंदू धर्माच्या पवित्र देवळावर उच्च हिंदु धर्मीय जातीचा कोणत्याही मनुष्यास मग तो कोणत्याही तऱ्हेचा असो त्यास पशुपक्षादि प्राण्याप्रमाणे सामाजिक हक्क प्रस्थापित करता येतो परंतू हिंदू जातीत कमी लेखल्या गेलेल्या अस्पृश्य जातीला त्याचा उपभोग घेऊन द्यावयाचा नाही. ही हिंदू धर्माची हीन शिकवणूक जगाच्या वेशीवर टांगण्याकरिता तसेच आपले माणुसकीचे हक्क प्रस्थापित करण्याकरिता १९२७ साली महाड येथील चवदार तळ्यावर आणि काळ्या व गोऱ्या रामाच्या देवळावर ह्या दोन्ही ठिकाणी सत्याग्रह करण्याकरिता ते सत्याग्रही सैनिकात दाखल झाले होते.

सर्व जगाला हादरून सोडणाऱ्या नाशिकच्या सत्याग्रहाच्यावेळी आपल्या घरादाराची, कुटुंबाची, मुलाबाळांची आणि सरकारी नोकरीची पर्वा न करता तद्वत्ची आपल्या आर्थिक कमकुवतपणाची कदर न बाळगता सत्याग्रही सैनिकासह भाग घेतला होता. त्या ठिकाणी आपले हक्क प्रस्थापित करीत असताना त्यांना कैद करण्यात आले हिंदू धर्माने एका अल्प संख्याक जातीचे हिरावून घेतलेले मनुष्यत्वाचे हक्क परत मिळविण्याचे प्रयत्न केल्याबद्दल समाजाने त्यांचा जाहिर सत्कार करून त्याना चांदीचे पदकही अर्पण केले होते. २ एप्रिल१९३१ रोजी दामोदर हॉल परळ येथे

समता सैनिक दल काढण्यात आले. त्यावेळी त्यानी आपल्या गावात सेवादलाचे एक पथक तयार केले होते त्याचे ते कॅप्टन होते त्याचप्रमाणे वांद्रा येथे व प्रत्येक गावी सेवादल काढण्याकरिता इतरांबरोबर प्रचार कार्यही केले. वांद्रयातील सबर्बन भागातील सेवादलात ते एक प्रमुख होते. शिवाय समता सैनिक दलाच्या मॅनेजिंग कमिटीचे सदस्य होते.ते एक उत्साही मर्दुमकी गाजवून आपल्या चळवळीची इभ्रत राखली आहे. त्या त्या प्रसंगी धर्माजी यांनी भाग घेतला नव्हता असे कधीच आढळून आले नाही.

परमपुज्य बाबासाहेबांनी येवले मुक्कामी १९३५साली धर्मांतराची घोषणा केली तिला पाठिंबा देण्याकरिता मुंबईतील काही ठिकाणचे कार्यकर्ते एकत्रित जमून विचार विनिमय केला आणि मुंबई इलाखा महार परिषद भरविण्याचे ठरविले व ती यशस्वी रितीने पार पाडण्याकरिता सदर कार्यकर्त्यांनी जिवापाड त्रास सहन केला. त्यापैकी धर्माजी हे एक कार्यकर्ते होते. शिवाय ते स्वागत मंडळाचे व विषयनियामक कमिटीचे सभासद होते.

बांद्रा सबर्बन भागात महार जातीची राहाण्याची अत्यंत हालाखीची परिस्थिती आहे ती सुधारण्याचा कै. धर्माजी व त्यांचे सहकारी धोत्रे यानी कसोशीने व चिकाटीने प्रयत्न केला. आपल्या जातीला राहाण्याकरिता कायमची जागा मिळावी व त्याठिकाणी आपल्या जातीची एक वसाहत होऊन अभेद्य अशी संघटना व्हावी या उच्च पण पवित्र हेतूने त्यानी आपल्या अंत:करणात जागृतता ठेवून तसा प्रयत्न ही चालू ठेवला. परंतू एवढी मोठी जबाबदारी व उलाढाल करण्याइतके त्यांच्याजवळ ज्ञान व आंतरिक साधनही नव्हते म्हणून त्यांना इतर अनुभवी गृहस्थांची सल्ला मसलत घ्यावी लागली. आपला प्रयत्न तडीस नेताना त्यांना पुष्कळ त्रास सहन करावा लागला इतर जातीकडूनसुद्धा वारंवार अडथळे होत होते. तरी देखील धर्माजी यानी आपला भगीरथ प्रयत्न सोडला नाही. त्यानी कोकणस्थ महार को.ऑ.हौ.कॉलनी या नावाची संस्था स्थापन केली. तिच्याद्वारे सरकारजवळ सतत सात वर्षे झगडून शेवटी सवलतीच्या दराने जागा मिळविली आणि त्या ठिकाणी आपल्या जातीची कायमची वसाहत करून आपला निश्चय तडीस नेला. सदर प्रकारची हाऊसिंग सोसायटी स्थापन करणारे महार जातीतील हे पहिले दोन गृहस्थ होते. धर्माजी जरी आज आपल्या दृष्टि आड झाले असले तरी त्यांच्या दीर्घ प्रयत्नाची गोडफळे लोकांना प्रत्यक्ष चाखावयास मिळत आहेत ही काही कमी लौकिकाची गोष्ट नाही.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी १९३५ साली स्वतंत्र मजूर पक्षाची स्थापन केली. मजूर पक्षाच्या प्रचारार्थ त्यांनी बराच त्रास सहन केला. त्यांनी बांद्रा ते सबर्बन भागात पुष्कळ सभासद केले तसेच स्वतंत्र पक्ष हा कोणाकरिता व कशाकरिता आहे याची जाणीव लोकांना करून दिली. स्वतंत्र मजूर पक्षाची निवडणूक झाली त्यावेळी ते वांद्रा भागापैकी स्वतंत्र पक्षाच्या कार्यकारी मंडळात निवडून आले.

जनता पत्राबद्दल त्यांना अभिमान असे. जनता पत्र हे आपल्या चळवळीचे ध्येय व तत्संबंधी माहिती याचा जगाच्या कानाकोपऱ्यात फैलाव करण्याचे मुख्य साधन आहे आणि ते टिकावे

म्हणून लोकांनी वर्गणीदार होऊन पत्राचा खप वाढवावा या करिता ते वेळोवेळी ठिकठिकाणी सभेतून व इतर अनेक अंगाने प्रचार करीत असत.

त्यांना सुविद्य, सुशील, संस्कारक्षम अशी अर्धांगिनी लाभली होती. महाड तालुक्यातील कुंभार्डे येथील बाळा राम धोत्रे यांची कन्या लाडीबाई त्यांनी आपल्या पतीच्या समाजकार्यात साथ देऊन महान असा त्याग केला आहे. चळवळीमध्ये धर्माजी सोनू जाधव यानी स्वत:ला झोकून दिल्यामुळे झोप अवेळी भोजन, उपाशी राहणे आदि कारणामुळे त्यांची प्रकृती ढासळली आणि रविवार तारीख २९/६/४१ रोजी (जी.आय.पी.) रेल्वे रूग्णालयात अपेंडिक्स या व्याधिमुळे त्यांचे निधन झाले. आंबेडकरी चळवळीचा तारा निखळला.

त्यांच्या पश्चात बाळकृष्ण, पांडूरंग, मनोहर व जगदीश हे पुत्र व मालतीया नावाची कन्या यापैकी बाळकृष्ण व पांडुरंग हे देखील निधन पावले आहेत.

# गणपत विठ्ठल कासारे (लाटवणकर)

दिवंगत गणपत विठ्ठल कासारे (लाटवणकर) यांचा जन्म मु. लाटवण ता. दापोली जिल्हा रत्नागिरी येथे झाला. त्यांचे वडिल विठ्ठल कासारे हे त्यांच्या लहानपणीच वारले. पितृछत्र हरविल्यामुळे त्यांची आई सखुबाई ही त्यांना व त्यांची मोठी बहिण हिला घेऊन ओवूर या गावीच राहू लागले. ते मराठी ४ थी इयत्तेपर्यंत शिकले होते. सखुबाई ही शेतात मोलमजुरी करून स्वत:चा व मुलांचा सांभाळ करीत होती. अत्यंत हालाखीच्या परिस्थितीतून मार्ग काढीत गणपतबाबा परिस्थितीशी सामना करीत होते तेव्हाच्या वर्णव्यवस्थेचा फटका त्यानाही सहन करावा लागत होता. वेळोवेळी अपमान सहन करावा लागत होता. महार समाजात जन्म घेतल्यामुळे समाजात गुन्हेगार आहोत या भावनेप्रमाणे हिंदू सनातनी लोकांकडून अमानुष वागणूक मिळत होती. या सर्व मनुवादी वर्णव्यवस्थेविरूद्ध बंड पुकारावे असे त्यांना वाटत असे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी सर्व दलित समाजाला अंधारातून प्रकाशाकडे नेण्याकरिता वर्णव्यवस्थेविरूद्ध जे बंड पुकारून दलित जनतेला न्याय मिळवून देण्यासाठी चळवळ उभारली त्यामध्ये मोठ्या उत्साहाने भाग घेतला आणि दलित समाजाची सेवा केली.

लाटवणकर बाबा यांचा परिचय थेट डॉ. बाबासाहेब आंबेडकरांशी परळ पोयबावडी येथील कार्यालयातून झाला. सर्व प्रकारचे चळवळीचे विचार विनिमय आधी परळ येथे होत असत व नंतर त्यांची कार्यवाही होत असे मग ते महाड येथील चवदार तळे बाटविणे असो किंवा काळाराम मंदिर सत्याग्रह असो नागपूर येथील बौद्ध धर्म दीक्षा समारंभ असो इतर सामाजिक प्रश्नावर सभा चर्चासत्र डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे सुद्धा लाटवणकर बाबांशी विचार विमर्श व चर्चा करीत असत.

एक सामाजिक जिव्हाळयाचा प्रश्न म्हणजेच महार ज्ञातीतील लोकांनी गावातील मेलेल्या जनावरांचे मृतदेह वाहून नेण्याचे पिढीजात रूढी परंपरेनुसार सनातनीकडून लादलेली बंद करून मेलेल्या ढोरांचे मांस खाण्याचे सोडून दिल्याबद्दल श्री गणपत विठ्ठल कासारे (लाटवणकर) याना पत्र लिहून महार ज्ञातीतील लोकांच आभार मानले.

तसेच डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या पुढाकाराने वांद्रे विभागात महार ज्ञातीतील लोकांसाठी एक चांगली घरकूल योजना राबविली गेली. त्यांत लाटवणकर बाबांना एक प्लॉट मिळाला. त्यावर त्यांनी एक छोटेसे टुमदार बंगलेवजा घर बांधिले व ह्या घरकूल योजनेच्या शुभारंभ देखील डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या शुभ हस्ते करण्यात आला सदर योजनेतील घरे पूर्ण झाल्यावर त्याचे उद्घाटनदेखील डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या हस्ते करण्यात आले. ते देखील लाटवणकर बाबांच्या घरासमोरील पटागणात सदर घरकुल योजनेला कोकणस्थ महार कॉलनी

व आता कोकणस्थ को-ऑ-हौ. सोसायटी असे नामांतर करण्यात आले आहे. जेव्हा जेव्हा डॉ. बाबासाहेब आंबेडकर वांद्रे विभागात येत तेव्हा ते आवर्जुन लाटवणकर बाबांच्या घरी येत असत. बाबासाहेब व त्यांच्याबरोबर असणाऱ्या लोकांची जेवणांची सर्व सोय गणपत बाबा व त्यांची पत्नी श्रीमती सावित्री बाई गणपत कासारे (लाटवणकर) ही मोठ्या उत्साहाने पार पाडत असत. विशेष करून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना लाटवणकर बाबांच्या घरी बनविलेली सुक्या बोंबलाची झणझणीत चटणी व भाकरी ही त्यांना खुप आवडायची तसेच इतर मांसाहारी पदार्थ (खार दांडा येथे समुद्रकाठजवळ असल्यामुळे मासे मुबलक प्रमाणात मिळत असत.) म्हणून माशांची कढी, तळलेले मासे त्याचबरोबर इतर मांसाहारी पदार्थ बनविण्यात सावित्रीबाईंचा हातखंडा होता. त्यांच्या घरी आलेला पाहुणा पाहूणचार घेतल्याशिवाय पुढे जात नसे रस्त्याने जाणाऱ्या तहानेने व्याकुळ झालेल्या जीवांना पाणी पिण्यासाठी आसरा येथेच मिळत होता.

सावित्रीबाई गणपत कासारे (लाटवणकर) या कोकणातील मु. सुसविरी ता-महाड जि. रायगड हे त्यांचे माहेर त्यांचा जन्म स्वातंत्र्यपूर्व पाकिस्तानातील कराची येथे झाला. वडील परशूराम शिर्के हे महार रेजिमेंटमध्ये होते म्हणून मिलिटरीत असताना त्यांची पोस्टींग कराची येथे झाली असताना सावित्रीबाईंचा जन्म झाला. वडील मिलीटरीत असताना जागोजागी बदली होत गेल्यामुळे सावित्रीबाईना शिक्षण घेता आले नाही पण अक्षर ओळख नसून ही लाटवणकर बाबांची पत्नी म्हणून त्यानी केलेल्या समाज प्रबोधनात त्याही त्याना प्रोत्साहित करीत व मदत करीत असत.

कोकणस्थ महार कॉलनीला त्या काळात स्वतंत्र कार्यालय नव्हते. याकरिता लाटवणकर बाबा यांनी आपल्या घरातील दर्शनी भागातच कार्यालयास परवानगी दिली. भय्यासाहेबांचा या घराशी लहानपणापासूनच संबंध आला होता. ते सोसायटीचे चेअरमन झाल्यावर तर तो अधिकच घट्ट झाला.

तसेच 'बॉबी' उर्फ प्रकाश आंबेडकरांचा जन्म झाल्यावर ते लहान असताना त्यांचाही सांभाळ सावित्रीबाईंनी केला आहे. मीराताई बॉबीला लाटवणकरांच्या येथे ठेवून नारायणराव तुळसकरांच्या घरी समोरच आपल्या मावस बहिणीस भेटावयास जात असत.

लाटवणकर बाबा हे अतिशय प्रेमळ व शिस्त प्रिय म्हणून परिसरातील लोकांना परिचित होते लाटवण गावची भावकी, सगे, सोयरे, मित्र आप्तेष्ट समाजबांधव हे गावावरून जर मुंबईला आले तर ते लोक आवर्जुन आपल्या लाटवणकर बाबांच्या बंगल्यावरच उतरत असत व त्यांचा खाण्यापिण्यासह राहाण्याची सोय पाहुणचार लाटवणकर बाबा हे आपले कर्तव्य समजत असत व त्यांची पत्नी सावित्रीबाई येणाऱ्या पाहुण्यांचा पाहुणचार मोठ्या मनाने सज्ज असत. लाटवणकर बाबा हे त्याच्या गावात फार लोकप्रिय होते. आपल्या समाजातील लोकांच्या समस्या सोडवण्यात ते नेहमी अग्रेसर असत. लाटवण गावातील बुद्ध प्रतिमेची स्थापन त्यांच्या पुढकारांने व प्रयत्नाने कार्यक्रमाचे अध्यक्षस्थान स्विकारून करण्यात आली. अनेक वर्षे त्यांनी भावकीचे अध्यक्ष

म्हणून काम पाहिले. नात्यागोत्यातील अनेक मुलामुलींची लग्ने त्यांच्या पुढाकाराने लावली गेली. ती आजही सुखासमाधानाने नांदत आहेत याचबरोबर लाटवण गावातील इतर समाजाचे लोकदेखील त्यांच्या समस्या घेऊन लाटवणकर बाबा यांच्याकडे येत असत. त्यांच्या समस्यांचे निराकरण करून त्यांच्या सुखदु:खात अडीअडीचणीत त्यांना मदत करीत असत.

गणपत विठ्ठल कासारे (लाटवणकर) हे मुंबईत आले तेव्हा त्यांची परिस्थिती अत्यंत बिकट होती. मुंबईतील एका मिलमध्ये त्यांनी रंगारी नोकरी केली नोकरी करता करता त्यांना रंगकामात निपूणता मिळविण्यात यश आले व अल्पावधीतच रंगकामाचे कॉन्ट्रॅक्टर म्हणून ते प्रसिद्धीस आले. समाजातील एक श्रीमंत व प्रसिद्ध व्यक्ति म्हणून उदयास आले. बडोद्याचे महाराज सयाजीराव गायकवाड यांचा राजवाडा रंगविण्यासाठी त्यांना निमंत्रण देण्यात आले. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे दादर येथील राजगृह हे निवास स्थान रंगविण्याचे भाग्य त्यांना लाभले. जयपूर, कानपूर येथील राजवाडे संस्थानिकानी त्यांना रंगविण्यासाठी बोलावले. मुंबईतील फोर्ट येथील सिद्धार्थ महाविद्यालय वडाळा येथील डॉ. आंबेडकर कॉलेज तसेच मुंबईतील अनेक इमारती, बंगले, कार्यालये रंगविण्याचे काम त्यांना मिळाले. त्यामुळे त्यांच्याकडे अमाप संपत्ती आली पण कधी लाटवणकर बाबानी या गोष्टीचा गर्व केला नाही. नेहमी साधा पोशाख, पांढरे शुभ्र धोतर, पांढरा शर्ट, काळा कोट व काळी टोपी असा पोशाख ते नेहमी करीत त्यांच्या निवासस्थानी त्यांनी लॉन्ड्रीचा व्यवसाय चालू केला होता. तसेच परेल दादर या ठिकाणी हॉटेल विकत घेतले होते.त्यांच्या कुटुंबातील व्यक्तिंच्या आजारपणाबाबत मोठमोठ्या डॉक्टरांची वैद्यकीय मदत घेतली जात असे. चांगल्या नावाजलेल्या शाळेत त्यांची मुले शिकत असत. त्यांचा मुलगा शशीकांतचे शिक्षण लोणावळा येथील गर्भ श्रीमंत मुले शिकत असलेल्या नावाजलेल्या बोर्डींगमध्ये झाले होते.समाजातील लोकांना नेहमी सढळ हस्ताने मदत करणाऱ्या डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या चळवळीमधील एक आधारस्तंभ, वांद्रे विभागातील एक गर्भ श्रीमंत अशा या असामान्य समाजसेवकाचे उत्तरायुष्य मात्र खूप दारिद्र्यामध्ये गेले आजारपण व उतारवयोमानाप्रमाणे शरीराने साथ दिल्याने त्यांच्या असलेल्या रंग व्यवसायाला उतरती कळा लागली. त्यामुळे स्वत:चे बंगलेवजा घरामध्ये भाडोत्री ठेवण्याची पाळी आली. उदरनिर्वाहासाठी काही दुकाने बांधून भाडे तत्त्वावर देण्यात आली व आपल्या कुटुंबाच्या उदरनिर्वाह त्या भाड्यापासून मिळणाऱ्या पैशातून करावा लागला. इतकी नामुष्कीची वेळ लाटवणकर बाबांवर आली.पण लाटवणकर बाबांनी कुणासमोर हात पसरले नाहीत. वयाची पंचाहत्तर वर्षे ते निष्कलंक, निस्वार्थी व स्वाभिमानी जीवन जगले. त्यांचा मृत्यू दिनांक २७/७/७५ रोजी झाला. त्यांची जेष्ठ कन्या वत्सला धोंडू लोखंडे ह्यांचा ही आकस्मिक अल्प आजाराने मृत्यू झाला. तिचे पती धोंडू पिठाजी लोखंडे यांचाही मृत्यू झाला. लोखंडेचे पुत्र गिरीश हे सर्व जबाबदाऱ्या सांभाळत आहेत.

याच सुमारास त्यांचे एका जवळच्या नातेवाईकाने लाटवणकर बाबांच्या पत्नी सावित्रीबाई गणपत कासारे यांच्याकडे एक योजना मांडली की तुमचे टुमदार घर मोडून एक बंगलेवजा

इमारत बांधून त्या इमारतीत आता वापरत असलेल्या जागेपेक्षा मोठ मोठे प्लॅट मिळतील व सात पिढ्याना पुरेल इतका नफा होईल असे खोटे आश्वासन देऊन फसगत केली. त्यांच्या संपूर्ण कुटुंबाची कुचंबणा केली हा मानसिक ताण सहन न होऊन सावित्रीबाईचे हे दिनांक १९/१२/८६ रोजी निधन झाले. त्या ७५ वर्षाच्या होत्या. दोन विवाहित मुली व मुलगा शशीकांत हे होते. द्वितीय मुलगी लक्ष्मी बाबूराव दरेकर हिचे पतीही निधन पावले त्याचे पुत्र आनंद व शिरिष हे गणपत निवास येथे रहात आहेत. तृतीय कन्या मंजुळा सजन जाधव यांचेही अल्पशा आजाराने निधन झाले. पाठोपाठ शशीकांत यांचे ही निधन झाले.

बाबासाहेब आंबेडकरांच्या पदस्पर्शाने पुनीत झालेल्या वास्तूचे जतन करणे हे आपले कर्तव्य आहे असे मानून त्यांची नातवंडे गिरीश, आनंद व शिरीष रहात आहेत.

# दि. गोविंद संभू आतळेकर

दिवंगत गोविंद संभू जाधव (आतळेकर) यांचा जन्म १९०५ साली ता. दापोली जिल्हा रत्नागिरीतील आतळे गावी झाला. त्याना मालू संभू जाधव, विश्राम संभू जाधव आणि एक बहीण अशी भावंडे होती. गावी थोडी शेती होती. निर्वाहासाठी ते मुंबईला आले नवा मळा येथे त्यानी एक झोपडी बांधली व तेथे आपल्या परिवारासह राहू लागले आताची कोकणस्थ कॉलनी दिवंगत सखाराम भिकू धोत्रे, धर्माजी सोनू जाधव (घाटिवले) आदि कार्य कर्त्यांच्या सहाय्याने अस्तित्वात येण्याच्या प्रयत्नात त्यांचा ही फार मोठा वाटा आहे.

वांद्रे विभागात १९२७ च्या महाड चवदार तळ्याच्या सत्याग्रहाच्या तयारीच्या ज्या ज्या बैठका झाल्या त्याच्या आयोजनाचा विचार विनिमय करण्याच्या बैठका मा. आतळेकरांच्या निवासस्थानी झाल्या. १९४१ साली गणपत विठ्ठल कासारे यांच्या निवासस्थानी महार ज्ञाती पंचायत समितीची स्थापना झाली आणि या विभागाचे सुपरवायझर (गट प्रतिनिधी) होण्याचा पहिला बहुमान त्यांना मिळाला. त्यांचे शिक्षण मराठी चौथी पर्यंत झाले होते. त्यानी माटुंगा रेल्वे वर्कशॉप येथे नोकरी केली व मिलिटरी एम.एस. ऑफिसर झाले वयाच्या ५१ व्या वर्षी ते सेवा निवृत्त झाले.

''सुपरवायझरना'' देण्यात येणारे अधिकार पत्र 'महार ज्ञाती पंचायत' समिती मुंबई यांच्या वतीने त्यांना देण्यात आलेले आहे. त्या अधिकार पत्रावर कौन्सिल अध्यक्ष शंकर लक्ष्मण वडवलकर यांची तर चिटणीस म्हणून चांगदेव नारायण मोहिते यांची सही आहे. सदर अधिकारपत्र तारीख १६/६/१९४७ रोजी देण्यात आले आहे.

त्यावरील कामे व अटी खालीलप्रमाणे-

१) मला संस्थेकडून 'सुपर वायझर' म्हणून अधिकारपत्र मिळाल्यापासून माझ्या चांगल्या कामगिरीबद्दल कौन्सिल सभेस खात्री पटवीन असे न झाल्यास संस्थेकडून माझे अधिकारपत्रक रद्द करण्यात येईल हे मी सदैव लक्षात ठेवीन.

२) वर्षातून ६ वेळा स्थानिक पंचास भेट

३) पंचायतीचे दप्तर नियमाप्रमाणे ठेवले किंवा नाही ते पाहाणे

४) शेरे पुस्तकात शेरे देणे

५) जमाखर्च पाहाणे

६) पैशांची अफरात फार अगर पंच कमिटीत बेबनाव झाल्यास समितीस कळविणे.

७) तंटा, भांडण, अगर अन्य भानगडी मिटत नसल्यास समितीस कळविणे

८) समितीच्या ऑफिसमध्ये प्रत्येक महिन्याचा रिपोर्ट पाठविणे

मला वरील कामे व अटी मान्य आहेत.

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या रस्त्याला १९४८ साली नाव देण्यात आले. पूर्वाश्रमीच्या त्या रस्त्याला 'पाली दांडा' रोड असे नाव होते त्यावेळचे स्वतंत्र मजूर पक्षाचे तिकीटावर मा. दिवंगत ठुणाजी तुकाराम शिर्के, दि. नारायण भिकू असगोलकर दि. चांगदेव नारायण मोहिते (गुरूजी) दि. अर्जुन राम चंद्र भोसेकर या नगरसेवकांनी बांद्रा म्युनिसीपालिटीत १९४५ साली ठराव मांडला होता संबंध भारतातील पहिला व डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या जिवंतपणी झालेला हा रस्ता या करिता विचार, विनिमय सर्व महार ज्ञाती पंचायत समितीच्या शाखांमध्ये फिरून जागृती करून वर्गणी जमविणे, बैठका घेणे, आयोजन करणे, निधी गोळा करणे तत्कालिन रोड कमिटीकडे सुपूर्द करणे त्याची नोंद ठेवण्याचे महत्त्वपूर्ण काम ''सुपरवायझर'' या नात्याने दिवंगत संभू आतळेकर यानी केलेले आहे.

या समाज सेवेमध्ये त्यांच्या सुविध, सुशील सहचारिणी दिवंगत सखूबाई गोविंद जाधव यांची त्यांना साथ मिळाली. त्यांच्या परिवारामध्ये पांडुरंग गोविंद जाधव यांनी आपल्या पित्यांचा वारसा समाजामध्ये चालविला. त्यांच्या सूनबाई सुमित्रा पांडुरंग जाधव या बौ. प.स. शा.क्र १४८ मध्ये महिला मंडळाच्या धडाडीच्या, वाकपटू व चतूर अशा कार्यकर्त्या होत्या डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या जंयतीमध्ये पाळणा गीत हे मधूर आवाजात सुश्राव्य पद्धतीने गाण्यात त्यांचा हातखंडा होता. आतळेकर बाबांचा पुत्र व सून आता ह्यात नाहीत परंतू आपल्या आजोबांच्या कार्याचा वसा घेतलेली त्यांची नातवंडे विजया, सुरेखा, सुधा, वनमाला, संगिता, अशोक, सुनिता हा परिवार आज कार्यरत आहे. त्या काळात धोतर, कोट, टोपी, बूट घालणाऱ्या रूबाबदार, निष्ठावान कार्यकर्त्यांमध्ये दिवंगत गोविंद संभू जाधव (आतळेकर) यांचे कार्य महत्त्वपूर्ण ठरले आहे.

त्यांचा मृत्यू दिनांक ५ ऑगस्ट १९७५ साली कोकणस्थ गृहनिर्माण संस्था आतळेकर हाऊस १८ वा रस्ता खार पश्चिम येथे झाला.

# काश्या विठ्ठल मोरे (गोडावले)

''महापालिकेचा संप आणि काश्या विठ्ठल प्रकरण'' या नावाचा लेख प्राध्यापक रमाकांत यादव सरांनी मुंबई महापालिकेने प्रकाशित केलेल्या ''डॉ. बाबासाहेब आंबेडकर जयंती विशेषांक सन २००७'' या अंकात पृष्ठ क्र.११५ ते ११८ वर प्रकाशित झाला आहे तसेच साहित्यिक ज.वि.पवार यांचाही एक लेख -''डॉ. बाबासाहेब आंबेडकर व मुंबई महानगरपालिका'' या नावाच्या लेखामध्ये पृ क्र.६० वर ''काश्या विठ्ठल''या सफाई कामगारांचा उल्लेख आला आहे. त्या अनुषंगाने ''काश्या विठ्ठलच्या व त्यांच्या सहकाऱ्यांचा हा घेतलेला संपकाळातील शोध....

१९३४ साली मुंबई महानगरपालिकेतल्या निम्नश्रेणी कामगाराची ''म्युनिसीपल कामगार संघ'' ही युनियन डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी स्थापन केली. जुने पशूवधगृह (स्लॉटर हाऊस) हे १८८५ साली उपनगरातील वांद्रे विभागात आले आणि निम्नश्रेणी (चतुर्थ) सफाई कामगार म्हणून पशुवध गृहात वांद्रयातील लोक काम करू लागले.

कामगार संघाचे पुढारी पी.टी. बोराळे, जे.जी भातणकर, मडके बुवा, जी.जे.माने, एस.बी जाधव, बी. जे देवरूखकर आदि विश्वासू नेते वांद्रे येथील पशुवध गृहात येत होते. वांद्रयातील कामगारांचे प्रतिनिधी दगडू सावंत, एम.डी. जाधव, संभू राघो दाभोळकर दगडू हिरू जाधव, येशा तुक्या आदि होते त्यांच्या बैठका माहिम येथील वखारीच्या परिसरात होत असत.

काशा विठ्ठल मोरे यांच्या वडील विठ्ठल मोरे ह्याना चार भाऊ होते. विठ्ठल, धर्मा, सखाराम, (बारक्या )

१) काशा याना रत्तू (रत्नू) नावाचा मुलगा होता.

२) धर्मा यांना गणपत, झिनू (जनार्दन) बळी, रामदास भिकन व इंदू ह्या मुली होत्या

३) सखाराम-शिवराम, नामूबाई, भागीबाई

४) बारक्या- २ मुली चंद्रभागा व इंदू

काशा हे निर्भीड, धाडसी, हजरबाबी, फटकळ स्वभावाचे होते. बाबासाहेबांच्या विचारांवर कार्यावर त्यांची अढळ श्रद्धा होती. एखादे काम त्यानी हाती घेतली की ते तेडीस नेत असत. माता रमाबाई आंबेडकर व्यायाम शाळेत मानकर यांच्या आखाड्यात त्या काळी चालणाऱ्या लाठी, काठीचे शिक्षण त्यांनी घेतले होते बौ.प. समिती शाखा क्र.१३३ मध्ये ते मुद्देसूद बोलणारे होते त्यामुळे महानगरपालिकेने कामगारांच्या अनेक मागण्या मान्य केल्या पण कारवाई होत नव्हती. म्हणून ११ मार्च १९४९ रोजी तत्कालीन आयुक्त बी. के. पटेल यांना नवीन मागण्याचा खलिता पाठविला महागाई भत्ता, मोफत निवासस्थान, घर नसलेल्याना घरभत्ता,

दैनिक वेतन कामगार पद्धतीला बंदी करूनही शासन लक्ष देत नव्हते म्हणून १३ एप्रिल १९४९ रोजी महापालिकेस संपाची नोटीस देऊन १३ मे १९४९ रोजी कामगार संपावर गेले व संघर्षाला सुरूवात झाली. १५ मे पर्यंत कामगार कामावर हजर न झाल्यास त्यांचा पगार जप्त करणे, नोकरीवरून काढून टाकणे, वसाहतीतून हाकलून लावणे, गुन्हेगारी स्वरूपाच्या केसेस दाखल करणे, स्त्री-पुरूष कार्यकर्त्यांना अटक करणे असे सत्र सुरू केले. मुंबई राज्याचे तत्कालीन मुख्यमंत्री बाळासाहेब खेर, गृहमंत्री मोरारजी देसाई मुंबईचे महापौर स.का.पाटील एकत्रितपणे संपाची परिस्थिती हाताळत होते.

५ जुलै १९४९ रोजी न्यायमूर्ती आर. एस. बावडेकर व न्यायमूर्ती एच. के. चैनानी यांच्या खंडपीठापुढे याचिकेची सुनावणी झाली आणि न्यायमूर्तींनी ऐतिहासिक निर्णय दिला. कामगार महापालिकेस रितसर नोटीस देऊन संपावर गेले. त्यामुळे त्या कामगारांची त्वरीत सुटका करावी व खटल्याचा सर्व खर्च पोलीस खात्याने अर्जदारास द्यावा.

संप काळात कामगाराविरूद्ध फौजदारी खटले भरण्यात आले व त्यांना प्रत्येकी तीन महिन्यांची सक्त मजुरीची शिक्षा झाली त्यामध्ये बांद्रा येथील संपावर असलेल्या सफाई कामगार काशा विठ्ठल मोरे (गोडावले) एम. डी. जाधव (निळीकळर) दगडू हिरू जाधव (भरणकर) यांना अटक करण्यात आली. दगडू सावंत भूमिगत झाले. अटक करण्यात आलेल्या वांद्रयातील तिघांवर फौजदारी खटला भरण्यात आला. आरोपी तर्फे नौशिर भरूचा यांनी बाजू मांडली व त्वरीत निर्दोष मुक्तता करावी अशी मागणी केली. परंतू चीफ मॅजिस्टेटने दोषी ठरवून तीन महिन्याची सक्त मजुरीची शिक्षा कायम केली. १३ ऑगस्ट १९४९ रोजी मुंबई उच्च न्यायलयात अपील केले. त्याची सुनावणी न्यायमूर्ती एम.सी छगला व न्या. पी. बी. गजेंद्र गडकर यांच्या खंडपीठासमोर झाली उच्च न्यायलयाच्या निर्णयाने अत्यावश्यक सेवेतील कामगारांच्या संपाच्या हक्कावर शिक्का मोर्तब झाले. आपल्या हक्कासाठी कायद्यातील तरतूदीचे योग्य प्रकारे पालन करून कामगार मग तो अत्यावश्यक सेवेतील असला तरी संपावर जाऊ शकतो. सफाई कामगारांनाही ह्या हक्कापासून वंचित करता येणार नाही म्हणून सफाई कामगार काश्या विठ्ठल निर्दोष आहे व त्याची तीन महिन्याची सक्तमजुरीची शिक्षा रद्द करण्यात येत आहे असा महत्त्वपूर्ण निर्णय दिला.

संपकाळात मुंबई म्युनिसीपल कामगार संघाच्या नेतृत्वाखाली सफाई कामगारांचे संघटन, संघाच्या , ऐक्य, चिकाटी व जिद्द यांचे नेत्रदिपक दर्शन घडले ज्यांच्या हाती सामाजिक परंपरेने केरसुणी दिली होती तिचे रूपांतर संप काळात बंडाच्या निशाणात झाले. त्या प्रदीर्घ संपाने कामगार चळवळीला नवे परिणाम नवी दिशा दिली आणि कामगार चळवळीच्या इतिहासात एक लढाऊ पर्व निर्माण झाले. त्या काश्या विठ्ठल वांद्रे विभागाचे नाव अमर झाले.

## विठ्ठल शिवराम पेडामकर

दिवंगत विठ्ठल शिवराम पेडामकर हे चुर्मम व्हिलेज मधील स्थानिक रहिवाशी होते. त्यांच्या पत्नीचे नाव लाडीबाई असे होते. त्यांना एकुलती एक कन्या होती. तिचे नाव भिकन असे होते. भिकनचा विवाह भेलेकर यांच्याबरोबर झाला होता. त्यांना मुलगा नसल्याने भेलेकर व भिकन या पती पत्नीने पेडामकर यांची सेवा केली.भिकन याना तीन पुत्र व चार कन्या झाल्या. विठ्ठल शिवराम पेडामकर हे रेल्वेमध्ये काम करीत असत. परंतू पिढीजात सुतार कामाची त्यांना कला अवगत होती. त्यामुळे ह्या काळातील लोकांमध्ये त्यांना मान होता आणि चार पैसे ही गाठीशी होते.

बाबासाहेबांच्या राजकीय, सामाजिक, शैक्षणिक चळवळीचे ते समर्थक होते. शेड्युल्ड कास्ट फेडरेशन, स्वतंत्र मजूर पक्ष, देवी रमाई बोर्डिंग, जनता पत्राचे ते वर्गणीदार होते.

दि. ११/१२/२७ रोजी नवी पाली येथे महाडच्या चवदार तळ्याच्या सत्याग्रहाच्या तयारीची सभा झाली. त्या सभेचे अध्यक्ष होते डॉ. बाबासाहेब आंबेडकर या सभेमध्ये पंच शाखानी मदत आर्थिक स्वरूपाची दिली. त्यावेळी विठ्ठल शिवराम पेडामकर यानी वयैक्तिक रितीने १०० रूपये देणगी दिली आणि वांद्रे परिसराच्या इतिहासात आपले नाव अजरामर केले. आपल्या पती प्रमाणेच त्यांच्या पत्नी लाडीबाई यानी देखील इमारत फंडाच्या देणगीदारामध्ये तितकेच दान दिले आहे. इम्प्रुव्हमेंट ट्रस्टने प्रकाशित केलेल्या अहवालात त्यांच्या नावाची नोंद आढळते. सिद्धार्थ कॉलेजमध्ये बाबासाहेबांच्या उपस्थित स्थापन झालेल्या पहिल्या महिला मंडळामध्ये त्यांचा समावेश करण्यात आला होता. वार्धाक्यामुळे विठल सिवराम पेडामकरयांचे निधन झाले.

# दिवंगत शंकर लक्ष्मण वडवलकर

दिवंगत शंकर लक्ष्मण वडवलकर हे बाबासाहेब आंबेडकरांच्या चळवळीतील एक अग्रगण्य नाव आहे. देवकाबाईची मुलगी शांताबाई या ट्रेड शिक्षिका होत्या त्यांचे शंकरराव हे पती होते. ते कोर्टात बेलीफ या पदावर काम करीत होते. निर्भिड, निस्वार्थी आणि प्रामाणिक पणामुळे त्यांच्यावर बाबासाहेबांचा विश्वास बसला. त्यामुळे बाबासाहेबांनी रिक्रुमेंट ऑफिसर म्हणुन त्यांची नेमणुक केली महार बटालियन या सैनिकासाठी प्रवेश घेण्याच्या बाबतीत शंकर वडवलकरांनी मार्गदर्शन केले.

महार ज्ञाती पंचायतीमध्ये डी.पी. गंब्रे, सी. एन. मोहिते गुरुजी आणि शंकर लक्ष्मण वडवलकर हे तीन महत्वाचे कार्यकर्ते होते. वडवलकर हे नायगांव मधुन नगर सेवकाची निवडणूक लढवुन निवडणूक लढवून निवडुन आले. त्यांनी लोकोपयोगी कामे केली.

कोकणस्थ कॉलनी खार १८ वा रस्ता येथे आता असलेल्या बीकॉन इग्रजी शाळेच्या ठिकाणी त्यांचे घर होते. शंकरराव वडवलकरांना दोन अपत्ये झाली. एक पुत्र व एक कन्या त्यापैकी कन्या (ललिता) अमेरिकेमध्ये स्थायिक झाली आहे. तर गोवंडी येथील टीचर्स कॉलनीमध्ये सुधीर शंकरराव वडवलकर हे रहातात.

शंकररावांचे मित्र दहिवलकर बुवा हे देखील त्याकाळातील संस्कृत भाषेवर प्रभुत्व असलेले महार समाजातील कार्यकर्ते होते. महार ज्ञाती पंचायती मध्ये सी एन मोहीते गुरुजी (पोयनारकर) शंकर लक्ष्मण वडवलकर आणि डी–पी–गब्रे यांना महत्वाचे स्थान होते. शंकरराव वडवलकरांनी समाजामध्ये शिक्षणाचा प्रचार व्हावा यावर जास्त भर दिला. समाजातील अनिष्ट प्रथा, अंधश्रध्दा या विरोधात खुप काम केले. समता सैनिक दल, स्वतंत्र मजुर पक्ष, शेड्युलकास्ट फेडरेशन आदि बाबासाहेबांच्या संघटना मजबुत करण्यावर भर दिला. वृद्धापकाळामुळे त्यांचे निधन नायगाव (दादर) येथे झाले.

# दिंवगत गंगाराम घारु कदम (मारवजनकर)

गंगाराम घारु कदम (मारवजनकर) यांचा जन्म मु. मारवजन ता. संगमेश्वर जि. रत्नागिरी येथे झाला. घरची परिस्थिती बेताचीच होती. गांवी वडिलोपार्जित थोडी शेती होती. अस्पृश्यता पाळली जात होती. नोकरीच्या शोधांत गंगाराम घारु कदम व हरी घारु कदम हे मुंबईस आले. आणि वांद्रे येथील नांगावाडीत त्यांनी एक झोपडे बांधले नांगावाडीत किसन रामजी मर्चंडे हे त्यांचे जिवलग मित्र होते.

गंगाराम घारु कदम हे सैन्यांत दाखल झाले आपल्या पुर्वजांप्रमाणे युद्धात पराक्रम गाजवत असताना गोळी लागून ते जखमी झाले. त्यांना इंग्रज सरकारने कुलाबा येथील ''अश्विनी'' या रुग्णालयात भरती केली. त्यांच्यावर यशस्वी शस्त्रक्रिया झाली. दुसरे महायुद्ध सुरु असल्यामुळे तिथूनच त्यांना पुन: लढाईत पाठविण्यांत आले. १५ वर्षांची सैनिकी सेवा केल्यानंतर ते सेन्यांतून निवृत्त झाले.

त्यांचे मित्र किसन रामजी मर्चंडे ( बिजघरकर) यांनी त्यांना जी.आय.पी. रेल्वेमध्ये कामाला लावले. सैन्यातील कडक शिस्तीमुळे त्यांच्या स्वभावर देखील करडा होता. त्यांना खोटेपणा खपत नस. वांद्रे विभागांत बाबासाहेबांची चळवळ जोरांत सुरु होती ठुणाजी तुकाराम शिर्के व नारायण भिकु आसगोलकर हे स्वतंत्र मजुर पक्ष आणि शेड्युल्डकास्ट फेडरेशन या संघटनेंचा प्रचार करीत होते.

त्या कार्यांत गंगाराम घारु कदम व हरि घारु कदम या दोन्ही भावांनी स्वत:ला झोकून दिले. त्यांना व्यायामाची आवड होती. वांद्रे विभागात प्रसिद्ध असलेल्या बावन डाववाला भाग्या यांच्या आखाड्यात दांडपट्टा, छडीपट्टा, बनाठी, लाठी काठी शिकले.

१९२७ साली नवी पाली या ठिकाणी महाडच्या चवदार तळ्याच्या सत्याग्रहाची सभा झाली. त्या सभेत वांद्र्यातील बरेच लोक सहभागी झाले होते. अनेक लोकांनी महाडच्या चवदार तळ्याच्या सत्याग्रहांत भाग घेण्यासाठी आपली नांवे तेथेच नोंदवली. आणि मदत निधीच्या रुपाने स्वखुशीने दिली. त्यांत गंगाराम घारु कदम हे देखील सहभागी झाले. महाड या ठीकाणी सवर्णांनी अस्पृश्य समाजावर हल्ला केला. दगड फेक केली. त्यात गंगाराम घारु कदम रक्त बंबाळ झाले. बाबासाहेब लोकांना शांत करीत होते. गंगाराम कदम यांना ओळखणारा एकजण म्हणाला ''गंगाराम अरे तू सैन्यातला माणुस बावन डाववाल्या भाग्याच्या आखाड्यातला आणि असा मार का खातोस ? तुला रक्तबंबाळ केले असतांना तू शांत रहातोस ?''

त्यावर गंगाराम कदम यांनी उत्तर दिले ''मी हुकुमाचा ताबेदार आहे. जो पर्यंत माझे बाबा मला हुकुम देत नाहीत तो पर्यंत मी लाठीला हात घालणार नाही. मेलो तरी बेहत्तर.'' इतकी

जाज्वल्य निष्ठा बाबासाहेबांच्यावर त्यांची होती.

(२) त्यानंतर ते समता सैनिक दलांत सामील झाले. समता सैनिक दलामध्ये देखील ते उच्चपदावर गेले त्याना प्रमाणपत्र मिळाले ते बाबासाहेबांच्या हस्ते.

(३) महाडच्या समता संगरामध्ये ते सामील झाले. भगवान बुद्धांच्या सन्मार्गानिप्रमाणेच त्यांनी आचरण केले त्यामुळे त्यांना चांदीचे पदक आणि सन्मानपत्र अर्पण करण्यात आले.

शाखा क्रं. ४० मध्ये ते अध्यक्ष या पदावर नियुक्त झाले होते महार ज्ञाती पंचायतीची त्यांनी सेवा केली सामाजीक कार्याची त्याना आवड होती. रेल्वेमध्ये असल्यामुळे सखाराम भिकु धोत्रे (विरसईकर) यांच्याशी त्यांचा परिचय झाला दांडा स्मशानभुमीला दगडगोट्यांची बांध घालून आपली हद्द निश्चित करण्यामध्ये त्यांनी महत्व पूर्ण काम केले आहे. सामाजीक ऋण मान्य करुन बारा पाखाडयांच्या सेवेसाठी सर्वप्रथम त्यांनी शववाहिनी आणि दोन पेट्रोमॅक्स (गॅस बत्त्या) दान म्हणुन स्मशानभुमीस दिल्या. परंतु गंगाराम घारु कदम (मारवजनकर) यांनी केलेल्या या पुण्य कर्माची आठवण आज कुणालाच राहिली नाही हे दुर्देव आहे बौद्ध स्मशानभुमीचे ते सल्लागार होते दुसरी शववाहिनी त्यांनी सांताक्रुझ येथे दिली.

गावावरुन आलेल्या आपल्या नातेवाईकांना रहाण्यासाठी जागा, झोपडी बांधण्यासाठी मदत, नोकरी आर्थिक मदत त्यांनी केलेली आहे वयाच्या ८० व्यावर्षी त्यांचे वार्धक्यामुळे निधन झाले.

# दिवंगत किसन रामजी मर्चंडे (बिजघरकर)



किसन रामजी मर्चंडे (बिजघरकर) यांना बंदुकवाले या नावाने देखील संबोधले जात असे. ते बाबासाहेबांच्या चळवळीतील एक धडाडीचे कायकर्ते होते. ते रेल्वेमध्ये मुकादम या पदावर कामकरीत होते. त्यांनी नांगावाडी येथे आपले स्वतंत्र घर बांधले होते. त्यांना फक्त एक मुलगी होती मुलगा नव्हता परंतु मुलीवर त्यांनी मुलाप्रमाणे प्रेम केले.

गंगाराम घारु कदम यांच्याबरोबर त्यांचे घरोब्याचे संबध होते. ते इतक्या जवळचे होते की किसन रामजी मर्चंडे व गंगाराम घारु कदम चहा देखील अर्धा पित असत दोन्ही भाऊ आणि किसन मर्चंडे हे बावन डाववाल्या भाग्याच्या आखाड्यात त्यांनी लाठी काठीचे शिक्षण घेतले आणि ते संख्या भावाप्रमाणे रहात असत. किसन मर्चंडे यांनीच कदम यांना लष्करातून निवृत्त झाल्यानंतर रेल्वेमध्ये नोकरीस लावले.

शाखा क्र. ४० चे आधारस्तंभ होते मार्गदर्शक होते. त्यामुळे त्यांचा विभागात फार दरारा होता ते गंगाराम घारु कदम यांचा सहकारी म्हणुन ओळखले जायचे. त्यांनी समता सैनिक दलात भाग घेतला होता डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या प्रत्येक मिटींगमध्ये त्यांची उपस्थिती असल्यामुळे चळवळीमध्ये शेडयुल्ड कास्ट फेडरेशन स्वतंत्र मजुर पक्ष यांचा प्रसार प्रचाराच्या कार्यात त्यांनी महत्वपूर्ण योगदान दिले वांद्रे विभागातुन चवदार तळयांच्या संगरामध्ये जो संघर्ष झाला आणि गंगाराम घारु कदम जखमी झाले त्या घटनेचे ते एकमेव साक्षीदार होते व ते सावलीसारखे त्यांच्या बरोबर राहिले होते त्यांना ही प्रशस्ती पत्रक मिळाले होते.

त्यांचे सहकारी काशिराम शिवराम मर्चडे, बारकु शिचराम मर्चंडे, राघो मर्चंडे यांना नोकरी रेल्वेमध्ये लावुन रहाण्यास जागा दिली. तसेच लक्ष्मण बाळु सावंत, रामा सांवत यांना शाखेचे कार्यकर्ते केले.

- तुकाराम गणू मोहिते पाचरडकर यांनाही ही रेल्वेमध्ये लावले. वार्धाक्यामध्ये त्यांचे तारीख १२/७/१९६५ रोजी निधन झाले. आणि नागावाडीतील एक भिमसैनिक लढावू बाण्यांचा हरपला.

सदर माहिती समेश लक्ष्मण सावंत यांनी दिली.

# दिवंगत एन आर. जाधव (तुळसकर)

दि. एन. आर. जाधव यांचे पूर्ण नावं नारायण रामजी जाधव (तुळसकर) असे होते. १९१२ साली सप्टेंबर महिन्यांत त्यांचा जन्म झाला त्यांना सदाशिव व शंकर या नावांचे दोन भाऊ होते. नारायणरावांचे शिक्षण एस. एस.सी पर्यंत झालेले होते.

त्यांचे मामा सखाराम भिखु धोत्रे (इरसेकर) हे त्यावेळचे बांद्रा- खार भागांतील एक पुढारी होते त्यांचे पाठबळ दिवंगत नारायण जाधव यांच्या पाठीशी होते. १९३६ पूर्वी हा परिसर जंगलाने व्यापलेला होता. येथे झोपड्या बांधुन लोक राहु लागले. आजुबाजुस गांवठाणे होती उदा. चुमई व्हिलेज, राजन शेरली, पाली तशाच प्रकारे नारायणराव झोपडी बांधून राहू लागले.

त्यांचे बालपण अतिशय हालाखीच्या स्थितीत गेले. त्यांचे माध्यमिक शिक्षण ठाण्यांतील संभाजी तुकाराम गायकवाड आणि शिवराम गोपाळ जाधव यांनी चालविल्या विद्यार्थि आश्रमातुन झाले. व्ही. जी. वांद्रेकर, पी.जी. खेर ही काँग्रेस मधील प्रतिष्ठित मंडळीत जाधव यांची मित्र होती. विद्यार्थी आश्रमांतच त्यांना सामाजिक कार्याचे बाळकडू गायकवाड बाबा आणि जाधव बाबा यांच्याकडून मिळाले असल्याने त्यांनी समाजाच्या उन्नतीचे कार्य केले याच काळांत आपल्या इतर नातेवाईकांना त्यांनी खार येथील बांधलेल्या झोपडीत रहाण्यास बोलाविले. ते बँकेत नोकरीला लागले. सामाजिक कार्यकर्ते वैकुंठभाई मेहता यांच्या बरोबर त्यांचा स्नेह वाढला. मेहता मुंबई ईलाख्याचे अर्थमंत्री बनले. मेहता आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या सल्ल्याने कोकणस्थ महार कॉलनीची स्थापना केली व जिल्हाधिकाऱ्यांकडे भुखंडाची मागणी केली. महार कॉलनी, भंगी कॉलनी, चांभार कॉलनी अशा तीन समाजासाठी हा भुखंड देण्यात आला. महार कॉलनीस देण्यात आलेल्या भुखंडाचे दोन भाग करण्यात आले एक कोकणस्थ कॉलनी व एक डॉ. आंबेडकर कॉलनी त्यांनी कोकणस्थ कॉलनीच्या सेक्रेटरी पदाची धुरा सांभाळली व सोसायटीची जबाबदारी आपल्या शिरावर घेतली. सोसायटी मार्फत किराणा मालाचे दुकान काढुन लोकांना स्वस्त दरात धान्य उपलब्ध करुन दिले. सोसायटी मार्फत कर्ज देवून बारा लोकांना पक्की घरे बांधून दिली. हळु हळु हे काम वाढवत त्यांनी सहा चाळी बांधल्या ही बातमी बाबासाहेबांना समजली त्यांनी जाधव यांना शाबासकी दिली तेव्हापासून जाधव हे बाबासाहेबांचे एकनिष्ठ अनुयायी बनले.

१९५६ साली डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी बौद्ध धम्म स्विकारल्यानंतर त्यांनी आपल्या वसाहतीत सर्वांच्या श्रमदानातुन बौद्ध विहाराची स्थापना केली. महार कॉलनितील मुलांना खेळण्यास पटांगण, शाळा आदि सुविधा केल्या. बौद्ध सेवा समाज संघ दापोली मंडणगड या संस्थेची स्थापना करुन ते सचिव बनले. या संस्थेमार्फत त्यांनी रत्नागिरी जिल्ह्यांतील दापोली येथे बोर्डिंग

चालविली. पुढे ही बोर्डिंग त्यांनी पी.ए. सोसायटीला सुपुर्द केली. अंधेरी येथील टेडिंग्टन केमिकल्स सोसायटीत हिशोब तपासणीस म्हणून कामाला राहीले.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या मृत्युसंबधी चौकशी व्हावी म्हणुन दिवंगत रिपब्लीकन पक्षाचे माजी खासदार बी. सी. कांबळे यांनी पंडित जवाहरलाल नेहरु भारताचे पंतप्रधान यांना कैफियत सादर केली तशीच कैफियत ठाणे, कुलाबा आणि रत्नागिरी जिल्ह्यातील दलितांच्या वतीने वांद्रे विभागातर्फे भारताचे पहिले पंतप्रधान जवाहरलाल नेहरु यांना सादर केली ती खालील प्रमाणे

पंडित जवाहरलाल नेहरु

भारताचे पंतप्रधान,

नवी दिल्ली........यांसी

सन्माननीय पंडितजी,

मुंबईतील आपल्या आगमन प्रसंगी भेटण्याची संस्मरणीय संधी देवून तुम्ही आम्हाला उपकृत केले, याबद्दल आम्ही सदैव कृतज्ञ आहोत. आमच्या समाजाच्यावतीने तुमच्या या आगमनाचे आम्ही हार्दीक स्वागत करतो.

मुंबई प्रांताच्या कोंकणवासीय दलित- बौध्दजनांचे आम्ही प्रतिनिधी आहोत. हा विभाग डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या लढावु जीवनाची ''कर्मभुमि'' आहे. डॉ. आंबेडकर यांचे ज्ञाती बांधव व त्यांचे रक्ताचे नातलग यांची ही जन्मभूमी आहे. ठाणे, कुलाबा, आणि रत्नागिरी या तीन जिल्ह्यांनी व्याप्त असलेल्या कोकणातील दलित जनतेची ही कैफियत तुम्हाला सादर करण्याची कामगिरी आमच्याकडे दिलेली आहे.

तुम्हाला ज्ञात असेल की, हिंदुच्या धार्मिक आणि सामाजिक रुढीच्या जुलुमाचे गुलाम बनलेल्या सात कोटी दलित जनतेच्या हृदयांत त्याच्याबद्दल अतिव प्रेम वसत असल्यामुळे त्यांच्या प्रत्येक कृतीचे आम्ही उत्कंठतेने नेहमीच स्वागत केले. सचोटीच्या सत्‌शिष्याला शोभेल अशा अनुयायीपणाची जोड आम्ही त्यांना दिली. त्यांचा हरेक आदेश प्राणपणाने अंमलांत आणला आमच्या आकाक्षांनी त्यांचे जीवन भरले होते. त्यांना वैयक्तिक स्वरुपाचे असे जीवन नव्हतेच. आमचे सर्व संघसामर्थ्य त्यांच्या व्यक्तीमत्वांत आम्ही केद्रीभुत केले होते.

त्यांच्या आकस्मिक मृत्युने सर्व देशाला धक्का बसला. हा धक्का आम्हाला अधिक जाणवला. कारण ते मरण आमच्या रक्ताच्या पुढाऱ्याचे आमच्या बाबाचे होते.

# संशयी वातावरणात आलेला मृत्यू

त्यांच्या मृत्युची बातमी आम्हाला कळली तरी तासांच्या हिशेबांतही ती उशिरांच कळली होती. त्या बातमीने आम्ही जितके हादरला त्याहुन ती अधिक उशिरा मिळाली म्हणुन हादरुन गेलो आहोत. ६ डिसेंबर १९५६ रोजी त्यांचे मुंबईत रहाणारे एकुलते एक चिरंजिव यांनाही ही बातमी मुंबई नभोवाणीवरुन सांगितलेल्या बातम्यातुन समजावी हे किती अमानुष होय, श्रीमती माई आंबेडकर यांना आपल्या एकट्या सावत्र मुलाला त्यांच्या वडिलांच्या मृत्युची ही बातमी त्वरेने कळविण्यास कोणती अडचण आली असेल बरे! डॉ.बाबासाहेबांनी निर्माण केलेल्या कार्यसंस्थापैकी सिध्दार्थ महाविद्यालय ही एक प्रमुख संस्था आहे.तिथे सुद्धा ही बातमी दुपारपर्यंत अधिकृतरित्या कळविली गेली नाही हे कशाचे द्योतक आहे! डॉ. बाबासाहेबांच्या मृत्यूच्यानंतर कित्येक वृत्तपत्रांतून उठलेल्या बातम्यासुद्धा आमच्या मनात संशयाचे जाळे विणीत आहे.

एकंदर वस्तुस्थिती आणि वर सांगितलेली पार्श्वभूमी लक्षात घेतां डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या मृत्युच्यामागे काही विचित्र रहस्य असांवे असे तुम्हास नम्रता पुर्वक सांगावेसे वाटते. डॉ. बाबासाहेबांच्या मृत्युनंतरच्या घटनांची जी कुणकुण सर्वत्र ऐकावयास येते त्यावरुन या मृत्युची सरकारीरित्या अधिकृत चौकशी व्हावी व त्यांच्या संशयातीत मृत्यूचे स्पष्टीकरण व्हावे, अशी आमची मागणी होती संशयाला कारणीभूत होणाऱ्या काही घटना येणे प्रमाणे:-

१) अलिकडील काही वर्षांमध्ये डॉ. बाबासाहेबांना भेटू इच्छिणाऱ्या त्यांच्या सहकाऱ्यांना अनुयायांना व त्यांच्या चिरंजीवानासुद्धा पुर्वप्रधातांप्रमाणे भेटण्यास जवळ जवळ बंदी झाली होती. ते कसल्यातरी लिखाण्याच्या कामात आहेत. किंवा त्यांची प्रकृती ठीक नाही अशी वावदुक करणे त्यासाठी पुढे केली जात होती.

२) डॉ.बाबासाहेबांचा मृत्यू ५ डिसेंबरच्या रात्री केव्हांतरी घडला असतांनाही खुद्द दिल्लीतील त्यांच्या दलित वर्गीय सहकाऱ्यांना, मित्रांना आणि हितचिंतकांना ती बातमी सकाळी ९ वाजेपर्यंत समजली नाही उलट असे समजले की, श्रीमती माई आंबेडकर यांनी अगदी पहाटे मुंबईतील ट्रंक कॉल केला अशी नोंद आढळली आहे म्हणजेच ही मुत्यूची बातमी मुंबईतील कोणालातरी गुप्तपणे गेली असली पाहीजे.

३) दोन महीन्यापूर्वी दिल्लीत जावून भय्यासाहेबांनी बासाहेबांची प्रकृती पाहिली व चौकशी केली त्यांना श्रीमती माई आंबेडकराकडून सांगण्यात आले की आता बाबासाहेबांची प्रकृती बरीच सुधारली आहे त्यांचे बाहयात्कारी लक्षण म्हणून

त्यांच्या टकलावर काही केस आल्याचेही म्हणाल्या शिवाय तुम्ही जेव्हा त्यांच्या मृत्यूदिवशी श्रध्दांजली वाहिली तेव्हा तुम्हालाही सांगण्यात आले होते की मधुमेहा खेरिज त्यांना दुसरा कोणताही आजार नव्हता. विशेषत: हृदयाचा आजार तर मुळीच नव्हता. असेही ठासून सांगण्यात आले. माणसाला हृदयरोग किंवा रक्तदाबाचा विकार नसेल तर केवळ मदुमेह तडकाफडकी मृत्यू आणू शकतो की याबद्दल वैद्यक-शास्त्र स्पष्टीकरण करु शकेल काय?

४) गेली वीस वर्षे त्यांचे खास वैद्य म्हणुन काम करणारे ''फॅमिली डॉक्टर'' ६ डिसेंबर रोजी सकाळीच उन्मादविकाराने पछाडल्यासारखे काही स्थळी जावून कुणीही न विचारता डॉ. बाबासाहेबांची प्रकृती फारच चांगली असल्याची ग्वाही देत होते. माई आंबेडकर यांना दुर-अंतरावरुन म्हणून नोंदवलेल्या ट्रंककॉल याच डॉक्टरांना होता असे बोलले जात होते व या ट्रंककॉलने त्यांना बाबासाहेबांच्या मृत्युची बातमी पहाटेसच कळवीली गेली होती. हे जर खरे असेल तर या डॉक्टर महाशयांना बाबासाहेबांच्या प्रकृतिबाबत अनपेक्षीत निवेदन करण्याचे प्रयोजन काय होते!

५) मृत्यूच्या दिवशी सकाळी शिरस्त्याप्रमाणे बाबासाहेबांना चहा नेणारा त्यांचा नोकर मुलगा नेत असतां ''यावेळी नको'' असे कां सांगण्यात आले बाईसाहेबांचा हुकुम अवमानुन चहा नेणाऱ्या त्या मुलास बाबासाहेब अवचेतन अवस्थेत पहांव यास मिळाले. कदाचित बाबासाहेबांच्या मृत्यूची प्रथम वंदता लागलेली ही दुसरी व्यक्ती होय!

६) डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे हितचिंतक व अनुयायी त्यांचे शव मुंबईला नेण्याच्या आग्रह करीत असतांना श्रीमती आंबेडकर मात्र ते सारनाथ ला उत्तरीय विधीसाठी नेण्याचा दुराग्रह का करीत होत्या? मुंबई हा त्यांच्या मनाला भेडसावित नव्हती ना? त्यांना खात्रीने माहीते होते की, लक्षावधी लोक मुंबईला त्यांच्या अंतदर्शनाचा लाभ घेणार होते. पण त्यांचा दुराग्रह बळावत जावून मुंबईला खास विमानाने नेण्यास लागणारी पाच हजार रुपयांची रक्कम त्यांच्याकडे नव्हती असे ही त्यांनी निलर्ज्जपणे सांगितले.

वरील घटना खऱ्या मानुन डॉ. बाबासाहेबांचा मृत्यू पुर्वनियोजीत होता असे आमच्या मनाने गृहीत धरले तर ते तर्कशुद्ध ठरणार नाही का? की, डॉ. बाबासाहेबांनी आरंभिलेले सामुहिक धर्मांतरांचे कार्य हिंदू धर्म उखडून काढील या भितीने हिंदू धर्मनिष्ठ घातक्यानी कट करून आमच्या नेत्याचा घात केला असे आम्ही समजावे का? अशा अनेक शंका आम्हाला उपस्थित करता येतील. परंतू मृत्यूबाबत स्पष्टीकरणात्मक उत्तर मात्र कोणाला देता येणार नाही.

म्हणून आम्ही तुमच्याकडे धावलो आहोत. जगातील कोणत्याही व्यक्तिने तुमच्या खांद्यावर

विश्वासाने मान टाकावी एवढे तुमचे मन उदार आहे आपण त्या उदार मनाने आमच्या नेत्याच्या डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या मृत्यूबाबत खास चौकशी करून त्याच्यामागील सत्य स्थिती जनतेच्या निदर्शनास आणावी अशी आपल्याला आमची आग्रहाची विनंती आहे.

तमसो मा ज्योतिर्गमय।

सत्य आणि न्याय या तत्त्वांचे तुम्ही पूजक आहोत म्हणून दु:खी कष्टी सात कोटी दलित जनतेच्या मनातील शंका कुशंका दूर करण्यासाठी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या मृत्यूची चौकशी करावी आणि शंकांनी अंधकारमय झालेल्या आमच्या हृदयात सत्याचा प्रकाश उजळावा हीच आग्रहाची प्रार्थना आहे.

**आपले कृपाभिलाषी**

श्री जी.बी. कांबळे बी.ए.ऑनर्स, जी.आर. घाडगे, एस.बी. धोत्रे, एन.आर. जाधव, ए.आर. नाचणकर

दिनांक २० जाने १९५७

नेते-जी.बी. कांबळे बी.ए ऑनर्स

कोकणस्थ महार कॉलनी

१८ वा आणि १३ वा

खार, मुंबई ४०००५२

एक लोकप्रिय समाजसेवक म्हणून त्यांची प्रतिमा निर्माण झाली होती. दिनांक २२ मार्च १९७७ रोजी त्यांचे निधन झाले.

Bandra
5th May 1942

To,
The Chairman
Public Health Committee,
Bandra Municipality.

Sir,

We the Residents of the Mahar Colony beg to write the following few lines for your favourable Consideration.

Due to the present war situation the Government of ! has recently ordered to reopen the wells which were formerly closed, and the work of reopening and cleaning such wells is taken in hand at every place.

We beg to point out that there is one old well in our Colony which is out of use, as it is nearly closed by mud and dirty things. The condition of the water in the well at present is unsanitary. But if effort are made to clean the well, the water will be of great use to the adjacent locality in case of emergency.

We beg to request you therefore to kindly take the work of cleaning the well in hand and oblige us. As our Community being poor it is unable to provide for expences for cleaning the well. So we have no other alternative but to approach you. For this act of kind ~~ness~~ we shall ever remain greatful.

We have the honour to be
Sir
Your Obedient Servant

— N. R. Jadhav
C. N. Mohite
D. Kamble
[illegible]

# दिवंगत सोनू सजन शिर्के (संदीरकर)

दिवंगत सोनू सजन शिर्के संदीरकर यांचा जन्म मूळगाव संदेरी ता. म्हसळा जिल्हा रायगड येथे झाला. घरच्या परिस्थितीमुळे त्यांचे शिक्षण मराठी ४थी पर्यंत झाले होते नोकरीच्या शोधात ते मुंबईला आले. त्याकाळी वांद्रे येथे आताच्या भाभा हॉस्पिटलच्यामागे आपल्या समाजाची फार मोठी वस्ती होती. तेथे ठुणाजी तुकाराम शिर्के यांच्याबरोबर त्यांची ओळख झाली आणि ते वांद्रयातील मार्कोपोलो सिगारेट कंपनीत कामाला लागले. आपल्या समाजावर मुसलमान, ख्रिस्ती, हिंदू या लोकांकडून अन्याय अत्याचार होत होते. त्याची चर्चा कंपनीतील कामगारांमध्ये होत असे त्या चर्चेत दि. सोनू सजन शिर्के हे भाग घेत असत.

संदेरी मुक्कामी भावकीचा आखाडा होता. त्या आखाड्यात शारिरीक कसरतीचे शिक्षण सोनू सजन संदीरकर यांनी घेतले होते तसेच त्यांना लाठी-काठीचे ही शिक्षण होते. ठुणाजी शिर्के यांच्या सान्निध्यामुळे सोनू सजन संदीरकर यांच्या सुप्त गुणांना वाव मिळाला. त्यांचे वक्तृत्व, कर्तृत्व व नेतृत्व बहरले प्रामाणिकपणा सचोटी यामुळे ते लोकांच्या अडी अडचणीमध्ये मदत करू लागले त्यांची आर्थिक स्थिती सुधारली. चार पैसे हातात घेऊ लागले. त्यांनी व्याजाने पैसे देण्याचा धंदा सुरू केला. त्यांना सोन्या सावकार या नावाने लोक ओळखू लागले. त्यांना दोन पत्नी होत्या. पहिल्या पत्नीच्या मुलाचे नाव भागुराम होते. वडिलांच्या ह्यातीतच भागूराम यांचे समाजकार्यांत नाव प्रसिद्ध झाले. दुसऱ्या पत्नीला दोन पुत्र झाले त्यांची नावे गंगाराम आणि शंकर अशी होते.

वांद्रे येथे परिवारासहित ते झावल्यांच्या घरात गाढवबावडी येथे रहात होते. आपल्या संसाराचा गाडा ते चालवित होते महार जाती पंचायत समिती, स्वतंत्र मजूरपक्ष, शेड्युल्ड कास्ट फेडरेशन आदि संघटनामध्ये प्रसार प्रचाराचे काम ते निष्ठेने करत होते. तसेच गावाकडे ही सुधारणा करीत होते अस्पृश्यता तर होतीच त्यामुळे खोताना त्यांचे हे यश खुपत होते. त्यांनी गावी घर बांधले त्या काळी सिमेंटऐवजी चुना वापरीत असत त्यांनी बांधलेले घर आजतागायत त्याच अवस्थेत आहे हे घर बांधताना खोतानी त्यांना खूप त्रास दिला अस्पृश्यता तर खूपच दाहक होती इतकी की घरावर कौले घालण्यास मनाई होती. कारण खोतांच्या घरी जरी पाहुणा आला तर चुकून तो महाराच्या घरी जाईल. तरीही जिद्दी सोनू संदीरकरानी दासगावहून पडावाने कौले आणली. भोई मचवे यांच्या मार्फत ती उतरविली आणि घरावर चढविली. परंतु खोतांनी दगड धोंड्यांनी कौलांचा चक्काचुर केला. एवढं नुकसान होऊनही खोता समोर त्यानी शरणागती पत्करली व सांगितले की प्रथम मी गावदेवीच्या मंदिरावर कौले चढवीन आणि मग माझ्या घरावर चढवतो. पण खोत काही एकेनात खोतांच्या अन्यायाला सीमा नव्हती. अस्पृश्याने

लग्नादि कार्यास जाताना जर धोतर नेसलेले असेल आणि मार्गात खोतांची वाडी आली तर त्यानी धोतर सोडायचे डोक्याला गुंडाळायचे व फक्त लंगोटीवर जायचे छत्री जर डोक्यावर धरली असेल तर खोतांच्या घरासमोर बंद करून बगलेत धरायची, पायात वहाणा असतील तर हातात काढून घ्यायच्या व अनवाणी पायाने चालायचे खोताची वाडी गेली की धोतर नेसायचे, वहाणा घालायच्या.

मुंबईत मानवमुक्तीचा लढा सुरू झाला होता. बाबासाहेबांच्या चवदारतळ्याच्या सत्याग्रहाच्या तयारीच्या बैठका होत होत्या त्या कार्यकर्त्यांमध्ये सोनू संदीरकर हे एक होते खोतांच्या कजागाला कंटाळून त्यानी गावातील भावकीची बैठक बोलावली. त्याकाळी संदेरी गावात ५-५० गडी मजबूत बांध्याचा होता. आजुबाजूच्या गावात असा गडी नव्हता. आखाड्यात तयार झालेला लाठीकाठीचे ज्ञान असलेला तरूण वर्गासमोर त्यांनी हा मुद्दा मांडला. त्यावेळचे त्यांचे सहकारी बाळाजी भिकू बामणे, दुलबाजी भिकू बामणे, विठ्या महार, धोंड्या बुवा, पिश्या धोंड्या, गणू गोविंद शिर्के, राम्या लख्या महार, गणूपवार, भाग्या भागुराम शिर्के, शिवा शिर्के, दाजी आठवले, भिक्या मुंडकर, लक्ष्मण म्होणकर अशी ताकतवार मंडळी होती. या मंडळीनी त्यांना साथ दिली की, आम्ही तरूण मंडळी तुमच्याबरोबर आहोत. घरावर कौले चढवा एकही कौल फुटू देणार नाही. पुन्हा दासगाववरून कौले पडावाने आणण्यात आली व घरावर चढविण्यात आली. एकजुटीची बातमी खोताना समजली त्यांची आपसात कुजबूज सुरू झाली व नदी ओलांडून येण्याचे धाडस त्यांना झाले नाहीं. ते त्या काळात बांधलेले घर आज ही दिमाखात उभे आहे.

वांद्र्यातील एका बैठकीत बाबासाहेब अध्यक्ष असताना त्यांनी आभार प्रदर्शन केले व आपल्या नाव लौकिकास शोभेल अशी देणगी दिली वृद्धपकाळाने त्यांचे दु:खद निधन झाल त्यांच्या पश्चात त्यांचा पुत्र भागूराम याने आपल्या पित्याचा वारसा जतन केला त्यांचे ही दु:खद निधन झाले.

सरदहू माहिती मा.

प्रभाकर बामणे यांच्याकडून उपलब्ध झाली.

## दिवंगत महादेव जाधव गोठेकर!

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या चळवळीतील एक निष्ठावंत भिमसैनिक असा महादेव गोठेकरांचा उल्लेख करावा लागेल. सडेतोड, स्पष्टवक्तेपणा असल्यामुळे त्यांचा स्वभाव निर्भिड आणि बेडर होता. पांढरी शुभ्र विजार व पांढरा शर्ट असा त्यांचा नेहमीचा पेहराव असे समाजसेवा हा त्यांचा आवडीचा छंद होता. त्यांना शिक्षण कमी होते परंतू वकिलांच्या सान्निध्यात ते दिवसभर रहात व त्यांचीच शिपाई म्हणून छोटी मोठी कामे करीत. फौजदारी व दिवाणी खटल्यामध्ये कोण वकील यशस्वी याचे ते लोकांना मार्गदर्शन करीत व त्यांचा अंदाज खरा ठरत असे हिच त्यांची कमाई होती.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर राजगृहावर आले किंवा जयराज हाऊस येथे आले की वांद्र्यामधील स्वतंत्र मजूर पक्ष, शेड्युल्ड कास्ट फेडरेशन, महार जाती पंचायत आदि संघटनांचे काम कसे चालले आहे याची सविस्तर माहिती ते बाबासाहेबांना देत असत. त्यामुळे बाबासाहेब आल्यावर महादेव गोठेकरांना मुक्त प्रवेश असे.

वांद्रे विभागात विशेषत: गाढवबाव परिसरात बाबासाहेबांची सभा आयोजित करणे त्या सभेला बाबासाहेबांना आणणे पुन: पोहचविणे ही जबाबदारी ते स्विकारून यशस्वीपणे पार पाडीत असत. बाबासाहेबांच्या विश्वासात ते अत्यंत पात्र ठरले होते त्यामुळे त्यानाही पाण्यात पाहाणारी काही मंडळी होतीच. त्यांना (कुकूची नार) या नावाने चिडवीत असत. त्यांची भाषणाची शैली जोशपूर्ण असे ''कंठ लंगोटी'' हे भाषणातील पालूपद असे न थकता सतत दोन दोन तास भाषण करण्याची क्षमता बाळगून होते अंगकाठी बारीक सडसडीत होती.

स्वतंत्र मजूर पक्ष, शेड्युल्ड कास्ट फेडरेशन तसेच महार जाती पंचायतीच्या प्रचार आणि प्रसार कार्यात त्यांचे कार्य फार भरीव स्वरूपाचे आहे. ग्रामीण भागात तालुका, जिल्हा स्तरावर त्यांना मान असे.

एकदा वैकुंठलाल मेहताकडे कोकणस्थ को. ऑ. हौ. सोसायटीतील काही मंडळी गेली होती. ती बातमी बाबासाहेबांना कळली. बातमी जरा विचित्रच होती आपले सर्व लोक काँग्रेस पक्षात गेल्याची बाबासाहेब चिडले व त्यांनी वांद्रयातील कोकणस्थ कॉलनीतील मंडळीना बोलावून दम दिला आणि दरडावून विचारले की ''तुम्ही माझी माणसे असुन काँग्रेस पक्षात कसे गेलात'' ?

सखाराम भिकू धोत्रे, धर्माजी सोनू जाधव (घाटिवले) आदि निष्ठावान मंडळीने धीटपणाने सांगितले साहेब, आम्ही मनाने आपलेच आहोत. आणि शरीराने ही आपलेच आहोत आम्ही कदापी काँग्रेस पक्षात जाणार नाही. आपण विश्वास ठेवा. आम्ही वैकुंठलाल मेहताना भेटण्यासाठी गेलो होतो परंतु आम्हास जागा जर मिळत असेल तर स्वतंत्र वसाहत निर्माण होत असेल तर

वाईट आहे का ?

बाबासाहेबांना त्यांचे म्हणणे पटले. त्यांनी वैकुंठलाल मेहतांना सांगितले ही माझी माणसे आहेत. त्यांना मदत करा. ''त्याप्रमाणे वैकुंठलाल मेहतांनी त्या मंडळीला कोकणस्थ महार कॉलनीसाठी जागा दिली. व आजची कोकणस्थ कॉलनी अस्तित्वात आली. इतकी जागरूकता त्या काळात होती. महादेव गोठेकर बौद्ध धम्मावर देखील बोलत असत. वार्धक्यामुळे त्यांचे निधन झाले निधनानंतरही त्यांच्या सामाजिक, धार्मिक, राजकीय कामकाजाची आजही तीव्रतेने आठवण चिंचवाडीतील मंडळी काढीत असतात.



## दिवंगत महादेव सखाराम कवडे (भूतपूर्व क्रिकेटपटू)

चुईम गावातील जुन्या कुटुंबापैकी दि. सखाराम कवडे (कासेकर) यांचे कुटूंब सुखवस्तूपैकी होते. ते भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकरांच्या चळवळीतील अग्रगणी कार्यकर्ते होते तसेच ते पंचायतीचे ही कार्यकर्ते होते त्यांना दोन भाऊ व दोन बहिणी होत्या. ते रेल्वेमध्ये नोकरी करीत होते. महादेवचा जन्म १९१३ चुईम येथे झाला त्यांना तीन पुत्र व दोन बहिणी होत्या त्यांच्या वडिलांना शिक्षणाचे महत्त्व कळले होते म्हणून त्यांनी गुणी महादेवला वांद्रे येथील सेंट अॅन्ड्यूज या खिश्चन शाळेत नाव घातले. त्यांचे बालपण चुईम गावातच गेले. हॉकी या खेळाने आकर्षित केले त्यानी या खेळामध्ये प्राविण्य मिळविले ते मोठेपणी आगाखान हॉकी चषक स्पर्धेमध्ये मोठ्या क्लबतर्फे खेळू लागले. हॉकी या खेळाबरोबर त्यांना क्रिकेट या खेळात देखील त्यांनी प्राविण्य मिळविले. त्यांनी विजय मर्चन्ट या भारताच्या कर्तृत्ववान व अतिशय श्रीमंत (त्यांच्या मुंबईमध्ये त्या काळात पाच गिरण्या होत्या) माणसाने त्यांच्या पारसी जिमखान्यासाठी खेळण्यासाठी निमंत्रित केले. विजय मर्चंटबरोबर एस.महादेव किंवा माधवराव म्हणून ओळखले जायचे. चुईम गावचे महादेवराव कवडे पारसी जिमखान्याचे 'ओपनिंग बॅटसमन' म्हणून ओळखले जाऊ लागले. विजय मर्चंट यांना खर्चासाठी महिन्यासाठी ५० रूपये द्यायचे. त्या पैशात घर चालविणे कठिण होते. कारण घरात दोन बहिणी व तीन भाऊ आई, वडील व स्वत:चा परिवार भावांचा परिवार यांना सांभाळणे कष्टाचे होते. विजय मर्चंटना सांगून मोठा भाऊ भागुराम सखाराम कवडे यांना विजय मर्चंटच्या एका गिरणीमध्ये कामाला लावले छोटा भाऊ शंकर यांना बॅडमिंटन या खेळामध्ये रूची निर्माण केली त्यांना असे प्रोत्साहन दिले की, शंकर महादेव कवडे यांचे चॅम्पियन खेळाडू म्हणून तेव्हाच्या वर्तमानपत्रात नाव गाजू लागले.

इंग्लंड येथे काऊंटी क्रिकेट खेळण्यासाठी विजय मर्चंट यांनी एस.महादेवची निवड केली. दुर्दैवाने (कवडे परिवाराच्या आणि भारताच्याही) ह्या गोष्टीची पूर्तता झाली नाही. कारण बी.ई.एस.टीमध्ये चांगली नोकरी आणि पैशाचे आमिष त्यांना दाखवण्यात येऊन फसविण्यात आले. बेस्ट कंपनीशी करार करून जखडवून ढाल जिंकून देण्याचे श्रेय दि. महादेव कवडेनाच दिले जाते. गुलाब रामचंद्र व विजय मांजरेकर त्यांचे अगदी जवळचे मित्र इतके ते गुणी खेळाडू होते परंतु भारताच्या टीममध्ये ते खेळू शकले नाहीत हीच आपल्या समाजाची शोकांतिका नव्हे काय? त्यांचा मृत्यू १९८६ मध्ये विकास या त्यांच्या १८ व्या रस्त्यावरील निवासस्थानी झाला.

# दिवंगत गणपत कृष्णा साळवी (टोळकर)



पूर्ण नाव गणपत कृष्णा साळवी (टोळकर) डॉ. बाबासाहेबांच्या चळवळीतील एक निष्ठावान भिमसैनिक यांचा जन्म माणगाव तालुका रायगड (कुलाबा) येथे झाला. नोकरीनिमित्त ते नवी पाली येथे रहावयास आले. ते रेल्वेमध्ये (जी.आय.पी.) कामाला लागले. उंच व बलदंड शरीरयष्टी त्यांना लाभल्यामुळे प्रथम दर्शनीच पाहाणाऱ्या माणसावर त्यांची छाप पडत असे. ते कडक शिस्तीचे भोक्ते होते त्यामुळे विभागामध्ये त्यांचा दरारा होता.

त्यांना सुशील, सुविध अशी सहचारिणी मिळाली. त्यांचे नाव लाडीबाई असे होते त्या संस्कारक्षम असल्यामुळे आपल्या पतीप्रमाणेच होत्या. त्याकाळी त्यांचे घर कौलारू होते. मंगल कार्यात (जानिवसा) आला तर तो त्यांच्याच घरी बसला जाई. त्यांची उठबस झाली की मगच नवरा मुलगा पुढे जाई. चळवळीच्या सर्व बैठका, विचार, विनिमय हे त्यांच्याच घरी होत असत.

नवा मळा व नवीपाली येथील प्रत्येक सुख दु:खाचे कार्ये त्यांच्याच अधिपत्याखाली होत असत. त्यांना एक पुत्र व दोन कन्या होत्या. मुलाचे नाव रामचंद्र व विठाबाई आणि सोनाबाई अशी मुलींची नावे होती. रामचंद्र हे देखील टर्नर या पदावर काम करीत होते.

गणपत कृष्णा साळवे (टोळकर) हे ना.भि असगोलकर यांचे सहकारी होते. त्यांनी १९४१ मध्ये आंबेडकर सोसायटीचे भुमीपूजन केले त्यात सयाजी यादव, गोपाळ देवजी पवार, सखाराम कवडे, राया मास्तर सावंत (मुसाडकर) आदि त्यांचे सहकारी होते. अखिल भारतीय शेड्युल्ड कास्ट फेडरेशनचे ते सदस्य होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी प्रस्थापित केलेल्या इमारत फंडाचे विद्यार्थी आश्रम (दापोली या संस्थेस ही त्यांनी आर्थिक मदत केली आहे.

या दोन पती-पत्नीचा मान नवी पाली विभागात राखला जात होता. बाबासाहेबांच्या चळवळीमध्ये हा परिवार आघाडीवर होता. १९ वा रस्ता खार पश्चिम येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकर सोसायटीमध्ये त्यांचे टोळकर हाऊस ही इमारत आहे त्यांचे निधन २८ मार्च १९७२ मध्ये झाले व आंबेडकर चळवळीमधील एक निष्ठावान कार्यकर्ता हरपला वरील माहिती तसेच (फोटो, पावत्या) त्यांचे नातू मा. सुरेश रामचंद्र साळवी यांच्याकडून प्राप्त झाली आहे.

# दिवंगत भ.स. गायकवाड गुरूजी



पूर्ण नाव भगवंत सयाजी गायकवाड यांचा जन्म मुक्काम इंदूरी तालुका अकोला जिल्हा अहमदनगर या गावी झाला. वडिलांचे नाव सयाजी रावजी गायकवाड व आईचे नाव सीताबाई सयाजी गायकवाड असे होते. त्यांना दोन भाऊ आणि एक बहिण अशी भावंडे होती. लक्ष्मण, नकाबाई आणि रावजी. बहिणीचे नाव नकाबाई ते ठेवण्याचे कारण तीन बहिणी मृत्यू पावल्या म्हणून मुलगी नको ग बाई अशी समजूत म्हणून मुलीचे नाव नका बाई असे ठेवण्यात आले.

वडील मुंबईमध्ये पोर्ट्रसमध्ये कामाला होते तर आई डबा बाटलीचा धंदा करीत असे. अन्य नातेवाईक मंडळी नागपाड्यात रहात असत. त्यांच्याबरोबरच हा परिवार रहात होता. नागपाड्यात दोन माड्या प्रसिद्ध होत्या. एक तंबूची माडी व दुसरी स्कूलाची माडीवर उल्लेखित गाव हे दिवंगत दादासाहेब रूपवतेंचे असल्यामुळे चळवळीनी आणि कुटुंबियामध्ये अधिक जिव्हाळ्याचे संबंध आजही अस्तित्वात आहेत.

त्यावेळची सामाजिक, धार्मिक परिस्थिती आपल्या समाजाच्या विरोधात असलेली होती. अज्ञान, अंधश्रद्धा, समाजात खोलवर भिनलेले होते. गावी थोडी शेती होती त्यामुळे शेतीची ही कामे थोडी फार हे कुटुंब करीत असे.

गुरुजींचे एक मोठे मेव्हणे होते. ते बाबासाहेबांच्या चळवळीत अग्रेसर होते. निळे असे त्यांचे नाव होते. गुरूजींनी आपले मन त्यांच्यापाशी मोकळे केले. ते म्हणाले दाजी मला गुरे राखण्याचे काम होत नाही. शेतीचे काम तर मला येत नाही आणि आवडत नाही. मला शिकायचे आहे. मला शाळेत टाका बालपणापासून शिक्षणाची त्यांना आवड होती. त्यामुळे निळे यांनी त्याना शाळेत दाखल केले व गुरूजींच्या जीवनाला आकार येण्यास सुरूवात झाली. संस्कारमय जीवन हे शालेय जीवनापासूनच सुरू होते. गुरूजींचे १ ली ते ४ थी असे प्राथमिक शिक्षण सुरू झाले. पनवेल, भिवंडी, ठाणा अशा वेगवेगळ्या ठिकाणी त्याकाळी असलेल्या बोर्डींगमधून त्यांचे शिक्षण झाले. लहानपणी माधुकरी मागण्यास ते व त्यांचे मित्र जात असत. त्यावेळी लोक द्रव्य दान देण्याऐवजी धान्यदान देत असत. ते धान्य गोळा करून गुरूजी व त्यांचे मित्र आणीत असत. यात त्यांना कधीही कमीपणा वाटला नाही त्याना उलट आनंदच वाटे खारमध्ये ते रहात असतानाही आश्रमातील मुले बॅण्ड वाजवून घरोघरी फिरून द्रव्यदान गोळा करीत असत अशा आश्रमवासीय मुलांना गुरूजींनी कधीही रिक्त हस्ताने माघारी पाठविले नाही की त्यांना अपमानास्पद

वागणूक दिली नाही. त्याना बोलावून सन्मानपूर्वक यथाशक्ति दान देत असत असा जीवनाला सुसंस्कारित करणारा, योग्य वळण देणारा, आकार देणारा जीवन परिष्कृत करणारा ''संस्कार'' शिस्त, शिक्षणामुळे गुरूजीवर झाला होता.

त्यानंतर ५वी ते ७वी पर्यंत त्यांचे शिक्षण गावी झाले. ७ वी ते मॅट्रिक पर्यंतचे शिक्षण पुनरूपी मुंबईत झाले. अत्यंत गरीबीत दिवस काढल्यामुळे दळणाच्या गिरणीत उरलेले पीठ गोळा करून त्याच्या भाकऱ्या करून खाण्यापर्यंतची परिस्थिती अंगवळणी पडली होती. वडिलांचा पगार पुरेसा नव्हता. इतरही कुटुंबियांचा भार आई-वडिलांवर होता. ज्ञानाची भूक गुरूजींना लागलेली असल्यामुळे भाकरीच्या भुकेची चिंता त्यांना वाटत नव्हती व बोर्डिंगामध्ये त्यांचे शिक्षण होत असले तरी धान्याची उणीव भासत नव्हती.

मा. गांगुर्डे, मा.एन.जाधव, मा.गमरे हे त्यांचे शालेय मित्र होते. त्याचबरोबर अभ्यास आणि बालपणापासूनच बाबासाहेबांचा सहवास (वयाच्या ११ व्या वर्षापासून) त्यांना लाभला होता.

आंबेडकरी चळवळीत वस्ताद दारोळे (इमानदार)यांचे नाव होते. त्यांच्याच कुटुंबातील दारोळे (इनामदार) पेशवेकालीन सैन्यात पराक्रम गाजविलेले धोंडिबा दारोळे व भागुबाई धोंडीराम दारोळे यांची कन्या आनंदीबाई या पेशाने शिक्षिका आहेत. यथासमयी त्यांचा विवाह गुरूजींशी झाला. गुरूजीना एकूण चार अपत्ये होती. शशिकांत, प्रमोद, जयश्री आणि माया शशीकांत हे सुपरिटेंडट या पदावर होते. त्यांचे निधन दि. ६ ऑगस्ट २००७ रोजी हृदयविकाराच्या तीव्र झटक्याने आकस्मिक रितीने झाले.

गुरूजींनी आपल्या पत्नीला आधीच सांगितले होते डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या कार्याने भारावून गेलो आहे. मी कधी घरात मिळणार नाही. बाबासाहेबांच्या कार्यापासून मला परावृत्त करू नकोस आणि मला अडवू नकोस. मी तुझ्याबाबत कधीही तक्रार करणार नाही. मला अडवलेस तरी मी तुझे ऐकणार नाही तुला पटत असेल तर रहा नाहीतर सरळ माहेरचा रस्ता धर माझे कर्तव्य आहे बाबासाहेबाना साथ देणे कारण ते जे काही करत आहेत ते आपल्या लोकांसाठीच आहे.

सोमवंशीय क्षत्रियाची त्या सुकन्या असल्यामुळे आपल्या पतीबद्दल त्यानी कधीही तक्रार केली नाही. पतीच्या पगाराची पर्वा न करता स्वत: शिक्षिकेची नोकरी करून आपल्या कुटूंबाचा त्यांनी सांभाळ केला आणि मुलांना शिक्षण दिले. गुरूजीची निष्ठा शिस्त, आणि कार्याबद्दलचा ओढा बाबासाहेबांनी पहिला आणि राजकारणात धार्मिक कार्यात ज्याच्यावर विश्वास टाकावा असा विश्वासू सहकारी गुरूजीच्या रूपाने त्याना दिसला. स्वत: बाबासाहेबांनी स्वतंत्र मजूर पक्षाचे चिटणीस म्हणून त्यांची नियुक्ती केली. ती त्यांनी सार्थ ठरविली. भारतीय बौद्ध महासभेचे चिटणीस होण्याचा बहुमान त्यांना मिळाला. त्यातही संयम, त्यागी, वृत्ती, शिस्त यांचा संगम गुरूजींच्या कर्तृत्वाने सिद्ध झाला. कामगार युनियनच्या कामाची जबाबदारी आर्थिक व्यवहार सांभाळणे, पावत्या फाडून देणे आणि हिशेब-चोख ठेवणे हे अत्यंत जिकरीचे काम कुठलीही कुरबूर न करता गुरूजीनी सांभाळले. जीवक आरोग्यालय, इंम्पुमेंट ट्रस्ट आदि प्रत्येकाचे काम

हिशेब या एकापेक्षा एक जबाबदाऱ्या स्विकारणे, पार पाडणे आणि बाबासाहेबांचा संपादन केलेला विश्वास सार्थ ठरविणे हे कर्तव्य पुण्यमय होय! आणि ते करण्याचे साहस प्राप्त करताना आपली बायको घर कसे चालवते याचा विचारच गुरूजीनी केला नाही.

बाबासाहेबांच्याबरोबर भारतभर भ्रमण करण्याची संधी गुरूजीना प्राप्त झाली. त्यामुळे आपल्या परिवारांमध्ये ८-८ दिवस वडिलांच मुलाना दर्शन घडत नसे. चळवळीमध्ये मा.पी.टी बोराळे साहेबांचे योगदान महत्त्वाचे आहे.

बाबासाहेब जी भाषणे करीत ती लिहून त्यांचा वृत्तांत तयार करणे ती प्रेसला देणे (जनता, प्रबुद्ध भारत मूकनायक) ही जबाबदारी देखील गुरूजी पार पाडीत होते. धर्मांतराची चळवळ फोफावत होती. रंगून (ब्रह्मदेश) येथे बाबासाहेब गेले तेव्हा गुरूजीना आपल्या सोबत घेऊन गेले. बाबासाहेबाना सूट, बूट घालणे आवडत असे तर गुरूजी साधे कपडे वापरीत परदेशात व्यवस्थित कपडे वापरले पाहिजेत. म्हणून बाबासाहेबांनी आपले सूट गुरूजीना अलटर करून घालायला लावले. धर्मांतराच्या कामासाठी नागपूरची सारी जबाबदारी व व्यवस्था चिटणीसावर सोपविण्यात आली होती त्यापैकी ते एक होते.५ लाख लोकांनी धम्म स्विकारला अभूतपूर्व रक्तविहिन क्रांती झाली आणि धर्मातराचा सोहळा पार पाडण्यात यशस्वीपणाने त्यानी आपली कामगिरी पार पाडून दाखविली. दि. ६ डिसेंबर १९५६ साली बाबासाहेबांचे महापरिनिर्वाण झाले आणि त्यांचे पार्थिव मुंबईत आणण्यात आले राजगृहावरच्या व्यवस्थेपासून ते अग्नी संस्कारासाठी चंदनाच्या लाकडाची व्यवस्था प्रचंड जनसमुदायास व्यवस्थित दर्शन ही सारी कामे गुरूजी अत्यंत नम्रपणे करीत होते. दलितांचा सूर्य अस्ताला गेला आणि भीषण अंध:कार पसरला.

चैत्यभूमी येथे बाबासाहेबांचे स्मारक उभारण्याच्या कामाला सुरूवात झाली. शासनाने प्रथम १०x१० ची जागा दिली ती अपूरी आहे अधिक मोठी जागा मिळाली पाहिजे मग ती २०x२० अशी वाढवून मिळाली. राष्ट्रपुरूष आणि जगदवंदनीय महामानवाच्या स्मारकाला ही जागा अपूरी हे पटवून देणे महापालिकेत, शासन, केंद्र सरकार यांना पत्र व्यवहार करून आजची ४०x४० जागा मिळवून घेणे या मुख्य कर्तव्यात गुरूजीचा सिंहाचा वाटा आहे. तोट्यात चालणारा व वेळोवेळी बंद पडणारा भारतभूषण छापखाना बाबासाहेबांनी त्यांच्या कर्तृत्वावर विसंबून चालविण्यासाठी त्यांच्याकडे सुपूर्द केला. एक आव्हान म्हणून नम्रपणे त्यानी ही जबाबदारी स्विकारली आणि यशस्वी करून दाखविली.

बाबासाहेबांनी उद्घोषित केलेल्या राजकीय पक्षाची मोडतोड आपसातील सुंदोपसुंदीमुळे एका बाजूला चालू असताना भय्यासाहेब आंबेडकरांना एक निष्ठतेने साथ दिली. दलित-बौद्धांच्या चळवळीत आघाडीवर राहून लढले सत्तेच्या राजकारणात एक हकदार असूनही जाणीवपूर्वक दूर राहिले वैयक्तिक जीवनात एकामागून एक आघात सहन करून ही ताठ मानेने आदर्श म्हणून जगले ''राजगृह'' सहीसलामत ठेवण्यासाठी भय्यासाहेबांना साह्यभूत होऊन अजरामर असे कार्य केले. सारे जग भय्यासाहेब असे म्हणत परंतु गुरूजी त्यांचा उल्लेख ''भाऊसाहेब''

असाच करीत आणि भय्यासाहेबही त्यांना बी.एस.असे म्हणत.

महाराष्ट्र शासनाने त्यांचा गौरव करून त्यांना १९७५ साली ''दलित मित्र'' हा पुरस्कार देऊन गौरव केला त्या समारंभाचे पत्र समाज कल्याण खात्याकडून त्यांना आलेले आणि ''समाज सेवकांचा गौरव'' म्हणून महाराष्ट्राचे माजी मुख्यमंत्री श्री वसंतराव नाईक व केंद्रीय मंत्री श्री यशवंतराव चव्हाण यानी अहमद नगर येथे त्यांचा गौरव केला तसेच दि. ८ एप्रिल १९८६ रोजी त्यांच्या अमृत महोत्सवानिमित्त त्याना मानपत्र देण्यात आले. त्या अमृतमहोत्सव समितीमध्ये दादासाहेब रूपवते, दादासाहेब रोकडे, के.एस अभंग आदि प्रभृती होते.

ज्ञानसूर्याकडून ज्ञानाचे तेज घेऊन त्यानी ज्ञानज्योती पेटविल्या एका समर्थ जीवनाचा दिपक त्यातील जीवनरूपी तेल संपल्याने विझला. वयाच्या८४ व्या वर्षी गुरूजींची काया अनंतात विलीत झाली. दिवंगत शशीकांत हे माझे वर्गमित्र असल्यामुळे गुरूजींचा तसेच सर्व कुटुंबाचा सहवास मला लाभला आणि माझे ही जीवन धन्य झाले. त्याच्या स्मृतीस कोटी कोटी प्रणाम!

## श्री. भगवंत सयाजी गायकवाड

सन १९३६ पासून डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे अनुयायी म्हणूनद श्री. गायकवाड यांनी आपल्या समाजकार्याचा श्रीगणेशा केला. गेली अनेक वर्षे विविध संस्थांवर पदाधिकारी म्हणून त्यांनी कार्य केले. तसेच भारतीय बौद्ध महासभेचे ते जनरल सेक्रेटरीही होते. केवळ महाराष्ट्रातच नव्हे तर अखिल भारतात बहुजन समाजाच्या शैक्षणिक उन्नतीसाठी, तसेच सामाजिक सुधारणांसाठी त्यांनी बरेच प्रयत्न केले. म्युनिसिपल कामगार संघ, स्वतंत्र मजूर पक्ष, शेड्युल कास्ट फेडरेशन, भारतीय बौद्ध महासभा व रिपब्लिकन पार्टी ऑफ इंडिया इत्यादी संस्थांच्या कार्यात ते आघाडीवर होते. त्यांनी केलेल्या सेवेबद्दल महाराष्ट्रांचे माजी मुख्यमंत्री श्री. वसंतराव नाईक व केंद्रीय मंत्री श्री. यशवंतराव चव्हाण यांनी अहमदनगर येथे त्यांचा श्रीफल देऊन गौरव केला.

## श्री.रा.रा. भगवंत सयाजी गायकवाड,

स.न.वि.वि.

आपण केलेल्या प्रदीर्घ आणि मौलिक समाजसेवेबाबत शासनाने आपला ''दलित मित्र'' म्हणून गौरव करण्याचे ठरवित आहे. तरी आपण या सत्कार प्रसंगी पत्नीसह उपस्थित राहून शासनाने आपल्या सेवेच्या केलेल्या प्रतिकात्मक गौरवाचा स्वीकार करून आम्हास उपकृत करावे अशी विनंती आहे.

समारंभाबाबत सविस्तर माहिती आपणास लवकरच कळविण्यात येईल.

आपल्या निवडीबाबत
**हार्दिक अभिनंदन.**

**आपले स्नेहांकित**
प्रतिभा पाटील

# दिवंगत दगडू गणू बागले (नाडणकर)

दिवंगत दगडू गणू बागले हे रत्नागिरी जिल्ह्यातील पन्हळे या गावचे रहिवाशी होते उदर निर्वाहासाठी ते मुंबईत आले व वांद्रे विभागात स्थिरावले. स्लॉटर हाऊसमध्ये ते नोकरीस राहिले ते बैल विभागात गुरांची चामडी उतरविण्याचे काम करीत असत हेच त्यांच्या उदर निर्वाहाचे साधन होते. दगडू गणू बागले हे धर्मांतराचे पूर्वीचे भजनीबुवा स्लॉटर हाऊसमधील कष्टकरी कामगारांना एकत्र येऊन रात्रीच्या वेळी भजने गाण्याची सुरूवात केली. अशा धार्मिक वृत्तीच्या घरातील दगडू गणू बागळे यांच्यावर वडीलांचा व भाऊ संतू बागळे यांचा प्रभाव पडला म्हणून ते भजनाच्यावेळी नाल (मृदुंग) वाजविण्यास शिकले व मोठ्या भावाच्या मार्गदर्शनाखाली पहाडी आवाजात भजने गाऊ लागले. म्युनिसीपल कामगार संघाची मंडळी स्लॉलटर हाऊसमधे येत असत. सामाजिक अन्याय अत्याचाराची चर्चा होत असे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची चळवळ वांद्रे विभागात जोर धरू लागली. ते बाबा साहेबांच्या विचाराने आकर्षिले गेले.

स्लॉटर हाऊसमध्ये काम करीत असताना ते जयराम कासारे, धोंडू तुकाराम मोहिते (काणेकर) यांच्या सहवासात आले आणि आंबेडकरी चळवळीत सक्रीय झाले. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या मुंबईतील व वांद्रे विभागात होणाऱ्या प्रत्येक सभेस ते उपस्थित रहात असत. त्यांचे कराचीत वास्तव्य असलेल्या येलवणकर कुटुंबातील भिवराबाई या कन्येशी १९२५ साली हिंदू धार्मिक पद्धतीने विवाह झाला. आंबेडकरी चळवळीत सक्रीय असल्यामुळे महाडच्या चवदार तळ्याच्या सत्याग्रहात सहभागी झालेल्या लोकांची सेवा करण्याची संधी त्यांना प्राप्त झाली. सन १९५८ मध्ये स्लॉटर हाऊस येथे स्थापन करण्यात आलेल्या बुद्धविहाराच्या समितीचे ते अध्यक्ष होते. तसेच तत्कालीन महारज्ञाती पंचायतीच्या शाखा क्र. १३३ व नंतर १७९ या शाखेचे ते उपाध्यक्ष होते त्यांच्या पत्नी श्रीमती जानकीबाई दगडू बागळे ह्या आजही ह्यात असून त्या १०६ वर्षाच्या आहेत. श्री दगडू बागळे यांचे १९५८ मध्ये दिर्घ आजाराने दु:खद निधन झाले.

संकलन: ज्ञानकिर्ती सुरेश बा. धोत्रे

# दिवंगत शिवराम दगडू सावंत

संपूर्ण नाव : **शिवराम दगडू सावंत**
वय : **८० वर्षे**
रहाण्याचा पत्ता : **जुने पशुवधगृह वांद्रे**



माझे वडील कत्तल खान्यात कामगार होते. पण ते कामगारांचे प्रतिनिधी होते. मडके बुवा, पी.टी.बोराळे यांच्याबरोबर वडिलांचे जिव्हाळ्याचे संबंध होते जे.जे. भातनकर, हिंदळेकर आदि कामगारातील पुढारी वर्गातील लोक कत्तल खान्यात वडिलांना भेटण्यास येत असत. कामगारांच्या प्रश्नासंबंधी चर्चा माहिम किल्ल्याजवळ असलेल्या वरवारीजवळ होत असे.

मी उनाडक्या करू नये व शिक्षण घ्यावे. म्हणून माता रमाई विद्यार्थी आश्रम दापोली (बोर्डिंग) मध्ये दाखल केले पण एक वर्षात पळून आलो. जात्याचं हुशार असल्यामुळे स्वभाव हरहुन्नरी होता. वांद्रा म्युनिसिपल शाळेतच प्राथमिक व विद्यालयीन शिक्षण घेतले महापालिकेत नोकरी मिळाल्यामुळे शिक्षण अर्धवट सोडावे लागले. वडील कामगारांचे प्रतिनिधी असल्याने मडके बुवा ते भातनकर बंधू पर्यंत म्युनिसीपल कामगारांमध्ये विशिष्ट ओळख असे कामगार नेत्याना मटणामधील विशिष्ट प्रकाराच्या अवयवाचे मटण पाठविण्याची व्यवस्था होत असल्यामुळे एक आदर युक्त वातावरणाची निर्मिती झाली होती दुरूस्त ना दुरूस्त रिपाईमुळे वांद्रे विभागातील लोक बी.सी.कांबळेचे चाहते बनले होते. मला धार्मिक सामाजिक कामाची आवड होती तसेच चित्रकलेची आवड होती. महाराष्ट्रातील ख्यातनाम कवी गायक वामनदादा कर्डक यांची हृदयस्पर्शी काव्यरचना ऐकून ऐकून, चैतन्य, स्फूर्ती प्राप्त होत असे. त्या आधी जल साकार मंडळीनी केलेले अभूतपूर्व मानव मुक्तीचे कार्य हृदयावर ठसलेले होते. त्यातूनच 'कुणाल गायन पार्टीची' स्थापना केली मला सर्व प्रकारची भारतीय वाद्ये व परदेशी वाद्य वाजविता येत असल्याने सहकाऱ्यामध्ये माझ्या प्रति एक प्रेमांची वेगळी भावना निर्माण झाली होती. शेखर धेंडे व निर्भवणे नावाचे दोन तरूण सुश्राव्य सर्व प्रकारची गीते गात असत. त्यांचा शास्त्रोक्त पद्धतीचा गायनाचा कोणताही अभ्यास नसताना परंपरेनुसार गुरू नसताना ही शेखर धेंडे स्त्री-पुरूष गीते एकाच वेळेला गात असे.

धार्मिक बाबतीत बौद्ध धम्मासंबंधी विवेचनात्मक अभ्यासामुळे चित्र रूपाने कल्पना साकारून प्रदर्शनाच्या माध्यमात जनतेपुढे ठेवीत असे ६४-६५ च्या दरम्यान बाबूच्या (कामठ्या) सहाय्याने

एक स्तूपाचा (सांची) प्रतिकृती साकारून त्याला कापडाने आच्छादले व सभोवताली भगवान बुद्धांचे जीवन चरित्र चित्ररूपाने साकारले. ते पाहाण्यास लोकांची रीघ लागली होती.

दिवंगत पी.टी. बोराळे साहेब महापौर झाल्यावर नालासोपारा येथे बुद्ध जयंती करण्यात आली.सिलोनमधून अनेक विद्वान बौद्ध भिक्खू आले होते. जयंती उत्सव कमिटीच्यावतीने श्रीलंकेच्या पंतप्रधान सिरीमाओ बंदरनायके याना बुद्ध प्रतिमा भेट म्हणून राजदूताकडे माझ्या हस्ते सुपूर्द करण्यात आली. कापडावर रंगकाम करून भगवान बुद्धांचे चित्र श्रीलंकेच्या दूतावासाने श्री लंकेसाठी स्विकारले व ते श्रीलंकेत लावले गेले "सोपारा दीप" नावाचे लाईट ऑफ सोपारा या इंग्रजी ग्रंथाचा मराठी अनुवाद केलेल्या प्रति प्रा. यादुवराव गांगुर्डे साहेब व अप्पा साहेब घंगाळे यांनी छापल्या. भय्यासाहेब आंबेडकर भ.स.गायकवाड, सी.एन.मोहिते गुरूजी, अप्पासाहेब व माझा त्यावेळचा फोटो पुस्तकात छापलेले आहेत.

वडिलांच्या हस्ते बोधीवृक्षाचे आम्ही जुन्या चाळीत रोपण केले ते १९५६ साली आता त्या बोधी वृक्षाखालीच आम्ही छोटेसे बुद्ध विहार बांधले आहे. ज्या हॉटेलमध्ये आमच्या समाजासाठी झाडाला टांगलेल्या शिक्यामध्ये फुटक्या कप बशा ठेवल्या जात होत्या, ज्या आधी धुवून चहा प्यायल्यानंतर तेथेच परत ठेवाव्या लागत हॉटेलपासून दूर अंतरावर बाकड्यावर किंवा जमिनीवर बसत होतो त्याच हॉटेलात बाबसाहेबांच्या महाड परिषदेनंतर आम्हास इतरांच्या बरोबरीने बसण्याचा सन्मान प्राप्त झाला आहे. त्या अस्पृश्यतेच्या अनुभवलेल्या खुणा आजही आठवल्या की, अंत:करण विदीर्ण होते. बाबासाहेबांच्या वांद्रे व नरे पार्कच्या सभा वडिलांनी हाताला धरून नेल्यामुळे पहाता आल्या. वडिलांचे समाजकार्य मला करता आले हे पुण्य मला प्राप्त झाले आहे.

दिवंगत शिवराम दगडु सावंत
शब्दांकन : ज्ञानकिर्ती सुरेश बा. धोत्रे

# दिवंगत धोंडू तुकाराम मोहिते

दिवंगत धोंडू तुकाराम मोहिते (काणेकरबुवा) हे कोकणातील रत्नागिरी जिल्ह्यांतील चिपळूण तालुक्यांतील कान्दे-पिंपळी हे मूळ गाव कत्तल खान्याच्या निर्मितीनंतर कामाच्या शोधात जी कुटुंबे आली त्या पैकी हे एक कुटुंब होते. त्यांच्या आजीने त्यांना डी.मोर्कोपोलो ह्या सिगारेट कंपनीत कामाला लावले त्यांचे शिक्षण मराठी ३ री पर्यंत झाले होते. तत्कालीन हिंदू देव देवतांच्या कथा लहान मुलांना सांगून ते मनोरंजनाच्या माध्यमातून त्यांचे प्रबोधन करीत असत. त्यांना भजनाची अत्यंत आवड असल्यामुळे ते स्लॉटर हाऊस परिसरात भजनी बुवा म्हणून प्रसिद्ध झाले. यावेळी वांद्र्यातील श्रीराम मंदिर, हनुमान मंदिर, जरीमरी मंदिर ह्या देवळात तत्कालीन महार ज्ञातीतील व्यक्तिना प्रवेश नाकारण्यात येत असे. तथापित धोंडू बुवा हे पट्टीचे भजनी बुवा असल्यामुळे त्यांना मात्र सर्व देवालयात मुक्त प्रवेश होता.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी येवले मुक्का मी १९३५ साली धर्मांतराची घोषणा केल्यानंतर श्री धोंडू बुवा यांनी भजन-किर्तन बंद केले व ते आंबेडकरी-चळवळीमध्ये सक्रीय झाले. स्लॉटर हाऊस मधील मुलांमध्ये शिक्षणाची आवड निर्माण व्हावी म्हणून त्यांनी खूप प्रयत्न केले त्यांनी त्यांच्या तीन मुलांना रात्र शाळेत पाठवून उच्च शिक्षित केले. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या भाषणांचा मार्गदर्शनाचा त्यांच्यावर फार परिणाम झाला. स्लॉटर हाऊसमध्ये माता रमाबाई आंबेडकर व्यायाम शाळा होती त्यामध्ये त्यांच्या मुलांनी लाठी काठी आणि तत्सम इतर शिक्षण घेऊन प्राविण्य मिळविले. सोनू धोंडू मोहिते, शंकर धोंडू मोहिते हे समाज संरक्षणार्गत अग्रेसर राहिले. धोंडू तुकाराम मोहिते यानी चळवळीच्या माध्यमातून भरीव कार्य केले.

विद्यार्थ्यासाठी रात्रीची अभ्यासिका सुरू करण्यासाठी त्यांनी जयराम कासारे यांना मोलाचे सहकार्य केले. तसेच अभ्यासिकेच्या झोपडीत १९५८ साली स्थापन करण्यात आलेल्या जागेत बुद्धविहाराची स्थापना करण्यात त्यांचा सिंहाचा वाटा होता. तत्कालीन महार ज्ञाती पंचायतीच्या शाखा क्र. १७९ चे १० वर्षे अध्यक्ष होते. अल्पशिक्षित असल्यामुळे त्यांना पंचायतीच्या न्याय निबाडा करण्यात ते वाक्‌बगार होते. त्यांनी न्यायातील अडथळे सुकर केले पक्षपाती निर्णय कधीही घेतला नाही. म्हणून ते सर्व जातींत यशस्वी कार्यकर्ता म्हणून स्वत:ची त्यांनी वेगळी छाप पाडली. अशा या सामाजिक, समाजनिष्ठ, निस्वार्थी कार्यकर्त्याचे सन १९८०मध्ये दु:खद निधन झाले. त्याचे स्मृतीस विनम्र अभिवादन.

संकलन ज्ञानकिर्ती सुरेश बा. धोत्रे

# दिवंगत गोपाळ देवजी पवार (चिंचविलकर)

दि. गोपाळ देवजी पवार यांचा जन्म मु. चिंचवीली ता. खेड जिल्हा रत्नागिरी येथे झाला. घरची परिस्थिती अत्यंत गरीबाची होती.घरची परिस्थिती अत्यंत गरीबाची होती. रत्नागिरी जिल्ह्यात महाडमध्ये प्लेग साथीने थैमान घातले गोपाळ देवजी पवार यांचे गरीबीमुळे शिक्षण होऊ शकले नाही. त्यांचा स्वभाव अत्यंत हुड, चिडखोर आणि करारी होता. त्याना व्यायामाची आवड होती.

ते नोकरीच्या शोधात मुंबईस आले. माटुंगा वर्क शॉपमध्ये ते सुरूवातीस खलाशीया पदावर कामास राहिले उंच शरीर यष्टी, सरळ नाक, व पिळदार बाहूमुळे समोरच्या माणसावर त्यांची छाप पडत असे.

गावी वडिलोपार्जित शेती होती. त्याना दोन भाऊ व एक बहिण होती. गंगाराम देवजी पवार हे मोठे होते. ते शेती करीत असत. शंकर देवजी पवार हे लहान होते. गोपाळ पवार यांच्या बहिणीचे नाव पंडीबाई असे होते त्यांचा विवाह बाळाराम सुडकाजी धोत्रे यांच्याबरोबर झाला होता.

गोपाळ पवार यांना व्यायामाची आवड असल्यामुळे ते पहिलवान झाले त्यानी अनेक कुस्त्या जिंकल्या. त्याचबरोबर लाठीकाठीचे ज्ञान असल्यामुळे समाज संरक्षणात त्यांनी महत्त्वाचे योगदान दिले वांद्रे विभागातील जनतेवर जेव्हा जेव्हा मुस्लीम, खिश्चन आणि हिंदू धर्मीय लोकांनी अन्याय अत्याचार केले की, दिवंगत ठुणाजी शिर्के, ना. भि. असगोलकर हे गुप्तपणे संदेश पाठवित तो मिळताच गोपाळ देवजी पवार अन्यायाविरूद्ध तुटून पडत असत. शिर्के, असगोलकर हे स्वत: देखील आखाड्यात तालमीत तयार झालेले असल्याने त्यांना स्वत:ला लाठी-काठीचे ज्ञान होते.

डॉ. आंबेडकर सोसायटीच्या मुळ कार्यकर्त्यांपैकी गोपाळ देवजी पवार हे एक होते. त्यांचे बंधू शंकर हे देखील रेल्वे महालक्ष्मी येथे कामाला होते. वांद्रे विभागात शेड्यूल्ड कास्ट फेडरेशन, स्वतंत्र मजूर पक्ष, समता सैनिक दल यांची सभासद संख्या वाढविण्यास मा. गोपाळ देवजी पवार यांनी मोलाचे सहकार्य केले त्यांनी व त्यांचे मेहूणे बाळाराम सुडकाजी धोत्रे यांनी नवी शेरली येथे घर बांधले व आपल्या इतर नातेवाईकांनाही येथे राहाण्यास बोलावले. बाळाराम धोत्रे व गोपाळ पवार यांनी या परिसरातील गुंडगिरीला आळा घातला. १९५६ साली डॉ. आंबेडकर सोसायटीने बांधलेल्या घरांपैकी एक घर त्यांना ही मिळाले ते सेवानिवृत्त झाले. व वयाच्या ७७ वर्षी त्यांचे दि. ४ जाने. १९७७ रोजी निधन झाले.

# दिवंगत जयराम रामचंद्र कासारे (आंबयेकर)

दिवंगत जयराम रामचंद्र कासारे हे रत्नागिरी जिल्ह्यातील तालुका खेड मु. आंबये या गावचे सुपूत्र त्यांचे वडील श्री रामचंद्र धोंडू कासारे हे १९२० साली उपजिवीकेच्या शोधार्थ तत्कालीन मुंबई बेटाच्या साष्टी या विभागात आले व तेथील जुना कत्तलखाना वांद्रे पश्चिम येथे वास्तव्य करून राहिले. श्री जयराम रामचंद्र कासारे यांचे पूर्वीच्या व्हर्नाकुलर फायनलपर्यंत शिक्षण झाले होते. त्यांनी वांद्रे नगरपालिकेत लायसन्स विभागात नोकरी करण्यास सुरूवात केली. तेथे ते बाजार निरीक्षक या पदावर कार्यरत असताना त्यांनी आंबेडकरी चळवळीत सक्रीय सहभाग घेतला. चळवळीच्या माध्यमातून त्यांची समाजवादी चळवळीतील अग्रगणी श्री नानासाहेब गोरे, श्री मधू लिमये, श्री एस.एम. जोशी प्राध्यापक आणि माजी शिक्षणमंत्री श्री सदानंद वर्दे यांच्याशी त्यांचे घनिष्ठ संबंध प्रस्थापित झाले. त्या वेळच्या गोवा मुक्ती संग्रामात सक्रिय सहभाग घेतल्यामुळे त्यांना दीड वर्षाची कारावासाची शिक्षा झाली. त्यावेळी त्यांना प्रतापगडावरील बंदीवासात ठेवण्यात आले. कारागृहांतून मुक्त झाल्यानंतर आणि नोकरीचा राजीनामा देऊन अखिल भारतीय रिपब्लिकन पक्षाच्यावतीने नगरपालिकेची निवडणूक वांद्रे मतदार संघातून लढविली त्यावेळच्या निवडणूक पद्धतीनुसार प्रथम पंसतीच्या ३ उमेदवारांची निवड झाली.श्री जयराम रामचंद्र कासारे यांना ४ क्रमांकाची मते मिळाल्यामुळे त्यांचा फक्त २३ मतांनी पराभव झाला. त्यावेळी श्री सदानंद वर्दे यांनी त्यांची प्रंशसा करून त्यांना चळवळीमध्ये राहाण्याचा मोलाचा सल्ला दिला. त्यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी जुना कत्तलखान्यातील झोपडपट्टी रहिवाश्यांसाठी नागरी सुविधा उदा. नळपाणी योजना, शौचालयाची निर्मिती व वसाहतीमध्ये दिवाबत्तीची सोय उपलब्ध केली.

स्लॉटर हाऊसमध्ये रमाबाई आंबेडकर व्यायमशाळा नावाचा आखाडा होता. त्यामध्ये दांडपट्टा, छडीपट्टा, लाठी-काठी,आदिचे शिक्षण मानकर वस्ताद यांच्या मार्गदर्शनाखाली दिले जाई हे शिक्षण सोनू धोंडू मोहिते, शंकर धोंडू मोहिते आदि तरूणांनी घेतले होते. तत्कालीन मुंबईचे महापौर क्रॉफर्ड मार्केट येथे सर्व व्यायाम शाळांना आपल्या कसरतीचे खेळ दाखविण्यास वर्षातून एकदा संधी देत अशाच प्रसंगी एकदा माता रमाबाई आंबेडकर व्यायाम शाळेचा दुसरा क्रमांक आला होता. तसेच पालिका शाळेत शिक्षण घेत असलेल्या स्लॉटर हाऊसमधील विद्यार्थ्यांसाठी रात्रीची अभ्यासिका सुरू केली. त्याच झोपडी वजा जागेत बुद्ध विहाराची स्थापना केली. त्यावेळच्या महार ज्ञाती पंचायत समितीच्या शाखा क्र.१३३ व नंतर शाखा क्र.१७९ चे ते चिटणीस होते. त्यांनी आपले सर्वस्व आंबेडकरी चळवळीला वाहिल्यामुळे महाराष्ट्र राज्य शासनाने त्यांना विशेष कार्यकारी दंडाधिकारी ही पदवी बहाल करून त्यांच्या कार्याची प्रशंसा केली. त्यानी अनेक अडचणीशी मुकाबला केला ते आदरणीय बी.सी.कांबळे यांचे कट्टर समर्थक होते. सार्वजनिक कामासाठी ते महापालिकेच्या मुख्य कार्यालयात गेले असताना त्यांना हृदयविकाराचा तीव्र धक्का बसला व त्यातच त्यांचे दु:खद निधन झाले. अशा नि:स्वार्थी, निगर्वी समाजसेवकाच्या निधनाने समाजाची अपरिमित हानी झाली.

## धर्मा काळ्या तांबे (डी.के.तांबे)

धर्मा काळ्या तांबे (डी.के. तांबे) आंबेडकरी चळवळीतील जेष्ठ आणि श्रेष्ठ विचारवंत निर्व्यसनी, नि:स्वार्थी, प्रसिद्धीच्या प्रकाश झोतात न राहाणारा निष्ठावंत कार्यकर्ता असा थोडक्यात त्यांचा उल्लेख करावा लागेल वय ८० च्या पुढे जन्म वांद्रयातीलच आंबेडकर रोडवरील पुतळ्याच्या निर्मितीतील एक मुख्य आधारस्तंभ यांनी दिलेली जातीयतेचीही दाहक माहिती.

''माझे वडील काळ्या लख्या तांबे गाव खेड जिल्ह्यातील सुकविलीत'माझा जन्म झाला. शिक्षण जुन्या चाळीत लहानपणापासून दीर्घोघोगी आम्ही एकूण १२ भावंडे,२ भाऊ व २ बहिणी. मी सर्वांत हयात असणारा आता मोठा

वडील कत्तलखान्यात कामाला होते. देश स्वतंत्र नव्हता. कायदे ब्रिटीशांचे वांद्रयातील मूळ रहिवाशी कोळी, दातारी, (खिश्चन) आणि महार म्हणजे आपण आपली वस्ती त्या मानाने अल्प असलेली आपल्या समाजावर सातत्याने अत्याचार होत असत त्याचे निवारण होत नसे. सहन करणे व गप्प राहणे हा एकमेव मार्ग असे. वडील सकाळी ५.३० ला जात परत येण्याची वेळ रात्री २च्या पुढे असे. त्यामुळे आपला बाप कोण हे बऱ्याच मुलांना माहित नसे. सुट्टी तर अजिबात नसायची. कत्तलखाना १८८५ मध्ये वांद्रे उपनगरात आला. त्या आधी तो क्रॉफर्ड मार्केट येथे होता. येथे येण्याचे कारण इंग्रज लोक चांगला पोशाख करीत असत. फिरावयास जहाजावर बंदरामध्ये जात असत. गिधाडे, घारी, कावळे मासाचा तुकडा घेऊन उंच आकाशात भरारी घेत चुकून चोचीतून पडलेले मांस अंगावर पडे कपडे खराब होत. वांद्रे उपनगर मुंबईच्या बाहेर असलेले जंगलाने वेढलेले म्हणून कत्तलखाना मुंबईच्या बाहेर नेण्याचा निर्णय घेण्यात आला. आजचा बी.ई.एस.टी चा डेपो व स्टेशनपासूनची जागा त्याने व्यापलेली. बैलांचा बाजार (मंडी) भरत असे. बकऱ्यांचा वेगळा बाजार अधिकारी वर्ग इंग्रज होता. ॲनिमल डिपार्टमेंट नावाची पुण्याची संस्था होती. त्यांचे डॉक्टर व अधिकारी येत असत. आजारी जनावरे, गर्भार गायी यांची परीक्षा दुधावरून होई, डांबराचा डबा गरम केलेले शिक्के मारण्यास वापरत. हाताच्या पंजा एवढा शिक्का असे त्याला म्हणत. V.D बापाला कमाई फार असे. जाकिटाच्या अनेक कप्पी खिशात २ आणे ४ आणे ८ आणे १ रूपया असे भरलेले असत वडील दारू पिऊन पडले की आमची मजा असे.

आम्ही लहान मुले ही कामावर आतडी साफ करण्यास जात असू. कत्तलखान्यात अे.डी. मायर नावाची कंपनी होती व मोठी कंपनी धारावी येथे होती. बकऱ्याला कापल्यानंतर त्यांच्या पोटातील लहान आतड्याना पाण्याने धुवून ४ वेळा फुगवून पाण्याच्या टाकीत टाकून ठेवण्यात येई. नंतर २५/२५ चे निवडक बंडल बांधून त्याच्यावर प्रक्रिया हातानेच केली जाई. चक्रामध्ये

फिरवून त्याला सुकविले जाई. सुतासारखे झाले म्हणजे शस्त्रक्रिया करण्यासाठी रॅकेटसाठी वापरत. मोठ्या आतड्यावर प्रक्रिया करून त्यात मटण भरून युद्धावर असणाऱ्या सैनिकांना पाठवित या कंपनीत मी व तुक्या येश्या यांनी काम केले आहे. वांद्र्यावरून धारावी येथे बैलगाडी भरून सर्व माल न्यावा लागे.

मुसलमान, खिस्ती व हिंदू आपणास शिवत नसत. एस.व्ही.रोडवर दोन प्रसिद्ध हॉटेल्स होती एक मुस्लीमाचे व एक हिंदूचे दोघांच्या येथे आपल्यासाठी फुटके कप व फुटक्या बशा असत. आपले लोक त्यावेळी गोमांस भक्षण करीत. गरीबी, अज्ञान यामुळे आपलाही नाईलाज होता त्यामुळे त्या मटणाचा खिमा किंवा बकऱ्याच्या मटणाचा खिमा, पाव, भाकरी यांना भरपूर मागणी असे आपण या हॉटेल जवळ जायचे तारेच्या शिक्यातील कप बशी घ्यायची धुवायची आणि ऑर्डर दिल्यावर तो वरून टाकीत असे. आपले खाऊन झाल्यावर आपण बशी धुवून ठेवायची व लांब बसायचे अशी दाहक अस्पृश्यता होती.

महाडच्या सत्याग्रहाच्या आधीपासून तयारीला सुरूवात झाली. आपल्या समाजासाठी काही तरी मोठे काम चालले आहे व आपण लढायला पाहिजे. अन्याय अत्याचार आता सहन करायचा नाही अशा गुप्त बैठका म्हणजे सिगारेट कंपनीत कमेल्यात कामाच्यानिमित्ताने एकत्र असल्याने करीत. आम्ही तरूण मुले होतो. आमची संख्या जवळ-जवळ ३०-४० होती. बाबासाहेबांच्या सभा भाषणे ऐकून आमच्यात चेतना निर्माण झाली. आमच्या वस्तीत रमाबाई आंबेडकर व्यायाम शाळा निर्माण झाली. गंगाराम पांडूरंग मानकर हे त्यावेळचे शिक्षक होते. त्या वेळच्या प्रसिद्ध आखाड्यात बावन डाववाला भाग्या व शंकरदादा रोविलकर यांच्या आखाड्या खालोखाल व तोडीस तोंड देणारे खेळाडू निर्माण झाले त्यांनी शिक्षण देऊन आत्म निर्भर व स्व संरक्षण करणारी स्लॉटर हाऊसमधील महिला व पुरूषांची फळी निर्माण केली.

सोनू धोंडू मोहिते व धर्मा धोंडू मोहिते हे भाऊ १२ डाव खेळायचे सखाराम गुणाजी का लुस्ते गंगाराम काळू गायकवाड (माटवणकर) रामा यशवंत कांबळे, नामूबाई सखाराम गोडावले हे खेळायचे.

भिकू पंदीरकर हे मानकर यांचे गुरू होते. त्यानी मानकर यांना आम्हा ३०-४०लोकांना शिक्षण देण्याचा सल्ला दिला. त्यामुळे आम्ही तरूण तयार झालो त्याचा परिणाम निदान वांद्रयात तरी अस्पृश्यता नष्ट झाली व मुसलमान लोक बरोबरीचा दर्जा देऊ लागले मकदूमशहाबाबाच्या निघाणाऱ्या संदल मध्ये हरीगोपाळ व सखाराम गुणाजी हे दोघे कसरतीचे खेळ दाखवून शाबासकी मिळवीत कॉफर्ड मार्केटमध्ये मेयर मुंबईमधील महापालिकेच्या अशा प्रकारे खेळणाऱ्या लोकांना बोलावत. त्यामध्ये रमाबाई आंबेडकर व्यायाम शाळेच्या २ रा नंबर आला होता. समाजाच्या संरक्षणास त्या कलेचा आम्हाला उपयोग करता आला व समता सैनिक दलाला सहकार्य करता आले.

पुर्वी मुंबई ही माहिमपर्यंत होती. बाकी सगळा जंगल परिसर व दलदल होती. मोठमोठी

अस्सल जनावरे (साप) येत असत. स्लॉटर हाऊसमधील काही जुनी मंडळी दगडू गणू बागले मालवणी जुवारकरांच्या आधीचे. धोंडू तुकाराम मोहिते यांचे एकतारी भजन मंडळ होते. आमच्या चाळी या प्रथम सरकारने लोकांना रहाण्यासाठी बांधल्या होत्या. परंतु धनगर व व्यापारी त्यांत रहात नसत. धनगर म्हणजे धनाचे आगर.त्यांना बकऱ्या, शेळ्यामध्ये राहाण्याची व मुक्त आकाश आणि विशाल जमिन हीच आमची कर्मभूमी आहे असे ते समजत. या चाळीना कोंडवाडा म्हणून समजून त्यानी नाकारले म्हणून कामगारांना राहावयास या चाळी मिळाल्या. आत्माराम भांबू भारणकर व गंगाराम नावाचे शिक्षक महानुगकर बुवाच्या खोलीत सोनू रहात. धोंडू मोहिते सिद्धार्थ कॉलेजमध्ये शिकले. जयराम कासारे व त्यांचे भाऊ विठ्ठल जनावराची कातडी सोलण्यास होते

लोक मचाण बांधून रहात असत अंधश्रद्धा भयंकर होती. जेवून रात्रभर जागरण करीत व भजने गात असत. सापापासून काठीच्या सहाय्याने संरक्षण करीत. धोंडू तुकाराम मोहिते यांना सोनू, शंकर, धर्मा, तुकाराम असे चार मुलगे होते हे लाठी-काठीचे शिक्षण घेऊन समाज संरक्षणात अग्रेसर राहिले. पाण्यासाठी ही लढाई आहे मुस्लीम समाजाच्या लक्षात आले. पाणी ही अल्लाची देन आहे त्यावर हिंदूचा अधिकार कसा? त्यामुळे त्यांची आपल्याबद्दलची भावना शिथील झाली व अस्पृश्यता (मुस्लिम पाळीत असलेली) नष्ट झाली. महाडच्या सत्याग्रहाच्या बैठका १९२७ च्या आधीपासून सुरू झाल्या होत्या त्याने जागृती झाली. स्वतंत्र मजूर पक्ष, शेड्यूल्ड कास्ट फेडरेशन, जनता पत्र यांची नोंदणी जोमात होती. मुसलमान कार्यकर्ते अरबसाब ठेकेदार हे कुठल्याही आपल्या कार्यक्रमाला लोकाग्रहास्तव येऊ लागले.

आमच्या मंडळाच्यावतीने आम्ही वीज नसता नाही पेट्रोमॅक्सच्या दिव्यावर भव्य स्वरूपात जयंती केली ते पाहून परिसरात आश्चर्य व्यक्त केले जाऊ लागले की इतका जमाव कसा? जमला? मग आम्ही तीन दिवसांची जयंती करण्याचे ठरविले तसे आम्हाला ३ दिवसाकरिता स्पेशल मीटर वीज अधिकाऱ्याने येऊन बसवून दिले. मग आम्ही अधिकार वाणीने बौद्ध धम्मावर बोलणारे प्रा.व्ही.जी.रावसाहेब यांना बोलावले त्यांनी एक तास विद्वता प्रचूर भाषण केल्यामुळे आमच्या मंडळाची वाहवा झाली व त्यातून एम.डी.जाधव, जयराम कासारे, सोनू मोहिते आदि कार्यकर्ते घडले.

# कसरतीच्या खेळाचे प्रकार

जमिनीवर काचाचा ढीग अंथरला जायचा त्यावर गंगाराम काळू गायकवाड (माटवणकर) हे झोपत असत. त्यांच्या छातीवर २x२; २x४ जाडीच्या काळ्या दगडाचे दोन दोन थर लावीत असत. १ दगड उचलण्यास ६ लोक लागत. अशा दोन दगडांना एकमेकांवर ठेवून त्यावर २ किंवा ३ घणांचे घाव घालीत तो दगड फुटून तुकडे होत आणि खेळाडूही सही सलामत रहात असे.

दुसऱ्या खेळात एका बैलगाडीत २५-३० तरूण बसत असत. खेळाडू काचेच्या ढीगावर झोपत असे त्याच्या छातीवरून ती बैलगाडी जात असे भयानक खेळ कत्तल खान्यात खेळणारे रमाई आंबेडकर व्यायाम शाळेचे भिमसैनिक असत.

कत्तलखान्यात रहात असलो तरी बाबासाहेबांचे विचार बुद्धांचे निती व क्रांतीबा फुल्याचे सत्य यांचा त्रिवेणी संगम निर्माण झाला. बाबासाहेबांना प्रत्यक्ष पहाता आले, त्यांची वाणी श्रवण करता आली त्यांच्या चळवळीत सहभागी होता आले हीच आमच्या जीवनाची मोठी कमाई आहे. पण आजची परिस्थिती पाहिली की अतीव दु:ख होते.

शब्दांकन : ज्ञानकिर्ती सुरेश बा. धोत्रे.

## दिवंगत - गजानन ठुणाजी शिर्के

दिवंगत मा. गजानन ठुणाजी शिर्के यांचा जन्म ३१ डिसेंबर १९३१ साली मु.पो. गोरेगाव ता.माणगाव जि. रायगड येथे झाला. नामकरण विधी झाल्यानंतर वडिलांनी मुंबई वांद्रे येथे भाभा रूग्णालयाच्या मागे आपल्या समाजाची मोठी वस्ती होती तेथे त्यांना आणले. वडील ठुणाजी तुकाराम शिर्के डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी स्थापन केलेल्या स्वतंत्र मजूर पक्षाचे वांद्रे मुंबईमध्ये कार्य करीत होते. शिवाय पक्षाचे मुखपत्र 'जनता' साप्ताहिकाचे ते एजंट होते. १९३२ साली आंबेवाडी खार (पू.) येथे रहावयास आले. १९३८ साली बांद्रा म्युनिसीपालिटीची निवडणूक लढवून प्रचंड मताने निवडून आले. गजानन शिर्के यांचे शालेय शिक्षण महापालिका मराठी शाळा क्र.१ मध्ये वांद्रे येथे झाले. ४ थी इयत्ता उत्तीर्ण झाल्यावर ओरियंटल स्कूलमध्ये दाखल झाले. १९४७ साली व्हर्नाकुलर फायनल परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर ते इंग्रजी शाळेत दाखल झाले. तद्नंतर दादर विद्यामंदिरमध्ये प्रवेश घेऊन ११ वीची परीक्षा दिली. परंतु त्या परिक्षेत ते अनुत्तीर्ण झाले. त्यांचे वडील १५ वर्षे वांद्रे नगरपालिकेत नगरसेवक होते. १९५० साली नगराध्यक्ष होण्याची संधी आली परंतु डॉ. डायस नगराध्यक्ष पदावर निवडून आले. वडीलांचे १९५६ साली निधन झाले. वडीलांकडून संस्कारक्षम समाज कार्याचा वारसा लाभल्यामुळे गजानन शिर्के यांनी समाज सेवा व राजकारणात स्वत:ला झोकून दिले. वांद्रे विभागात ते कार्यरत झाले १४ ऑक्टोबर १९५६ साली डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी दिलेल्या धम्मदिक्षा सोहळ्यास हजर राहून बौद्ध धम्माचा स्वीकार केला. १९५७ साली नागपूर मुक्कामी रि.पा.ई.ची स्थापना झाली. त्यातही शिर्केयांचा सहभाग होतात. ३ ऑक्टोबर १९५८ मध्ये पक्ष दुभंगला आणि दुरूस्त व ना दुरूस्त असे दोन भाग पडले त्यापैकी दुरूस्त पक्षाचे बी.सी. कांबळे नेतृत्व करीत होते. गजानन शिर्के यांनी वांद्रे विभागात १९६० साली रि.पा.ई यांच्या पक्षाचे काम जोमाने सुरू केले. १९६१ साली एच वार्डातून रि.पा.ई उमेदवार सी.एन.मोहिते गुरूजी होते हे देखील रि.पा.ई.चे उमेदवार होते ते त्यांचे प्रतिस्पर्धी होते मतांची विभागणी झाली आणि दोनही उमेदवार पराभूत झाले तरीही पराभूत झाल्याचा खेद मनात न ठेवता ते सतत कार्यरत राहिले. १९९४ साली खेरवाडी तालुका रिपाईचे अध्यक्ष झाले आणि पक्ष संघटना मजबूत केली घरची परिस्थिती अत्यंत गरीबीची असताना ही सामाजिक बांधीलकीची जाण ठेवून आजही तरूणांना आदर्शवत वाटावे असे कार्य सातत्याने सुरू आहे. वयोमानपरत्वे आजारपण, पायाची व्याधी असूनही राष्ट्रीय नेत्यानीही वेळोवेळी दिलेल्या आदेशाचे पालन, मोर्चा, धरणे, रास्ता रोको, जेल भरो इ. आंदोलनात शिर्केसारखा भिम सैनिक कसलीही कुरबूर न करता सहभागी होत आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांवरील असिम भक्ती आणि श्रद्धेमुळे मा. गजानन शिर्के यांची जिद्द आणि चिकाटी रिपाई प्रति असलेल्या भूमिकेमुळे जनमानसात चिरपरिणामी ठसा उमटला आहे आदर्श जीवनाचे मूतिमंत प्रतिक म्हणजे गजानन शिर्के होत. वांद्रे विभागाचे ते भूषण आहेत. बहुजन हिताय बहुजन सुखाय या ध्येयाने प्रेरीत होऊन कार्य करणाऱ्या आदर्श व्यक्तिच्या प्रति कृतज्ञता व्यक्त करण्याच्या पवित्र हेतूने आदरणीय गजानन शिर्के यांना मानाचा मुजरा!

# दिवंगत आप्पासाहेब घंगाळे



दि. आप्पासाहेब घंगाळे यांचा जन्म कोरड्याचे हिवरे या गावी, तालूका पारनेर जिल्हा अहमदनगर येथे दिनांक १२/२/१९२२ रोजी झाला. त्यांचे पूर्ण नाव आप्पासाहेब रावजी घंगाळे असे होते. त्यांना एकूण दहा भावंडे होती आणि सर्वांत लहान म्हणजे अकरावे अपत्य आप्पासाहेब होते त्यांच्या आईचे नाव सुगंधाबाई व वडिलांचे नाव रावजी.

त्याकाळी एकदा प्लेगची साथ आली होती आणि त्यात त्यांचे वडील रावजी घंगाळे तसेच दोन ते सहा फक्त सात सोडून दहा क्रमांकापर्यंतची सर्व भावंडे मृत्यूमुखी पडली. प्लेगच्या साथीने त्यांचे सारे कुटुंबच गेले. फक्त राहिले ते अप्पासाहेब त्यांचा मोठा भाऊ भिवाजी, व सात नंबरची बहिण सुंदरा त्यांची आई सुगंधाबाई हिने सर्वांची प्रेते स्वत:च्या हाताने खड्डा खणून एकत्रच त्या खड्डयात पुरली. संपूर्ण गाव प्लेगच्या रोगामुळे उजाड झाले त्यामुळे लोक मुंबई, पुणे, नाशिक, अकोला या सारख्या ठिकाणी विखुरले गेले.

मग सुगंधाबाईनी आपल्या तीन मुलांसह गाव सोडण्याचा निर्णय घेतला. जे हाताला लागेल ते गाठोडे घेऊन अहमदनगरच्या प्लॅट फॉर्मवर आले.

सगळे गावचं रिकामे झाले. कोणाकोणाचे तर संपूर्ण कुटूंबच प्लेगमध्ये बळी गेले. काहीचा वंशच नष्ट झाला. त्यावेळी पाणी टंचाई, अन्न टंचाई, भूक बळी यामुळे खूपच गरीबी होती. हाता तोंडाशी गाठ पडत नव्हती. उपासमारीमुळे व त्यात प्लेगची साथ यामुळे आणखीनच दिशाहीन पद्धत झाली होती. उरले सुरलेले लोक पोट भरण्यासाठी शहराकडे धाव येत होते. त्यातच अप्पासाहेब, भिवाजी सुंदरा आणि आई सुगंधाबाई हे अहमदनगर स्टेशनवर गाडीची वाट पाहत होते. त्यामध्ये विधाते नावाचे एक कुटुंब होते त्यांनी सुगंधाबाईना विचारले ''बाई ही लेकरं बाळं घेऊन कुठं जातेस मुंबईला? एक तर ते तुझ्यासाठी अनोळखी शहर आहे त्यापेक्षा असं कर माझ्या मुलाला तुझी मुलगी दे त्यामुळे आपले नाते राहिल आणि त्या निमित्ताने येणे-जाणे होईल. सुगंधा बाईला हा विचार पटला व त्यांनी तेथेच बसल्या बैठकीत विधातेचा मुलगा काशीनाथ व सुंदरा यांचा छोटासा विवाह केला.

तसेच मोठा मुलगा भिवाजी त्यास देखील एक पोलीस हवालदाराने त्याच्या एकूलत्या एक मुलीसाठी 'घर जावई' म्हणून बोलणी केली आणि त्यांचा ही विवाह पार पाडून दिला.

आता राहिले आप्पासाहेब व त्यांची आई सुगंधाबाई तेवढ्यात आईचा सख्खा भाऊ देखील

तेथे भेटला. त्यांना पाच मुली व एक मुलगा होता ते देखील (कांबरगावचे) मुंबईला यायला निघालेले तो म्हणाला, ''बाय माझ्या पाच मुलीतली एक तरी मुलगी तुझ्या आप्पाला कर, तेवढेच माझे ओझे कमी होईल'' मग सुगंधाबाईनी तिची सर्वांत आवडती भाची म्हणजेच पाचवी सर्वात लहान मुलगी सोनूबाई हिला पसंत केले. अशा प्रकारे लहानपणीच स्टेशनवरच आप्पासाहेबांचा विवाह सोनूबाई हिच्याबरोबर झाला.

आता सोनूबाई आप्पासाहेब व सुगंधाबाई हे तिघे जण मुंबईला आले. भायखळा स्टेशनवर उतरले. गरीबी तर पाठीशी होतीच. आप्पा हे अंगठा बहादूर त्यांची पत्नीही त्यांच्यासारखीच व सुगंधाबाई सुद्धा अडाणी.

त्यांनी अक्षरश: भाजीतल्या, कचऱ्यातील भाज्या निवडून गोळा करून दगड विटांची चूल बनवून फुटपाथवर संसार सुरू केला. हळू हळू आप्पाजी काम करू लागले. मोलमजूरी करू लागले. आई (सुगंधाबाई) देखील लोकांच्या घरी मोलकरणीची, धुण्या-भांड्यांची कामे करू लागली. सोनूबाई तिच्या कामात मदत करू लागली.

गरीबीच्या कठीण परिस्थितीत दिवस काढत असताना बाबासाहेबांची एक सभा भायखळ्याच्या लव्हलेन येथे झाली. आप्पानी ती सभा पाहिली. बाबासाहेबांचे भाषण ऐकले व आप्पा भारावून गेले.

काय ते व्यक्तिमत्व तो तेज:पुंज चेहरा, सुटा बुटातील पोशाख बोलण्याची पद्धत सत्याची झलक हा माणूस देव तर नाही ना? त्यांचा प्रत्येक शब्द लोक झेलत होते. त्यांच्या वाक्यासरशी लोक हमसाहमशी रडत होते. बाबासाहेबांचे बोलणे कडू पण सत्य होत.

आप्पाजी बाबासाहेबांची भाषणे ऐकत असत जवळून बाबासाहेबांचे दर्शन घेत. पहेलवानासारखे दिसणारे आप्पा सर्व काही सोडून जेथे सभा असेल तेथे हजर होत. नोकरी नसल्याने ते भक्तासारखे बाबांच्यामागे असत. असे करता करता ते खार (प.) येथे आले. कोणीतरी पहेलवान पोरगा जीवाचे रान करून माझे भाषण ऐकत असतो.

बाबासाहेबांनी त्यांना जवळ बोलावले. आप्पाना खूप आनंद झाला. क्षणभर देव भेटल्यासारखे झाले. बाबांनी त्यांची विचारपूस केली त्यांना रेल्वेत वालू पगारे यांना सांगून नोकरीला लावले व्ही. जी.राव यांना सांगून घराचा बंदोबस्त केला. बाबानी त्याना (आप्पाना) विचारले ''का रे पोरा तुझं नाव काय ? शिक्षण काय ? आप्पानी मान खाली घातली. तेथेच सामोरे नागो भालेराव (अॅडव्होकेट) व बच्छाव (अॅडव्होकेट) हे बसले होते बाबांनी ह्या दोघांना सांगून आप्पाना ग म भ न शिकवायला सांगितले.

आप्पांना बाबासाहेबांचे कार्य खूप आवडायचे त्यांनासुद्धा बाबासाहेबांसारखे धर्म प्रचाराचे काम करावेसे वाटू लागले. मग आप्पानी हळू बौद्ध धम्माचा प्रचार सुरू केला. बाबांबरोबर अनेक चळवळीमध्ये भाग घेतला. रेल्वेच्या नोकरीतून सुटल्यावर ते बाबांचे प्रबुद्ध भारत हे दैनिक संपूर्ण वाटायचे. त्यांनी बाबासाहेबांवर लेख लिहायला सुरूवात केली. त्यांनी विनामूल्य पुस्तके वाटली.

आप्पासाहेब बाबासाहेबांच्या समता दैनिक दलात सामील झाले. हुतात्मा चौक डिव्हिजनमध्ये डिव्हीजनल ऑफिसर पदापर्यंत बढती मिळाली. नालासोपारा बौद्ध जयंती उत्सव समितीचे सरचिटणीस इंडो, जपान एज्युकेशन सोसायटी, बुद्ध धम्म इंप्रुमेंट सोसायटी, भारतीय बौद्ध परिवारद आदान प्रदान सोसायटी, महादेव (शंकर) टेंपल सुखलाजी स्ट्रीट मुंबई विश्वस्त सरदहू वास्तूचे कागदपत्र आणि दस्तऐवज आजही डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या नावावर आहेत.

अशा अनेक संस्थामधून आप्पा साहेबांनी समाजसेवा केली आहे. वयाच्या ८२ वर्षी त्यांचे दु:खद असे निधन झाले. दिनांक ४ फेब्रुवारी २०००.

## दिवंगत महादेव धाकू जाधव (निळीककर)

दि. महादेव धाकू कदम हे कोकणातील रत्नागिरी जिल्हा खेड तालुक्यातील निळीक या गावचे रहिवाशी त्यांचे प्राथमिक शिक्षण फायनलपर्यंतचे शिक्षण निळीक या त्यांच्या जन्मगावीच झाले. तद्नंतर त्यांचे सख्खे चुलते श्री बाळू जाधव निळीकळर यानी त्यांना नोकरी निमित्त १९४० साली मुंबईत आल्यावर त्यांना बाळू जाधव यांनी पालिकेच्या वांद्रे येथील जुन्या कत्तलखान्यात नोकरीस ठेवले. त्यावेळच्या पालिकेच्या १७ रूपये पगारात स्वत:चा उदरनिर्वाह करून कुटुंबाच्या पालन पोषणाकरिता गावी दरमहा न चुकता काही रक्कम पाठवून आपले कौटुंबिक कर्तव्य पार पाडत असत. नोकरी करीत असताना कामागारांच्या अनेक समस्या त्यांच्या व्यथा व त्यांच्या असलेल्या गैरसोयीबद्दल त्यावेळच्या कत्तलखाना अधिक्षकांना लेखी निवेदन देण्याचे धारिष्ट्य त्यांनी केले. त्यामुळे त्यांचा वरिष्ठ अधिकाऱ्यांशी घनिष्ठ संबंध आला. कामगारांच्या व्यथा सोडवित असताना डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी प्रस्थापित केलेल्या म्युनिसीपल कामगार संघाशी त्यांची नाळ जोडली गेली त्यानी जे.जी. भातनकर आर.जी.खरात; सी. एच. खरे यांच्या मार्गदर्शनाखाली कामगारांसाठी कार्य करीत असताना कधीही स्वत:चा तोल ढळू दिला नाही. अत्यंत निगर्वी, नि:स्वार्थी, मितभासी व विनम्र असलेल्या श्री. म.धा.जाधव यांना आंबेडकर चळवळीत जे.जी. भातणकर यांच्या मार्गदर्शनाखाली तत्कालीन अखिल भारतीय रिपब्लिकन पक्षात व कामगार संघात मानाचे स्थान देण्यात आले. श्री जयराम रा. कासारे यांच्या बरोबरीन त्यांनी कत्तलखान्यातील रहिवाशांकरिता नागरी सेवासुविधा पुरविण्यासाठी सातत्याने प्रयत्न केला सन १९५८ मध्ये स्लॉटर हाऊस परिसरातील विद्यार्थ्यांसाठी रात्रीची अभ्यासिका सुरू करण्यासाठी मोलाचे सहकार्य केले.तसेच अभ्यासिकेच्या जागेत १९५८ साली स्थापन करून मोलाचे सहकार्य केले. तत्कालिन पंचायत समितीच्या शाखा क्र.१३३ चे दुय्यम चिटणीस होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची जयंती साजरी करण्यात आली त्या उत्सव समितीचे ते उपाध्यक्ष होते. त्यांच्या सामाजिक कार्याची जाणीव ठेवून महाराष्ट्र शासनाने त्यांना विशेष कार्यकारी दंडाधिकारी ही पदवी बहाल करून त्यांच्या कार्याचा यथोचित सन्मान केला त्यांनी स्लॉटर हाऊसमधील म्युनिसीपल चाळ क्र.६ व ७ तेथील महापालिका कर्मचारी सेवानिवृत्त झाल्यानंतर त्यांच्या खोल्या रिक्त करण्यात येत असत त्या निवृत्तीनंतर ही भाडेतत्त्वावर त्यांच्या ताब्यात ठेवण्यास तत्कालीन उपायुक्त श्री. कुंदा कदम यांचेकडून आदेश मिळविले. त्यामुळेच आज स्लॉलटर हाऊस म्युनिसिपल चाळ क्र.६,७ व ८ मधील महापालिका कर्मचारी सेवा निवृत्तीनंतरही सुखेनैव आपल्या कुटुंबासह कर्मचारी वसाहतीत भाडेतत्त्वावर वास्तव्य करीत आहेत. अशा कार्यकुशल कार्यकर्त्यांचे वृद्धाप काळाने निधन झाले.

# दिवंगत तुकाराम यशवंत कांबळे (वालकर)



डॉ. बाबासाहेब आंबेडकरी चळवळीतील निष्ठावान, चारित्र्यवान, शीलवान व्यक्तिमत्व म्हणजे तुक्या येशा होय. जन्मस्थान कोकणातील राजापूरजवळ वाल हे गाव मोठे भाऊ रामा वडील हे स्लॉटर हाऊसमध्ये कामाला होते. रामा हे माता रमाबाई आंबेडकर व्यायाम शाळेचे मुख्य खेळाडू होते. त्यांना ५२ डाव लाठी-काठीचे येत होते. दांडपट्टा, छडीपट्टा त्यांच्या इतका जलदगतीने चालविणारा दुसरा कुणीही नव्हता. तुकाराम हे विदुषकाचे पात्र करीत असत. रामा इतके लाठी-काठीचे शिक्षण त्यांना नव्हते.

तुकाराम यशवंत कांबळे यांना दोन पत्नी होत्या पहिल्या पत्नीपासून त्यांना नऊ मुली झाल्या. त्यांना मुलगा हवा होता म्हणून त्यांनी विठाबाई यांच्याशी पुनर्विवाह केला. त्यांना एक मुलगा व तीन मुली झाल्या. मुलाचे नाव दिपक असे होते. तुकाराम यशवंत कांबळे हे बॉम्बे गॅरेजमध्ये कामाला होते. त्याचबरोबर अेडीमार कंपनीत काम करीत असत.

रामा हा उत्कृष्ट खेळाडू असल्यामुळे तत्कालीन महापौर मुंबईतील सर्व व्यायामशाळा क्रॉफर्ड मार्केट या मैदानात वार्षिक खेळाच्या स्पर्धेसाठी बोलावीत. स्पर्धा होत असत. वांद्रयांचा संघ (व्यायामशाळा) दुसऱ्या क्रमांकावर आला होता. त्यामुळेच त्याचा अपघाती मृत्यू झाला. त्यामुळे तुकाराम यशवंत कांबळेवर फार मोठा धक्का बसला ते आपल्या सोबत फक्त धर्मा काळ्या तांबे यांना ठेवीत असत. धर्मा काळ्या यानाही लाठी-काठीचे उत्तम प्रशिक्षण होते.

भाऊ अकाली निधन पावल्यानंतर त्यांच्यात फार बदल झाला. ते सामाजिक समस्यांवर गांर्भायीने विचार करू लागले. बाबासाहेबांच्या प्रति त्यांची अढळ निष्ठा होती. त्यामुळे ते चळवळीत सक्रीय झाले. त्यांनी कुणाकडूनही मोबदला न घेता महापालिकेत सफाई कर्मचारी म्हणून १००-१२५ लोकांना (तरूणांना) कामाला लावले. महापालिकेच्या सर्व अधिकारी वर्गाशी त्यांचे प्रेमाचे संबंध असत. महापालिकेच्या कर्मचारी समस्यांवर ते स्वत:प्रतिनिधीत्व करून आपले म्हणणे पटवून देऊन त्या समस्या सोडवीत असत. कामगार संघटनेमध्ये त्यांना फार मान होता.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी प्रस्थापित केलेल्या कामगार संघाचे दगडू सावंत हे कार्यकर्ते होते. त्यांना एम.डी जाधव काशा विठ्ठल यांना पदोन्नति मिळाली ते कॉफर्ड मार्केटमधील महापालिकेच्या वेगवेगळ्या विभागात गेले आणि तुकाराम यशवंत यांना मुकादम म्हणून नियुक्त केली गेली. त्यांनी नवीन सभासद करणे, वर्गणी गोळा करणे, पावत्या फाडणे, नवीन जबाबदारी

देवनारच्या कत्तलखान्याची त्यांच्यावरच पडली परंतु सगळा पैसा गोळा करून हिशेब चोख ठेवण्याचे काम त्यांनी इमाने इतबारे केले.

त्यांनी सभा, मोर्चे, आंदोलनात महत्त्वपूर्ण योगदान दिले. कामगारसंघाच्या परेल पोयबावडीच्या व म्युनिसिपल मजदूर संघाच्या कार्यालयात बाबासाहेबांची सेवा करण्याची संधी मिळाली. तसेच आंबेडकर भवनातील कार्यालय निवृत्तीनंतर त्यांनी पूर्ण वेळ सांभाळले.

बी.सी.कांबळेचे ते चाहते असले तरी बाळासाहेब आंबेडकरांनाच ते समाजाचे नेते व वारस मानीत असत आणि तसा ते स्पष्टपणे उल्लेखही करीत असत. बौद्ध धम्मावर व बाबासाहेबांच्या चळवळीवर त्यांचे विचार उद्बोधक असत त्यांना वाचनाचा व्यासंग होता.

मा. रा. सु. गवई साहेबांच्यावतीने तत्कालिन उपायुक्त श्रीमती कुंदा कदम, महापौर, आयुक्त यांच्याकडे अर्ज विनंत्या करून जुने पशुवध गृह येथील जुन्या चाळीत राहाणाऱ्या कर्मचाऱ्यांना त्यांच्या खोल्या स्वमालकीच्या करून देण्यामध्ये त्यांचा सिंहाचा वाटा आहे. त्या चाळीला आता १३० वर्षे झाली आहेत.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर रोड खार पश्चिम येथे श्रावस्ती सांस्कृतिक मंच या संघटनेच्या वतीने डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा अर्धाकृती पुतळा उभारण्यात आला आहे. संस्थेच्या स्थापनेपासून ते जागा मिळविण्यात नागपूर येथून रवी मुर्ती यांच्याकडून पुतळा आणून तो बसविण्यात उद्घाटन सोहळ्यात जिद्दीने तरूणांना लाजविणारे अविस्मरणीय काम त्यांनी केले आहे. वार्धाक्यामुळे त्यांचे अल्प आजाराने निधन झाले.

# दिवंगत विठ्ठल भागूराम रूके (कांगवेकर)

दिवंगत विठ्ठल भागूराम रूके (कांगवेकर) यांचा जन्म मुळगाव कांगवई पोस्ट कांगवई तालूका दापोली जिल्हा रत्नागिरी येथे झाला. नवी पाली विभागात ते रहावयास आले आणि पश्चिम रेल्वेमध्ये महालक्ष्मी येथे मुकादम या पदापर्यंत त्यांनी आपली प्रगती केली.

धोतर, पांढरा शर्ट, काळी टोपी असा त्यांचा पेहराव असे. शरीरयष्टी किरकोळ, स्वभाव, गंभीर असे त्यांचे थोडक्यात वर्णन करता येईल. त्यांना समाजकार्याची फार आवड होती. नवी पालीवर होणाऱ्या सर्व प्रकारच्या कार्यामध्ये ते सहभागी होत असत.

त्यांना तालमीची फार आवड होती. आखाड्यांतील सर्व प्रकारचे मर्दानी खेळ खेळण्यात त्यांचा हातखडा होता त्यांना लाठी, काठी बनाठी या विद्यांचे सखोल ज्ञान होते विशेष करून भाला चालविण्यामध्ये त्यांच्या इतका तरबेज दुसरा कुणीच नव्हता. समाजावर होणाऱ्या अत्याचार अन्यायाविरूद्ध सातत्याने त्यांनी प्रतिकार केला आहे आणि इतरांनाही प्रतिकार करण्यास प्रवृत्त करून त्यांना समाजा प्रति कार्य करण्यास भाग पाडले. डॉ. बाबासाहेब आंबेडकरां प्रति त्यांना अत्यंत आदर होता. त्यामुळे परिसरातील तालमीमध्ये जे लोक नावाजलेले होते त्यामध्ये सदाशिवदादा तुळसकर कृष्णादादा खरवतकर, भिक्यादादा घराडकर बावन डाववाला भाग्या आदि मंडळीशी त्यांचे सलोख्याचे संबंध होते.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा जयंती उत्सव मोठ्या प्रमाणात होत असे आणि तो एक आठवडा चालत असे. त्यामध्ये जलसा, नाटके, कव्वाली आदि प्रकार असत. हा जयंती उत्सव (सप्ताह) यशस्वी करण्यामध्ये विठ्ठल भागुराम रूके यांचा सिंहांचा वाटा असे ते सेवानिवृत्त झाले आणि वृद्धपकाळामुळे त्यांचे दिनांक ९ जानेवारी १९७३ रोजी वयाच्या ८५ व्या वर्षी दु:खद निधन झाले.

## दिवंगत महादेवराया जाधव (चोर्दीदेकर माजी गटप्रतिधी)

दिवंगत महादेव राया जाधव यांचा जन्म मु.गा. चोचिंदे ता. महाड जि. रायगड येथे झाला. घरची परिस्थिती गरीबीची असल्याने त्यांची चुलती यांनी महादेवचा सांभाळ केला. ते धोबी तलाव येथे राहत होते. सिद्धार्थ कॉलेजमध्ये प्रिन्सी पलच्या केबीनमध्ये शिपाई या पदावर काम करीत होते. प्रामाणिकपणा, कर्तव्यपरायणता, सचोटी या गुणांमुळे प्रिन्सिपल साहेबांचा त्यांच्यावर विश्वास बसला आणि त्यांनीच जवळच असलेल्या इनकम टॅक्स ऑफिसात त्यांना कामाला लावले. त्यामुळे त्यांची आर्थिक परिस्थिती सुधारली.

चुईम व्हिलेजमधील सकपाळ मसुरकर यांची कन्या गौरा हिच्याबरोबर त्यांचा विवाह झाला. त्यांना ३ पुत्र व १ कन्या अशी अपत्ये झाली. पंडित (शंकर) मसुरकर यांना अपत्य नसल्यामुळे दत्तक घेण्याची इच्छा प्रदर्शित केली. महादेव जाधव व त्यांच्या पत्नीने मोठ्या मनाने ती मान्य ही केली.

नवी पाली विभागात ते नावांजलेले लोक प्रिय कार्यकर्ता होते. लोकांच्या सुख दु:खामध्ये आणि अडीअडचणीमध्ये ते अग्रेसर असत. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या विचारांवर त्यांची अगाध श्रद्धा व निष्ठा होती. नवी पाली विभागात होणारा जयंती महोत्सव किंवा कोकणस्थ गृहनिर्माण संस्था, नवामळा, नवी शेरली आदि विभागांतमार्फत होणारा सप्ताह यात देखील त्यांचा सिंहाचा वाटा असे. किरकोळ देहयष्टी जरी असली तरी त्यांच्या आवाजात भारदस्तपणा होता व एक प्रकारची विरोधकांवर जरब असे. त्यामुळे त्यांना कडक्या जाधव या टोपण नावाने प्रसिद्धीला भलेली होती.

कोकणस्थ कॉलनीचे ते माजी कार्यकारी सदस्य होते. तसेच बौ. पं. समिती शाखा क्र.१९१ चे माजी अध्यक्ष होते. चोचिंदेकर ग्रामस्थांचे जेष्ठ कार्यकर्ते होते आणि गट क्र.३२ चे गट प्रतिनिधी होते. त्यांच्या कालखंडात बाबासाहेब आंबेडकरांचा महोत्सव सप्ताहाच्या रूपाने होत होता. समाजातील थोर समाज सेवक म्हणून त्यांची विशिष्ट ओळख होती. वयाच्या ५६ व्या वर्षी २६/११/१९८० रोजी अल्प आजाराने दु:खद निधन झाले. त्यांच्या रूपाने एक सच्चा भिमसैनिक हरपला आहे.

# पांडूरंग विठ्ठल साळवी...

महाउपासिका मीराताई आंबेडकरांचे बंधू पांडूरंग विठ्ठल साळवी यांच्याबद्दल फारच थोड्या लोकांना माहिती आहे. अत्यंत शांत, प्रेमळ, अबोल आणि हळव्या मनाच्या स्वभावाचा माणूस वडील सेवानिवृत्त झाले. ते गुजरातमधील ''मेहसाणा'' येथून मुंबईत आले. आणि भय्यासाहेब व मीराताईनी त्याना आपल्या कुटुंबांत सामावून घेतले. मीरा ताईच्या वडिलांचे नाव विठ्ठल महादेव साळवी. त्यांना सर्वजण ''बा'' असे म्हणत. ते महाड तालुक्यांतील ''वामने'' या गावचे आईचे नाव कमला विठ्ठल साळवी. यांना ''अम्मा'' असे संबोधले जाई. या महाड मधील ''रावढळ'' या गावच्या रावढळ हे गाव गोपाळ बाबा वळंगकरांचे. अस्पृश्यता निवारणाचे प्रथम जनक ''विटाळ विध्वंसन'' नामक ग्रंथाचे कर्ते, महात्मा ज्योतिबा फुलेचे सहकारी; महार समाजाला सैन्यात प्रवेशबंदी झाली म्हणून इस्ट इंडिया कंपनीला प्रखर निषेधाचे वैचारिक पत्र लिहीणारे गोपाळ बाबा वळंगकर! विठ्ठलराव आणि कमलाबाईना मीराताई, सिधूताई, निर्मला (निम्मी); पांडुरंग (पांडु) उर्मिला (उमा) आणि विमल अशी अपत्ये झाली. मीराताईना गोपाळबाबांच्या जन्म भूमिचा वारसा मातेकडून मिळाला. आणि सुर्यपूत्र भय्यासाहेबांकडून सर्वस्व! यामुळेच ज्योतिची ज्वाला झाली आणि भय्यासाहेबांच्या नंतर अज्ञानाचा अंध:कार नष्ट करीत भारतीय बौद्धमहासभेच्या ''महाउपासिका'' या रूपाने जगभर मान्यता पावली.

पांडू मामांचा जन्म १९४९ साली झाला. भय्यासाहेबांच्या वात्सल्याची छाया आणि मीराताईच्या ममतेची माया पांडुमामांना मिळाली. भय्यासाहेबांचा पांडुमामांवर खूप जीव आणि विश्वास होता. बाळासाहेब, भिमराव, रमा (बेबी) आनंदराज या साऱ्यांना पांडुमामांनी खेळविले, शाळेत, शिकवणीला येता जाता सांभाळले. आपल्या भगिनीला सर्व कामांत सहकार्य केले. कसलीही कधी तक्रार नाही, कुरबुर नाही. खार पश्चिम येथील १९ व्या रस्त्यावरील बैठ्या कौलारु स्वतंत्र असणाऱ्या घराला बाग बगीचा करून खुलविले, फुलविले, हळुवारपणाने जशी फुले उमलत होती नशी पांडुमामांच्या सान्निध्यांत आपल्या भगिनीच्या मुलांची जीवने फुलत होती. बाजारहाट करण्याच्या कामांतही पांडुमामा मदत करीत असत.

भय्यासाहेबांबद्दल पांडुमामांना नितांत आदर वाटत असे. त्यांचा प्रत्येक शब्द ते आज्ञाधारकपणे पाळीत असत. त्यामुळे भय्यासाहेबांचे पांडुमामांवर फार प्रेम होते. माझ्या विवेकबुद्धीला एक साधर्म्य दिसून आले. दिवंगत आईसाहेब उर्फ मातोश्री रमाईना एकच बंधू होते. शंकरराव धोत्रे असे त्यांचे नाव होते. बाबासाहेब परदेशी गेले की, राजगृहावर रमाईना त्यांची साथ असे. भय्यासाहेब लहानपणी आजारांतून बरे व्हावे म्हणून त्यानी खूप मेहनत केली होती. त्यांचे सुपुत्र दिनकर धोत्रे याना भय्यासाहेब ''दिनू'' या नावाने संबोधित असत. त्यांच्यावर भय्यासाहेबांचे खूप प्रेम होते. ''पंचशील'' नावाच्या इमारतींत ते रहात असत. मुकूंदराव ''अशोक भवन'' मध्ये रहात असत. ही सारे घरे खार पश्चिम मधील १९ वा रस्ता आणि १३ वा रस्ता येथे आहेत. बाबासाहेबांच्या पदस्पर्शाने तसेच या परिवाराच्या

वहिवाटीने ही भूमि पावन झालेली आहे.

दिनकरराव हे चालक होते. भय्यासाहेबांनी त्यांना बेबी मॉरीस नावांची छोटी गाडी दिली होती. दिनकररावानी तिचे रूपांतर छोट्या टॅक्सीत केले होते. भय्यासाहेब दिनकररावावर जसे प्रेम करीत होते तसेच पांडुमामांवर प्रेमाचा वर्षाव करीत होते. क्रांती सूर्याचे ते पुत्र होते. तोच वारसा मीराताईनी जोपासला आहे. भय्यासोहबांकडे डॉज नावाची गाडी होती. कुंपणामध्ये ती ठेवीत असत. पांडुमामा ती धुवायचे, पुसायचे, मागे पुढे करायचे हळू हळू ते गाडी शिकले. त्यांना कुणीही शिकविले नाही. कुशाग्र बुद्धी मत्तेचा त्यांच्याहि जीवनावर परिणाम झाला आणि पांडुमामा एक निष्णात मोटार चालक बनले! त्याचे हे जिवंत उदाहरण आहे!

बाळासाहेबांच्या राजकीय कारकीर्दीला सुरूवात झाली. महाराष्ट्रभर त्यांचे दौरे सुरू झाले आणि महाराष्ट्रांतील रस्ते पांडुमामांच्या ओळखीचे झाले. पांडुमामांची जबाबदारी वाढली. बाळासाहेबांचा इच्छित स्थळी सुरक्षितपणे प्रवास पांडुमामांमुळे निर्धास्त होऊ लागला. त्या आधी काही काळ पांडुमामांनी कस्टममध्ये नोकरी केली होती. ती अत्यंत जोखमीची होती आणि कधी कधी जिवावर बेतणाऱ्या प्रसंगाची होती. त्यामुळे ताईनी ती नोकरी पांडुमामांना सोडायला लावली.

पांडुमामा तारूण्यांत असतानांच ताईनी त्यांच्या भवितव्याचा विचार केला. आणि विदर्भातील नांदुरा येथील मुलगी विवाहाकरिता पांडुमामाना ठरविली. पांडुमामांचा विवाह समारंभही मोठी भगिनी आणि मातेच्या मायेने यशस्वी केला. पांडुमामांच्या वैवाहिक जीवनाला सुरूवात झाली. ''सुनिता'' असे त्यांच्या पत्नीचे नाव आहे. त्यांचा संसार बहरला. संसारवेलीवर दोन फुले उमलली दोन सुकुमार अजय आणि अंकित नावाचे सुकुमार जन्मास आले आहेत. दुर्दैवाने नियतीचा क्रूरपणा येथे दिसला. १६ सप्टेंबर २००८ साली हृदय विकाराच्या तीव्र आघाताने पांडुमामांची प्राणज्योत अनंतात विलीन झाली.

लिखाण पूर्ण झाले होते. परंतु मी पाहिलेल्या पांडुमामांच्या माहितीचा उल्लेख कुठेही नसतो. याची रूखरूख सातत्याने होत होती. आपल्या पुस्तकांत पांडुमामांची माहिती असावी असे सातत्याने वाटायचे फक्त आनंदराज आंबेडकर साहेबांचा संपर्क होत होता. अन्य कुटूंबियांचा नव्हता! पण परवानगी कशी घ्यावी ? आणखी एक महत्वाचे कारण होते. माझ्या पत्नीचे गाव ही रावढळ आहे. माझे सासू सासरे मुंबईत नेस्बीट रोड येथे रहात असत. तेथे आपली जुनी वसाहत होती. त्याला ''महार खड्डा'' म्हणत. आता तेथे सेल्सटॅक्स ऑफिस आहे. माझ्या मेहुण्या सखुबाई जयराम मोरे (आमशेतकर) सरस्वती बंडू साळवे (मुटविलकर) शेवंती आबाजी साळवे (मांडलेकर) या आपली बहीण सुनिता सुरेश धोत्रे यांच्याकडे येत असत. तेथे सर्वांची भेट होत असे. व गावच्या गप्पा आमच्या घरी रंगत त्यामुळे एक जिव्हाळा निर्माण झाला होता. धीर करून आनंदराज आंबेडकर साहेबांकडे मी पांडुमामाच्या विषयी लिहीण्याची परवानगी मागितली ती त्यानी मोठ्या मनाने दिली. माझे मित्र प्रकाश कदम यांनी ताईना ही सांगून त्यांची संमती मिळविली. पांडुमामाच्या स्मृतीला ही श्रद्धांजली अर्पण करण्याची संधी मिळाली. धन्यता वाटली.

# वांद्रे विभागातील नाट्य, कला, क्रिडा, साहित्य, आदि क्षेत्रातील नामवंत व्यक्ति

## १) स्लॉटर हाऊस वांद्रे

१) धोंडू तुकाराम मोहिते (एकतारी भजन मंडळ)

२) माता रमाई आंबेडकर व्यायाम शाळा (मानकर), गंगाराम पांडुरंग (वस्ताद) मानकर

३) सोनू धोंडू मोहिते

४) धर्मा धोंडू मोहिते

५) सखाराम गुणाजी कालुस्ते

६) गंगाराम काळू गायकवाड माटवणकर

७) रामा यशवंत कांबळे

८) जयराम कासारेंची बहीण

९) डी.के. तांबे

१०) गंगुबाई आंबयेकर (लाठी काठी)

११) नामुबाई सखाराम गोडावले (लाठी काठी)

१२) हरी गोपाळ दाभोळकर

१३) दगडू शिवराम सावंत

१४) संभू राघो दाभोवकर

१५) म्हाळुंगकर बुवा

१६) आत्माराम भांबू

१७) तुकाराम यशवंत कांबळे (वालकर)

## २) म्युनिसीपल कामगार संघाचे प्रतिनिधी

१) भोयवाडा:- भिक्या साळवी, सुदाम जाधव (हूतूतू)

## ३) वारूडा

१) पिपाण्या रामा अस्पृश्यांचा एकमेव प्रतिनिधी वांद्रे म्युनिसीपालिटीत वर्षाला

एक घोंगडी व १ बाटली दारू काम फक्त हात वर करणे.

## ४) चिंबई (कांतवाडी)

१) भिक्यादादा कापसे (सनईवादक)

२) पांडू महार: ५२ पत्त्यांचा किंग म्हणून प्रसिद्ध कोणत्याही क्लबमध्ये त्यांना खेळण्यास घेत नसत. लोक घाबरत असत कारण दुकानातून नवीन आणलेले पत्ते जमिनीवर लावले अथवा टेबलवर लावले तरी ज्या पत्त्याला हात लावेल तो कोणता आहे हे नेमके ओळखत असे.

## ५) राजन शेरली

१) बावन डाव वाला भाग्या (आखाडा) लाठी काठीत प्रसिद्ध

२) मुलगी सोना

३) बी.जी. घाग पंचायतीचे कार्यकर्ते व वामनदादा कर्डक यांचे गायक

४) तुळशीराम रत्नू पवार (करबवणेकर) लाठी, काठी, कुस्ती

५) शांताराम सुडकाजी कासारे (लाटवणकर) नकलाकार के.शांताराम

६) मांडलेकर जुने कार्यकर्ते

७) किसन जाधव (गाडीवाले) समता सैनिक दलाचे गांगुर्डे डिव्हिजनचे प्रमुख

८) भिकू कृष्णा सुर्वे (लाठी काठी)

९) लक्ष्मण गणपत साळवी (पंदीरकर) क्रिकेट, बॅड मिंटन

## ६) चुईम व्हिलेज

१) कृष्णदादा खरवतकर (लाठी काठी)

२) भगवान धोत्रे (शिरसोनकर) लाठी काठी

३) आमोणकर बुवा (ज्योतिषाचार्य) गोल्फ माधव शिरावले, क्रिकेट

५) शांताराम कवडे; शंकर कवडे (बॅडमिंटन)

६) माधव कवडे क्रिकेट

७) दत्ताराम कांबळे (नट)

८) मोतीराम सखाराम जाधव (खरविलकर) नट

## ७) नवी शेरली

१) नारायण भिकू असगोलकर (लाठी काठी)

२) राजू बुवा व सोनू बुवा सकपाळ (मुमुर्शीकर)एकतारी भजन मंडळ सहकारी

३) लक्ष्मण धोंडू मोरे

४) बाबाजी धर्मा जाधव (घराडकर)
५) बाळा सुडकाजी धोत्रे
६) गोपाळ देवजी पवार (चिंचविलकर) कुस्ती
७) भिकू शिवराम सोवळे (ज्योतिषाचार्य)
८) सिताराम गणू पवार
९) लक्ष्मण गणू पवार
१०) हरी गणू पवार (कासेकर) वैद्य व सुतार
११) शिवराम भागूराम धोत्रे आंबेकर सुतार
१२) शंकर मोहिते (काणेकर) व्यायाम शिक्षक, हॉकी पटू
१३) रामीबाई शंकर मोहिते लाठी काठी पोहणे, सायकल, सामाजिक कार्यकर्तो
१४) कृष्णराव सखाराम पवार (कोंडवितेकर) हार्मोनियम वादक व गायक
१५) नारायण सखाराम पवार (काताळकर)
१६) गणू महादेव तांबे (साखलोलकर) यांनी आदर्श हुतूतू संघाची स्थापना केली व दोन पंचायतीचा सलोखा केला.
१७) लक्ष्मण तुळशीराम जाधव (निळीकर) हुतुतु
१८) टी.जी. पवार (हूतुतु व्यायाम)
१९) सिताराम गुणाजी पवार (हुतूतू व्यायाम)
२०) सखाराम नागे (हुतूतू)
२१) काशिनाथ गोविंद जाधव (दाभोळकर) हुतूतू
२२) हरिशचंद्र गोविंद जाधव (दाभोळकर) क्रिकेट
२३) संभू काळू कदम (कुशविडकर) क्रिकेट
२४) आनुबाई पांडुरंग जाधव
२५) धोंडीराम सदाशिव पवार (वरविलकर) भजनी बुवा
२६) गोविंद जाधव (दाभोळकर) एयर इंडियाचे डिझाईन बनविणारे (कारागिर)

## ८) नवी पाली

१) राया बाळू वरेकर जुने सामाजिक कार्यकर्ते
२) काशिनाथ वरेकर नृत्य
३) मनोहर वरेकर नृत्य विशारद
४) सुरेश वरेकर नृत्य, नट
५) विठ्ठल भिकू तांबे (लंगड बाबा) कवि व गायक
६) कृष्णा भिकू तांबे कवि व गायक
७) पांडुरंग गमरे (कुडीककर) हार्मोनियम

८) यशवंत सखाराम गायकवाड (म्हशीलकर) मडकेवादक
९) केसरीनाथ मोरे (पालघर) गायक
१०) विठ्ठल भिकू रूके (कांग वेवर) दांडपट्टा लाठी, काठी (भाला)
११) राजन पुरारकर (कवि)
१२) बाळ रूके (भोंबडकर) गायक
१३) बाळाराम कदम (आबलोलकर) तबलजी, स्त्री पात्र, नट
१४) दिनकर खैरे (सतार) चित्रकार जी.डी.आर्ट वाद्यवृंद
१५) मधुकर शिर्के (कलबटकर) उर्फ चिलबुबाबू सिने संगीत प्रवीण
१६) गोविंद लक्ष्मण तांबे (नाट्य दिग्दर्शक)
१७) रामचंद्र लोखंडे (खोडदेकर) नट विदूषक
१८) शंकर ताडीलकर नट-स्त्री पात्र खालूचा बाजा
१९) जोगविलकर मनोहर व बंधू खालूचा बाजा
२०) नंदा कदम (हुतूतू) खेळाडू
१) गंगाराम विठ्ठल साळवी (जुने व्यासायिक)
२) पांडुरंग कदम (आबलोलकर) ५(नालबंद)
३) भिकूराम मोरे (वाघावकर व्यावसायिक)

## ९) नवा मळा

१) जाणू बुवा रूके (उंबरशेतकर) ज्योतिषी
२) गोवर्धन मोरे (वागावकर) व्हायोलिन, क्लोरनेट, फ्लूट
३) धर्मराज मोरे (वागावकर) नृत्य शिक्षक
४) गंगाराम साळवी (गोरेगावकर) वखार, रेशन दुकान, वाईन स्टोअर
५) तुकाराम देहणकर नट
६) कृष्णा देहणकर (हार्मोनियम) शास्त्रीय संगीत विशारद
७) भिकू कानू मोहिते (आजगीनकर) कर्णधार आदर्श हुतूतू संघ (सुर्य नमस्कार व चक्री नमस्कारासाठी प्रसिद्ध)
८) पा.ना.मर्चंडे व्यायाम पटू.
९) सखाराम मोरे (इनलेकर) नट, व्यायाम शिक्षक

## १०) कोकणस्थ कॉलनी

१) सदाशिव रामजी जाधव (तुळसकर) लाठी-काठी शिक्षक
२) दुर्योधन कवडे (लाठी काठी व कसरत)
३) अर्जुन गोविंद जाधव (तुळसकर) नट

४) नामदेव कदम (आबलोलकर) लाठी काठी
५) रामचंद्र धोत्रे (लाठी काठी)
६) मोरेश्वर तांबे (लेखक समाज कार्यकर्ते) (प्रेम प्रताप अर्थात महाराची सून
७) नामदेव जाधव (तुळसकर) लाठी-काठी
८) बाळकृष्ण जाधव (घाटिवले)
९) जगदीश जाधव (घाटिवले) बंधूचा बँड (बासरी वादक)
१०) सदिक मोहिते, एम.एस. सावंत (व्यायामपटू)
११) आडेकर बंधू (व्यायाम पटू व व्यायाम शिक्षक)
१२) दिनकर कांबळे (प्रसिद्धसिने संगीत तज्ञ)
१३) बायजाबाई बढेकर (लाठी काठी, पोहणे, सायकल)
१४) सखाराम भिकू धोत्रे (विरसईकर) लाठी काठी
१५) नारायण रामजी (तुळसकर) समाज कार्यकर्ते

## ११) नांगावाडी १५ वा रस्ता (भगतवाडी)

१) गंगाराम धाकूजी कदम
२) धाकूजी गंगाराम कदम
३) बाबूराव माखजनकर लाठी काठी प्रशिक्षित महाडच्या चवदार तळ्याच्या सत्याग्रहात सहभाग
४) सिताराम जयराम जाधव (भिमानंद) लोवेलकर
५) गायक बाबळ पांडू रंग जाधव
६) आत्माराम पांडूरंग जाधव
७) तुकाराम जयराम जाधव (हर्मोनियम)
८) पांडुरंग गणू मोहिते (पाचरटकर)
९) बाळू भिकाजी कदम (शेणवडेकर) बुलबुल तरंग
१०) बाळू धोंडू कदम (भालचंद्र) कवी गायक (कुटगिरीकर)
११) रमेश बाळू पवार (नारडावेकर)
१२) ढोलक सयाजी गायकवाड
१३) तबला रामचंद्र सुर्वे
१४) आणि यशवंत बुधाजी कदम (अखलीकर)
१५) जयराम मोहिते (कोंडकर)
१६) वसंत बुधाजी जाधव (सरंदकर)
१७) विजय राघो जाधव (निवेकर) विष्णू पवार

वादनात पटाईत होते. कव्वाली गाणे शेरोशायरी करणे हा त्यांचा व्यासंग होता. वामनदादा

कर्डक व विठ्ठल उमप यांची ते गाणी गात जागरणामुळे त्यांचे मानसिक संतुलन बिघडले व त्यांना वेडाचे झटके येऊ लागले त्यातच त्यांचे दुर्देवी निधन झाले.

**रमेश मोरे** : ढोलकी, तबला, पेटी व बेंजो (बुल बुल) वाजविण्यात पटाईत गीत स्वत: व गायकीची आवड उर्दू भाषेत गीत रचना व शेर धूळ खात पडलेत. या शायराचा उजेडात येण्यापूर्वीच दुर्देवी अंत झाला.

**सोनू सजन संदीरकर** : त्या काळातील एक सावकार व चळवळीतील प्रभावी वक्ता.

**महादेव गोठेकर** : (उर्फ कुकुची नार) स्पष्ट वक्ता, स्वच्छ पांढरे, शुभ्र वस्त्रांची आवड बाबासाहेब आंबेडकरांना वांद्रे विभागात आणायचे झाल्यास तेच आणीत असत. समाजातील लोकांना न्यायदानाच्या कामात वकिल) पुरविण्याची जबाबदारी स्विकारून पार पाडीत असत. शेड्युल्ड फेडरेशन, महार, ज्ञाती पंचायत समिती समता सैनिक दल आदि संस्थाच्या प्रचार प्रसार या कामासाठी त्यांनी परिश्रम केले.

**टीप** :

सदर माहिती बौ.प.स.शा.क्र.१४२ चे अध्यक्ष मा. भिकू मोरे (इनलेकर) यांच्याकडून प्राप्त झाली आहे.

## १२) वडाची पालि

१) घराडकर रामचंद्र : लाठी, काठी प्रवीण, सामाजिक कार्यकर्ते, महार ज्ञाती पंचायत समिती, शेड्युल्ड कास्ट फेडरेशन; स्वतंत्र मजूर पक्ष, समता सैनिक दलात प्रभावी काम बौद्ध स्मशान भूमी ट्रस्ट या संस्थेत महत्त्वाचे योगदान

२) राघोदादा : लाठी काठीत प्रवीण समाजावर होणाऱ्या हिंदू, मुस्लिम, ख्रिस्ती लोकांकडून अन्यायाचा प्रतिकार करण्यासाठी जनजागृती

३) बुध्या दादा : हे राघो दादांचे बंधू त्यांना साथ देऊन वरील प्रमाणेच कार्य त्यांनी ही केले. समाज बांधवांचे संरक्षण केले.

४) बापू महादेव बागले : शास्त्रीय संगीतात प्रवीण, हार्मोनियम व बुलबुल तरग यात हातखंडा, प्रेम प्रताप या मोरेश्वर तांबे लिखित नाटकात नट म्हणून

## १३) पालि पठार

सोनू पवार (जाविलकर) महार ज्ञाती पंचायतीपासून प्रभावी वक्ते व कार्यकर्ते दुरदर्शीपणा, बौद्ध स्मशानभूमी ट्रस्टच्या विकास कामात महत्त्वपूर्ण भुमिका. आंबेडकरी चळवळ गतिमान करण्यात योगदान. सदानंद बाळाराम जाधव (आलसूरकर) नट मोरेश्वर तांबे लिखीत प्रेम प्रताप नाटकाचे नायक.

# बारा पाखाड्यातील पुरूष कार्यकर्ते

**१) पंचायतीचे कार्यकर्ते विभागवार**

**स्लॉटर हाऊस**

दगडू शिवराम सावंत

संभू राघो दाभोळकर

जयराम रामचंद्र कासारे

**२) भोयवाडा**

रामचंद्र बाबाजी जाधव

विठ्ठल जिवाजी पवार

**३) वारोडा**

एस.एस.कापसे

एस.व्ही.तांबे

**४) कांतवाडी**

बी.आर.कोतापकर

बी.एस.नखणकर

**५) जुनी शेरली**

भागुराम गोपाळ घाग

सुडकाजी भागुराम कासारे

**६) रेल्वे चाळ वांद्रे**

पंढरीनाथ रायबा निरभवणे

सुका पांडू गांगुर्डे

**७) खार रेल्वे स्टेशन**

नागू गंगाराम बर्वे

चिमा दादा बजकर

मोगल भागाजी अहिरे

रामा कचरू गवारी

**८) खेखाडी**

काशिराम बाळू वनीस

**९) खार मांडाळी**

ए.व्ही.जाधव

बी.एन. गावसे

**१०) जुनी खार**

बी.एन. गमरे

दगडू चंदु कापसे

लक्ष्मण रामा मोरे

**११) चिंचवाडी**

गणपत सखाराम मोहिते

लक्ष्मण दशरथ मोरे

**१२) भंगीवाडा**

शिवराम हिरू मोहिते

गोपाळ शिवराम पालशेतकर

पांडुरंग गोपाळ रूके

कृष्णा लक्ष्मण खैरे

**१३) बाळकृष्णाची वाडी**

गोविंद गणू सावंत

महादू बाळू मांडरे

**१४) नांगावाडी**

दगडू धोंडू कांबळे

हरी घारू कदम

**१५) भिकाजीची वाडी**

जयराम रामा पवार

गंगाराम रामा कांबळे

**१६) वडाची पाली**

यशवंत रत्ना कासारे

मारूती तुकाराम घाटगे (भोंबडकर)

**१७) कोकणस्थ कॉलनी**

सखाराम भिकू धोत्रे

नारायण आर. जाधव

**१८) नवा मळा**

शिवराम धोंडू जितेकर

सुडकाजी कृष्णा हाटे

**१९) नवी पाली**

बाळू राया वरेकर

लक्ष्मण गोविंद आंबवळकर

सयाजी महादेव यादव

भिकाजी रघुनाथ बागले

**२०) नवी शेरली**

गोपाळ देवजी पवार (चिंचावले)

एन.एम.भोसले

लक्ष्मण धोंडू मोरे

बाबाजी धर्मा जाधव

बाळाराम सुडकाजी धोत्रे

**२१) पठार**

सजन विठ्ठल मोहिते

भागुराम अर्जुन जाधव

चांगू सखाराम शिरविलकर

विठ्ठल बाळू शिरावले

दांडा खार-शंकर गोविंद जाधव

**२४) गोळीबार**

नारायण भिवा साळुंके

भुजाबा लिंगा वाघमारे

**२५) भिमवाडा**

गंगाराम जाणू जाधव

बी.एस.कांबळे

**२६) वाकोला**

बाबू रामा जाधव

भागोजी रामा गमरे

**२७) नळाचा पाडा**

भिमराव राघो मर्चंडे

कमलाकांत बी. भेकरे

**२८) रायडोंगरी**

नारायण बाळाजी शिंदे

धोंडू भागू कदम

**२९) कोळीवाडा**

एल.के.मोरे

एस.सी.तांबे

**३०) मानीचा पाडा**

दगडू अनाजी गमरे

जानू लक्ष्मण साळवे

# चळवळीतील काही अप्रकाशित कार्यकर्ते

## चिंचवाडी (गाढव बाव)

१) रामा मोरे (इनलकर) यांची स्वत:ची चाळ होती आणि सेंट ड्युरोलो हायस्कूलजवळ त्यांची जागा होती. त्यांच्याकडे बऱ्याच पाळीव म्हशी होत्या. त्यांच्यासाठी त्यांनी गोठा बांधला होता. गोठ्याच्याच बाजूला शंकरदादा रोविलकरांचा आखाडा होता.

२) गोपाळ कासारे (कोंगीलकर) यांची स्वत:ची चाळ होती. ते महार जाती पंचायतीचे कार्यकर्ते होते स्वतंत्र मजूर पक्ष आणि शेड्युल्ड कास्ट फेडरेशन या संस्थाबद्दल त्यांना आदर होता त्यांनी त्यांचा प्रचार केला ते महापालिकेचे कर्मचारी होते सर्व नातवाईकांना आपल्याजवळ राहाण्यास जागा दिली.

३) चिंतामणी तांबे (चांडोलकर) यांची देखील चाळ होती. दिवंगत रत्नू गमरे हे त्या काळातील दूर दृष्टिचे हुशार ज्ञानी चळवळीत सक्रीय असणारे गृहस्थ होते. दशरथ घाडगे हे देखील सामाजिक कार्यकर्ते होते. ते चिंतामणी तांबे यांच्याजवळ रहात होते. अशा कार्यकर्त्यांना त्यांनी घडविले.

४) चांगदेव मोहिते (पेडामकर) हे गृहस्थ बाबासाहेबांच्या चळवळीचे आधार स्तंभ होते. सव्वा सहा फुट ते साडे सहा फुट त्यांची उंची होती. महापालिकेत ते कर्मचारी होते त्यांना लाठी,काठी, बनाठी या विद्येचे ज्ञान होते. त्यांची स्वत:ची बैलगाडी होती. आजुबाजूच्या परिसरात त्यांचा दरारा असे.

पालशेतकर, तेंडुलकर, रावढळकर (जाधव) यशवंत जाधव हे त्या काळातील नावाजलेले कार्यकर्ते होते. त्यांना शिक्षण नव्हते परंतू सामाजिक बांधीलकी होती. बाबासाहेबांच्या कार्यावर त्यांची अगाध श्रद्धा होती. बाबासाहेबांबद्दल त्यांना अती आदर होता. म्हणूनच महाडच्या चवदार तळ्याच्या सत्याग्रहात भाग घेण्यासाठी हे सारे भीम सैनिक गेले होते.

**टिप**: सदर माहिती बौ.प.स.शा.क्र.१४२ चे अध्यक्ष मा. भिकू मोरे (इनलकर) यांच्याकडून प्राप्त झाली.

५) दिवंगत महादेवराव यादव शंकरदादा रोविलकरांच्या आखाड्यात महादेवराव यादव यांनी तत्कालीन दांडपट्टा, छडी पट्टा, लाठी, काठी यांचे शिक्षण घेतले होते. लग्नाच्या वरातीत, जयंती उत्सवात किंवा तत्सम कार्यक्रमांमध्ये ते आपल्या कलेची चुणूक दाखवीत असत. उत्कृष्ट वक्तृत्व आणि जबरदस्त सहनशक्तीच्या जोरावर त्यांनी

अनेकांना मार्गदर्शन केले आहे. बाबासाहेब आंबेडकरांच्या सर्व प्रकारच्या चळवळीमध्ये त्यांनी योगदान दिले आहे. तात्या तांडेल या नाटकात त्यांनी हौशी कलावंत म्हणून नायकाची भुमिका केली या नाटकाचे वीस ते पंचवीस प्रयोग झाले. रागीट चेहरा, तापट स्वभाव पण अंतर्यामी कोमल. शाखेमध्ये कार्यकर्ते, मार्गदर्शक म्हणून त्यांनी महत्त्वपूर्ण योगदान दिले. वार्धाक्यामुळे मृत्यू झाला.

६) दिवंगत किसन मोरे हे पहाडी आवाजाचे गायक होते. हुतुतु या मैदानी खेळात पकड मास्तर म्हणून त्यांची खास ओळख होती. कैची मारल्यास खेळाडू सुटू शकत नव्हता. तात्या तांडेल या नाटकात ते खानाची भुमिका करीत असत. तबला, वादन, पेटी वादन या कलेत पारंगत होते. बाबासाहेबांच्या चळवळीत प्रबोधनाचे कार्य त्यानी कलेच्या माध्यमातून उत्तमप्रकारे केले आहे. वेळ पडल्यास वैऱ्यांशी दोन हात करण्याची तयारी त्यांची असे वृद्धापकाळामुळे त्यांचे निधन झाले.

७) दिवंगत चाया नारायण कांबळे- उर्फ सी.एन. कांबळे मुळगाव अलिबागमधील रामराज. पश्चिम रेल्वेच्या ग्रँट रोड येथील पार्सल ऑफिसात नोकरी. निवृत्तीपर्यंत सामाजिक कार्यात मग्न असत. बौ.पं.स. शाखा क्रमांक २३९ चे सतत २५ वर्षे अध्यक्ष होते. भदंत राहूल बोधीजीची १० दिवसांची शिबिरे वांद्रे विभागात आयोजित करण्यात त्यानी मोलाचे कार्य केले एका नाटकात हौशी कलावंत म्हणून काम केले आहे. डॉ.बाबासाहेब आंबेडकरांच्या जयंती मधून प्रबोधन, प्रवचने आदि चांगले संस्कार रूजविले. शांत स्वभाव, हसरा चेहरा प्रचंड विचार करण्याची शक्ती त्यांच्या जवळ होती प्रत्येकाच्या सुख दु:खात ते सहभागी होत असत. अल्प आजाराने त्यांना अर्धांगवायुचा झटका आल्याने त्यांचे दुर्देवी निधन झाले.

८) बाजीराव शंकर डोळस: (ह्यात) कव्वाली क्षेत्रात विशेष कामगिरीने बाबासाहेबांचे भगवान बुद्धाचे विचारांचे प्रबोधन करण्याची आवड आहे. कव्वाली, गाणे, शेरो शायरी करणे हा त्यांचा व्यासंग वामनदादा कर्डक व विठ्ठल उमप यांना ते गुरूस्थानी मानतात. जगदीश शिंदे व रंजना शिंदे यांना गायनात सहकार्य करीत. राकट चेहरा चौडी छाती, ठेंगणी मूर्ती दणदणीत आवाजाने छाप पाडीत असत आता कल्याण येथे स्थलांतरीत झाले आहेत.

*(उपरोक्त माहिती मा. रमेश पवार शाखा क्र. २३९ यांच्याकडून प्राप्त झाली.)*

**संकलन - ज्ञानकिर्ती सुरेश बा. धोत्रे**

# आंबेडकरी चळवळीत स्त्रियांचे योगदान

## अस्पृश्य समाजांतील पहिली शिक्षिका

### दिवंगत मुक्ताबाई कांबळे.
### दिवंगत देवकाबाई कांबळे

कामाठीपुरा विभागांत जयराजभाई लेनमध्ये जुनी ढोरचाळ होती. त्या ढोर चाळींत रेवजीबुवा दगडूजी डोळस (बेल्हेकर) रहात होते. त्याच चाळीत रहाणारे गोविंद शिर्के (बामणोलकर) यांच्या पोटी पार्वती, देवका व मुक्ता या मुली व दोन मुलांचा जन्म झाला. गोविंदराव कुलाब्याला इंग्रज साहेबाच्या घरी बटलर म्हणून काम करीत होते. इंग्रजांकडे काम करीत असल्यामुळे गोविंदरावांना शिक्षणाचे महत्व पटले होते म्हणून त्यांनी सर्व मुलामुलींना शाळेंत टाकले होते. त्यानी मुलगा मुलगी असा भेद केला नाही. पार्वतीबाईंचे अभ्यासांत लक्ष नसायचे. त्यावेळी मुलामुलीची लग्ने लहान वयांत होत असत. त्यावेळी मुलामुलीना शाळेंत टाकले होते. त्यानी मुलगा मुलगी असा भेद केला नाही. त्याप्रमाणे पार्वतीबाईंचे लग्न दादासाहेब संभाजी तुकाराम गायकवाड यांच्याशी झाले गायकवाड हे कुलाब्याला रहात होते आणि प्रसिद्ध मोटार मॅकॅनिक होते. त्यानी अस्पृश्य समाजांतील खूप तरूणांना मोटर मॅकॅनिकचे शिक्षण देऊन नोकरीला लावले.

कामाठीपुऱ्याच्या नगरपालिकेच्या शाळेंत देवकाबाई-मुक्ताबाईंचे शिक्षण सुरू होते. गोविंद रावाना पुस्तके, कापडे यांचा खर्च परवडत नसतांना सर्व मुलांना ते शिक्षण देत होते. मुक्ताबाईंचे सातवीपर्यंत शिक्षण सुरू असतानांच संभाजी तुकाराम गायकवाड यांच्या तालमींत तयार झालेले कुलाबा जिल्ह्यांतील दगडूजी गंगाराम (कांबळे) (सातांबकर) यांच्याशी मुक्ताबाईंचे लग्न झाले. दगडूजी मोटार मॅकानिक होते. संभाजी तुकाराम गायकवाड यांच्याकडून त्यानी याचे रितसर शिक्षण घेतले होते. दगडूजींचे शिक्षण झाले नव्हते. मुक्ताबाईंचे लग्न झाले. त्याचवर्षी १९१९ ला देवकाबाईचे पाळण्यांत असतांनाच दामोदर (कांबळे) (सातांबकर) यांच्याशी लग्न ठरले. दामोदर कांबळेही मॅकॅनिक हाते व गायकवाडांच्या विश्वासांतले होते.

कामाठीपुऱ्यांत चौथीपर्यंत मुलींची शाळा होती तीनही मुलींची लग्ने उरकली तरीही गोविंदराव शिर्केनी मुलींचे शिक्षण चालूच ठेवले होते त्याकाळी लग्न झाल्यानंतर मुली मोठ्या झाल्या तरी माहेरीच रहात मुलींच्या शिक्षणाचे कौतुक होत नसे. मोठी आलेय मास्तरीण अशी चेष्टा व्हायची. शाळेची चौथी पर्यंतची कक्षा वाढवून सातवीपर्यंत केली. गेली त्याचा फायदा देवकीबाई व मुक्ताबाई याना झाला देवकीबाईंचे ब्राह्मण शिक्षक सखाराम पेडूरकर यानी देवकाबाईना प्रोत्साहन देऊन शिक्षिकेचे काम दिले त्यानी हे काम मनापासून केले. नगरपालिकेने मान्यता दिली. याचे

श्रेय देवकाबाईना आहे.

देवकाबाई शिक्षिका म्हणून नावारूपाला आल्या मुंबई महानगरपालिकेंत अस्पृश्य मुलीना ट्रेंड शिक्षिका करण्यासाठी आणि नोकरींत कायमस्वरूपी करण्यासाठी दादासाहेब संभाजी तुकाराम गायकवाड यानी सर नारायणराव चंदावरकर यांना सांकडे घातले. त्यानी प्रतिसाद दिला त्याचा फायदा सर्वच जातीतींल स्त्री शिक्षिकांना मिळू लागला. देवकीबाईची मुलगी शांताबाई वडवलकर पण मुंबई नगरपालिकेत ट्रेंड शिक्षिका म्हणून काम करू लागली.

देवकाबाईचे नाव सर्वत्र होऊ लागले. सिद्धार्थ महाविद्यालयांत देवकाबाईंच्या अध्यक्षतेखाली महिलांची सभा २८ एप्रिल १९४८ साली झाली होती. त्यावरून ह्या आघाडीवर होत्या असे दिसते. तसेच मान्यवर नेत्यांत त्यांची गणना होऊ लागली होती.

गायकवाडबाबांनी देवकाबाई, मुक्ताबाई याना समाजकार्याची दीक्षा दिली होती. या दोन बहिणीनी त्याकाळी सभा संमेलने गाजविली. रमा प्रधान सखुबाई मोहिते, रमाबाई आंबेडकर, दोंदे बाई या महिलांच्या खांद्याला खांदा लावून आंबेडकरी चळवळींतील जी जबाबदारी अंगावर सोपविण्यात आली ती त्यानी पार पाडली. त्यांचे भाषण सफाईदार असे देवकाबाईंच्या निधनानंतर शांताबाई वडवलकरांनी आपल्या आईचा वारसापुढे चालू ठेवला होता.

कामाठीपुरा, परळ, भोईवाडा वगैरे भागांत फिरून मुक्ताबाईनी बाबासाहेबाचे विचार पसरले. कामगार मैदान, परळ येथील मैदानावर १९३२ साली बाबासाहेबांची सभा झाली. त्या सभेंत हिंदुधर्मातील अनिष्ट रूढी व देवपूजा वगैरे विरोधांत जोरदार भाषणे झाली तेव्हापासून बऱ्याच लोकांनी पंढरपूरला जाणे बंद केले.

साधारण १९३५-३६ पर्यंत बाबासाहेबांच्या सभांना ठिकठिकाणी मुक्ताबाई जात असत. त्यांच्या जयंती उत्सवांत भाग घेत. पुरूषांच्या महिलांच्या सभा असायच्या कामाठीपुऱ्यामध्ये रहाणारे इंग्रज लोक आपल्या लोकांकडे जे त्यांच्याकडे (कामाला असलेल्या) चौकशी करायचे पण विषय सरकार संबंधी नसत. महिलांच्या सभेत बालसंगोपन स्त्री शिक्षण, नवीन महिला मंडळ काढणे, वर्गणी गोळा करणे आदि असत.

त्याकाळी जातीयतेचा दोन्ही बहिणीना खुप त्रास झाला. पिण्याचे पाणीच काय मस्टरवर सही करण्यास देखील वेगळी शाई ठेवलेली असायची. मुक्ताबाई या खार येथे के. एम् कॉलनीत रहात. देवकाबाईचे अकाली निधन झाले. भिकाजी संभाजी गायकवाड यांना महाडच्या चवदार तळ्याच्या संग्रामांत वीर मरण आले. त्यांच्या अकाली निधनाने पार्वतीबाई पूर्ण कोसळल्या. त्या भ्रमिष्ट झाल्या. भ्रमिष्ट अवस्थेंत त्या सातरस्ता ते खार हे अंतर पायी चालत येत. आपल्या कुटूंबावर गायकवाड बाबानी केलेल्या मायेमुळे मुक्ताबाईनी आपल्या एका मुलाचे नाव संभाजी असे ठेवले होते. ते रिझर्व्ह बँकेत मोठे अधिकारी होते. गायकवाड बाबांना दिलेल्या मानपत्रावर मुक्ताबाईचे २७० लोकांमध्ये नाव आहे. त्यांचे निधन वयाच्या ९६ वर्षी झाले.

ß

# महाउपासिका मीराताई आंबेडकर

मीरा ताईंचे माहेरचे नाव मीरा साळवी. वडिलांचे नाव विठ्ठल साळवी वडिल रेल्वेंत फिटरचे काम करायचे. आई वडिल जास्त शिकलेले नव्हते. आजोबा कोकणांतील रायगड जिल्हा दासगाव तालुका रावढळ गावांतले. तेथे दोन वर्षे राहिले. दिल्ली जवळ रेताडी जंक्शन होते. तेथे वडील नोकरीला होते.

चुलत बहिण सुशिलाबाई तुळसकर नारायण जाधव खार पश्चिम येथे रहात असत. त्यांच्याकडे रहात असे भय्यसाहेब त्यांच्या घरी येत असत. ते राजगृहावर रहात असत. बाबासाहेब जेव्हा परदेशी असत तेव्हा रमाईचे सख्खे भाऊ भिकाजी धोत्रे (वळंगकर) ते बी. पी. टी. लोकोशेडमध्ये मॅकनिक होते रमाईचे सख्खे भाऊ असल्यामुळे समाजामध्ये त्यांचा दबदबा होता. त्यांचा मुलगा दिनकर (दिनू) वर भय्यासाहेबांचे खूप प्रेम होते.

दिल्लीजवळ रेताडी जंक्शन होते. तेथे वडील नोकरीला होते. वडिलांची कराचीला बदली झाली. आम्ही तीन बहिणी व एक भाऊ कराचीला बरीच कुटूंबे होती. फाळणीच्यावेळी भारतात आलो.

मीराताईंचे लग्न १९५३ साली झाले. आणि त्या बाबासाहेबांची सूनबाई झाल्या त्याना फार धन्यता वाटते. त्यांच्याबद्दल त्यांना खूप आदर आहे. सामाजिक क्रांतीचे प्रणेते तसेच भारतीय घटनेचे शिल्पकार म्हणून अभिमान वाटतो. बाबासाहेबांच्या चळवळीमधून, त्यांच्या जीवनकार्यापासून प्रेरणा घेऊन त्यानी सामाजिक व धार्मिक कार्य करू लागल्या. आंबेडकरी जनता ज्यांना बाळासाहेब म्हणून ओळखते त्यांचा जन्म राजगृहात १० मे १९५४ ला झाला आपल्या पहिल्या मुलाचे नाव प्रकाश असे ठेवले.

मीराताई खारला नोव्हेंबर १९५४ ला रहायले आले. मीराताईना एकूण चार अपत्ये आहेत. प्रकाश उर्फ बाळासाहेब, रमा (बेबी), भिमराव, आनंदराज त्यानंतर त्यांची भारतीय बौद्ध महासभेच्या अध्यक्षपदी नेमणूक झाली. आणि भारतीय बौद्ध महासभेतर्फे १९७७ नंतर खेडोपाड्यांत जाऊन बौद्ध धम्माचा प्रसार व प्रचार करणे हे त्यांचे ध्येय ठरले. त्यानुसार नांदेड, परभरणी, सातारा, पुणे, दिल्ली, येवले इत्यादि ठिकाणी जाऊन भाषणाद्वारे जनजागृती घडवून आणण्याचा प्रयत्न करीत आहेत.

# दिवंगत सुशिलाबाई नारायण जाधव (तुळसकर)

दिवंगत नारायण रामजी तुळसकर जाधव यांच्या सुविद्य पत्नी दिवंगत श्रीमती सुशिलाबाई नारायण जाधव यांचा जन्म कोकणांत वामने या गावी झाला. वडिल गिरणगावांत कामाला होते. त्यामुळे चार चाळींत सातरस्ता येथे रहात असत. महापालिकेच्या शाळेतून इयत्ता ७ वी पर्यंत शिक्षण घेतले श्रीमती मुक्ताबाई कांबळे ह्या त्यांच्या (सातांबकर) शिक्षिका होत्या. सुशिलाबाई ह्या विद्यार्थीनी होत्या.

पतीचे सामाजिक, शैक्षणिक व धार्मिक असे भले मोठे कार्य पाहून श्रीमती सुशिलाबाईंनी आपल्या संसाराचा रहाटगाडा आपल्या खांद्यावर घेतला. संसाराला आपलासुद्धा हातभर लागावा म्हणून (बी.एड) शिक्षिकेचे प्रशिक्षण घेतले. अभ्यासक्रम पूर्ण करून बृहन्मुंबई महानगरपालिकेंत शिक्षिका म्हणून सेवा करीत होत्या. घरचा संसार, शाळेची नोकरी करीत असतांना आपल्या पतीला समाजकार्यांत उत्तम प्रकारे सहकार्य करीत होत्या. कोकणस्थ को. ऑ. हा. सो. मधील महिलांना समाजाबद्दल प्रेम, सदभावना आपुलकी निर्माण करण्यासाठी, आंबेडकरी चळवळीला गति देण्यासाठी अत्यंतिक गरजेचे आहे हे साध्य करण्यासाठी श्रीमती सुशिलाबाईंनी मुक्ताबाईंच्या हाताखाली काम केले.

वसाहतीमधील महिलांच्या घरोघर जाऊन समाजांतील भावना जागृत केल्या. प्रत्येक महिलेकडून वर्गणी गोळा केली आणि या मंडळाला 'आम्रपाली' महिला मंडळ असे नाव दिले. या मंडळामधील धार्मिक कार्य, समाजकार्य हळदी कुंकू समारंभ, डॉ. बाबासाहेब आंबेडकर जयंती, बौद्ध जयंती, धार्मिक व्याख्याने होत होती. त्यामुळे धर्माचा प्रसार होत होता. त्या बरीच वर्षे आम्रपाली महिला मंडळाच्य अध्यक्षा होत्या.

सिद्धार्थ कॉलेजमध्ये १८ एप्रिल १९४८ साली देवकाबाई कांबळे यांच्या अध्यक्षतेखाली पहिली सभा झाली. त्यांत सुशिला बाईना प्रतिनिधी म्हणून घेण्यात आले. दुसऱ्या प्रतिनिधी चुईम व्हिलेजच्या लाडीबाई शिवराम गमरे (पेडामकर) याना सुद्धा घेण्यात आले. सखुबाई मोहिते या पहिल्या अध्यक्षा होत्या. वयाच्या ६० व्या वर्षी सुशिलाबाई या महानगरपालिकेच्या शाळेंतून मुख्याध्यापक या पदावरून निवृत्त झाल्या. या दापत्याने आपले घर आणि परिवार यांकडे दुर्लक्ष करून समाजाचे हित संबंध जपण्यासाठी परिश्रम केले निसर्ग नियमानुसार त्यांचे निधन झाले.....तारीख

# दिवंगत मालतीबाई महादेव कवडे

मालतीबाई महादेव कवडे यांचा जन्म शिरकावले गांवी रत्नागिरी जिल्ह्यांत झाला. त्यांचे आई वडील मुंबई नायगाव बी. डी. डी. चाळ क्रं. १४ येथे रहात होते. भाऊ बी. बी.मोरे हे कम्युनिस्ट पार्टीत होते. आणि नगर सेवक म्हणून निवडून आले होते. दुसरे भाऊ शंकर मोरे हे मर्फी रेडिओमध्ये कामाला होते. तसचे बहीण धनाबाई ही बाबासाहेबांच्या चळवळीतील महिलामधील कार्यकर्ती होती. त्यांचा विवाह वसंत भातणकर या पनवेलच्या प्रसिद्ध कुटूंबामध्ये झाला.

गंगूबाई मोरे यांचा विवाह प्रसिद्ध क्रिकेटर महादेव कवडे यांच्याशी झाला. तेव्हा भारताचे नांवाजलेले क्रिकेटर विजय मर्चंट नव विवाहितांना आर्शिवाद देण्यासाठी हजर होते. मालती बाईचे शिक्षण मराठी सातवी पर्यंत झालेले होते. त्यामुळे त्यांना महापालिकेच्या शाळेत शिक्षिका म्हणून ताबडतोब नोकरी लागली.

सुरूवातीचा त्यांचा काही काळ एकत्र कुटूंब पद्धतीत गेला. महादेवरावांचे वडिल हे दूरदर्शी होते. त्यानी आपल्या परिवारासाठी जो त्याग व परिश्रम केले होते. त्याला योग्य तो परिणाम झाला व त्यातूनच महादेव रावानी कोकणस्थ कॉलनींत १८ वा रस्ता येथे विकास नावांचा स्वतंत्र बंगला बांधला. व आपल्या कुटुंबासह राहू लागले.

मालतीबाईना तीन कन्या व दोन पुत्र झाले. मोठा मुलगा अरूण इंडियन ऑईल कंपनींत मॅनेजर म्हणून कामाला होता. त्याचे अल्प आजाराने निधन झाले. दुसरा मुलगा विद्याधर हे डॉक्टर आहेत त्यांचे ही निधन झाले.

मालतीबाई यांनी अल्पावधीतच उत्तम शिक्षिका म्हणून नाव कमावले. पठारावरची शाळा, लक्ष्मीनगर (५ नंबर) खार दांडयाची शाळा या शाळांमध्ये त्या अत्यंत लोकप्रिय झाल्या. आपल्या समाजाच्या विद्यार्थ्यांमध्ये तसेच (कोळी, आगरी, मराठा) आदि समाजाच्या विद्यार्थ्यामध्ये प्रसिध्द झाल्या. आजही त्यांच्या हाताखाली शिकलेल्या विद्यार्थ्यांमध्ये त्यांचे नाव काढले जाते.

के. एम्. कॉलनीमध्ये समाज कल्याणाचे त्यांनी खूप काम केले आहे. त्या काही काळ महिला मंडळाच्या अध्यक्षपदी होत्या. कॉलनीमधील प्रत्येक कार्यक्रमामध्ये हळदी कुंकू, जयंति, धार्मिक, राजकीय,सामाजिक, शैक्षणिक त्यांचे महत्त्वपूर्ण योगदान होते तसेच प्रत्येकाच्या सुख दु:खामध्ये त्यांचे सहकार्य असे. त्या विनयशील, हसतमुख, सुस्वभावी आणि विनोदी स्वभावाच्या होत्या. सन १९८८साली त्यांचे अल्प आजाराने निधन झाले.

# दिवंगत सुभद्राबाई भिकू कदम (आबलोलकर)

दिवंगत सुभद्राबाई भिकूराम कदम (आबलोलकर) यांचे माहेरचे नाव जनाबाई रामजी गायकवाड म्हशीलकर असे होते. रामजी गायकवाड हे रेल्वेमध्ये कामाला होते. १९१४ मध्ये पहिले महायुद्ध संपले आणि ते परळ पोयबावडी येथील डबक चाळीत रहावयास आले. त्याना मारूती, सुदाम, तुकाराम, अर्जुन, कृष्णा हे आणि अनुसया व जनाबाई अशा कन्या असा परिवार होता. त्यापैकी मारूती हे रेल्वेमध्ये, सुदाम गोदीमध्ये, तुकाराम पोलीसमध्ये, अर्जुन सैन्यांत आणि कृष्णा हे के. ई. एम. रूग्णालयांत नोकरीला होते. जनाबाई उर्फ (सुभद्रा) यांचा विवाह भिकूराम कदम (आबलोलकर) यांच्याशी झाला. त्यांचे वास्तव्य व घर पाली पठार येथे होते. माहिम पासून मुंबई ही कुलाब्यापर्यंतची सात बेटांची. तर वांद्रे विभाग हा साष्टीमध्ये येत होता. घन दाट जंगलाचा परिसर, विषारी सरपटणारी जनावरे, वड, पिंपळ, चिंच, चिकू, पेरू आणि आमराईचा घनदाट असा परिसर असल्यामुळे खेडेगाव असे संबोधित. भिकूराम कदम (आबलोलकर) यांच्या बरोबर लग्न करून आपल्या मुलीला जंगलभागांत कुठे पाठवायचे ? त्यापेक्षा परळ भागातील मुंबईतील मुलगा बरा असे म्हशीलकर कुटूंबियांना वाटले. परंतु बाबासाहेबांची चळवळ भक्कमपणे वांद्रयांतून उभी राहिलेली असल्याने व हा परिवार बाबासाहेबांच्या शेजारी रहाणारा असल्याने स्व:ता बाबासाहेबांनीच सल्ला दिला. भिकूराम कदमांशी जनाबाईचा विवाह झाला आणि जनाबाईची सुभद्रा झाली.

पालीपठार येथे भिकूराम कदमांचे घर होते. ती जागा खाजगी मालकीची असल्याने ते नवी पाली या ठिकाणी आले. तिथे भिकूराम कदम आपल्या दोन भावांसह रहात होते. एका घराचे तीन भाग प्रत्येकाला एक स्वतंत्र अशा खोल्या होत्या. घर प्रशस्त होते. त्याना माठ्या दोन खिडक्या होत्या. त्याकाळांत कामट्यांचे कूड (भिंत) किंवा कारव्यांचे कूड असत. फळ्यांचा दरवाजा चांगल्या घरांना असे घरासमोर आंगण, तुळशीवृंदावन आणि कोंबड्याचा खुराडा असे. सुभद्राबाईना दहा अपत्ये झाली. त्यापैकी शत्रुघ्न, नंदा, विजय हेच ह्यात आहेत दोन बहिणी होत्या. आशा (गौरा) व मीना त्या आज ह्यांत नाहीत.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर नवी पाली येथे आले होते. व के. एम्. कॉलनीमध्ये जाण्यासाठी खाली उतरले. त्यांच्याबरोबर कार्यकर्त्यांचा समुदाय होता. त्यांचे लक्ष्य खिडकी असलेल्या घराकडे गेले. आणि एवढी माणसे का येतात हे पाहाण्यासाठी सुभद्राबाई जेव्हा खिडकीजवळ आल्या तेव्हा बाबासाहेबांनी त्याना ओळखले व हाक मारली. घर छान आहे म्हणाले. सुभद्राबाईनी आग्रह केला घरी येण्यासाठी पण कार्यकर्त्यांच्या जमावामुळे 'येईन कधी तरी' असे म्हणून बाबासाहेब पुढे निघून गेले.

बाबासाहेब जेव्हा परदेशी जात तेव्हा म्हशीलकरांना घराकडे लक्ष देण्यासाठी सांगून जात.

त्याच चाळीमध्ये सावंत (भामगरकर) रहात असत. व येगांवकर रहात असत. बाबासाहेबांचा प्राण्यांवर भारी जीव असे. त्यानी कुत्रा पाळलेला होता. तसेच रमाईसाठी एक हरीण देखील आणले होते. रमाई त्या हरीणाला प्राण पणाने जपत असत. एकदा खेळता खेळता त्या हरिणाने गॅलरीतून उडी मारली आणि खाली पडून त्याने आपले प्राण गमावले. या घटनेने रमाईना एवढे दु:ख झाले की एक आठवडाभर त्या अन्नाला शिवल्या नाहीत. आणि डोळ्यांतून अविरतपणे अश्रुंचा पूर वहात होता. रमाईचा सात दिवस उपवास असायचा.

त्याच चाळीत पंडी नावाची एक वृद्धा रहात असे. तिला पंडी नायकीन असे सर्वजण म्हणत. ती गरीब होती. बाबासाहेबांचे मेहुणे शंकरराव धोत्रे आले की आम्हांला म्हातारी बाहेर जायला सांगायची. आणि शंकर मामा पण आम्हांला हाकलायचे कारण असायच बाबासाहेब येत आहेत असा निरोप त्यानी आणलेला असायचा. मग मसाला वाटण्यासाठी आणि बाबासाहेबांचे जेवण बनविण्यामध्ये काही चूक होऊ नये म्हणून पंडीबाई सर्वांना बाहेर जावयास सांगायची मग सुके बोबींल आणि बटाटे, किंवा पापडी व जवळा किंवा सुकी करदी यांचे कालवण व हातावर केलेल्या भाकरी यांचा डबा भरून धोत्रे राजगृहावर घेऊन जायचे. बाबासाहेब पंडी नायकीणीला साडी चोळीव पैसे देऊन सन्मानित करीत असत.

सिद्धार्थ महाविद्यालयात महिला मंडळाची स्थापना झाली. पहिल्या अध्यक्षा दि. सखुबाई मोहिते यांना नियुक्त करण्यात आले उपाध्यक्षा मुक्ताबाई कांबळे आणि ही सभा दिनांक २८ एप्रिल १९४८ साली देवकाबाईच्या अध्यक्षतेखाली झाली होती. तसेच महिला प्रतिनिधी म्हणून सुशिलाबाई नारायण जाधव (तुळसकर) सुभद्राबाई भिकू कदम (आबलोलकर) आणि लाडीबाई विठ्ठल पेडामकर यांची नियुक्ती केली. या महिलांनी घरोघर जाऊन महार ज्ञाती पंचायत आणि शेड्युल्डकॉस्ट फेडरेशन या पक्षाचा प्रचार आणि प्रसार केला.

१८ वा रस्ता खार येथे रहाणारे प्रो. व्ही. जी. रावसाहेब यांनी के. एम. कॉलनीत मागासवर्गीय (महार समाजासाठी) शाळा सुरू केली. तिथे जोगळेकर मास्तर होते. या शाळेत सुभद्राबाई शिपाईणबाई म्हणून काम करू लागल्या. मुलाना शाळेत येण्यासाठी पालकांना समजावून सांगणे, मुलांना आंघोळ घालणे, त्याना शिकविणे, व घरी पोहचविणे या सेवा भावी वृत्तीने या परिसरांची त्यानी महत्वपूर्ण सेवा केली आहे. रावसाहेबांनी आपल्या पित्याची स्मृति रहावी म्हणून सर राव बहादुर जी. एस. राव ही शाळा बांधली व ती महापालिकेला सूपूर्द केली त्याच शाळेत प्रो. व्ही. जी. राव यांनी सुभद्राबाईना कायम स्वरुपाची नोकरी लावली. बाबासाहेबांची चळवळ, शिक्षणासारखे पवित्र करीत असतांनाच वार्धक्याने मार्च १९६६ मध्ये त्या दिवंगत झाल्या. त्यांच्या स्मृतिस कोटि कोटि प्रणाम!

सदर माहिती मा. शत्रुघ्न कदम यांच्याकडून प्राप्त झाली आहे.

**शब्दांकन ज्ञानकिर्ती सुरेश बा. धोत्रे.**

# दिवंगत भागीरथीबाई सुडकाजी कासारे (लाटवणकर)

मातोश्री भागीरथीबाई सुडकाजी कासारे यांचा जन्म मु. कुंबळे. ता. मंडणगड जिल्हा रत्नागिरी येथे सोनाबाई कमळाजी खैरे व वडिल कमळाजी रत्नाजी खैरे यांच्या पोटी १९३० साली झाला. वयाच्या ६ व्या वर्षी त्यांचे नाव शाळेंत दाखल करण्यात आले. त्यावेळी बालविवाह करण्याची प्रथारूढ होती. मुक्काम लाटवण ता. मंडणगड जि. रत्नागिरी येथील रहिवाशी भागुराम रत्नाजी कासारे यांचे समवेत विवाह संपन्न झाला. दोन्ही कुटूंबे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या तालुक्यातील असल्याने त्याना शिक्षणाचे महत्व समजले. भागीरथीबाईंच्या शिक्षणाची सुरूवात लग्नानंतर झाली इयत्ता ७ वी पर्यंत त्यांचे शिक्षण झाले. त्यांचे पतीही वांद्रे येथील सेंट अॅन्ड्रयूज हायस्कूलमध्ये शिकत होते. तेथे त्यांचे शिक्षण ११ वी पर्यंत इंग्रजी माध्यमांतून झाले. पुढे मुंबई पोर्ट ट्रस्टमध्ये कासारे नोकरीला लागले. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी आपली सामाजिक आणि राजकीय चळवळ वांद्रे विभागांतून सुरू केली होती. दिनांक २५ मे १९४१ साली महार ज्ञाती पंचायत समितीची स्थापना के. एम् कॉलनी वांद्रे येथे गणपत विठ्ठल कासारे लाटवणकर यांच्या निवासस्थानी करण्यात आली. बाबासाहेबांचे सहकारी केशवराव आड्रेकर, सखाराम भिकू धोत्रे गणपत विठ्ठल कासारे, सी. एन्. मोहिते गुरूजी, महादेव गोठेकर (कुकुची नार) इत्यादी मान्यवर या भागांत रहात होते. त्यांचे पती शाखा क्रं. १९० चे चिटणीस होते. भागीरथीबाई सुशिक्षित असल्यामुळे शाखा क्रं. १९० यांच्या महिला मंडळांच्या चिटणीस झाल्या पंचायतीच्या कामकाजापासून त्यांच्या समाज कार्यास खरी सुरूवात झाली. आंबेडकर चळवळीच्या समाज क्रांतीचा संदेश जलसाकार आणि कवी यांनी गीतामधून घरोघरी पोहचविला होता. भागुराम घाग आणि मा. भागीरथीबाई कासारे गात असत. त्यांचे पती गायन पार्टीचे मॅनेजर होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची महिला मंडळे स्थापन करण्याच्या आदेशाप्रमाणे बाबासाहेब रहात असलेल्या परळ येथील सखुबाई मोहिते यांच्या अध्यक्षतेखाली बृहन्मुंबई महिला मंडळाची स्थापना झाली. या कमिटीमध्ये भागीरथीबाई उपाध्यक्षा झाल्या. त्यांच्याच अधिपत्याखाली संपूर्ण मुंबई शहरांमध्ये महिलामंडळे स्थापन करण्यात आली. दापोली मंडणगड तालुक्यांत राखीव जागेवर त्यांनी ७ वर्षे काम केले. ते ही रिपब्लीकन पक्षाचे ठाणे, कुलाबा, रत्नागिरी जिल्ह्यामध्ये सतत १९ वर्षे काम केले. महाड येथील क्रांतीस्तंभाच्य उभारणीसाठी बौद्धजन पंचायत समितीने जे मेळावे भरविले त्यापैकी तीन मेळावे भागीरथीबाई यांच्या अधिपत्याखाली झाले. समाजाला नवीन पुढाऱ्यांचे जे नेतृत्व मिळाले. व जे जुने नेते होऊन गेले यामधील महत्वाचा दुवा कासारे बाईच्या रूपाने समाजामध्ये होता. वयाची ७० वर्षे पूर्ण झाल्यावरही तरूणांना-तरूणीना लाजवील अशा जोमाने उत्साहाने सार्वजनिक, धार्मिक, सामाजिक आणि राजकीय सर्व प्रकारच्या विकास कामांमध्ये त्यांचा सिंहाचा वाटा आहे.

त्यामुळे बौद्धजन पंचायत समितीने १९९२ मध्ये कासारे बाईच्या कार्याचा आदर म्हणून सत्कार केला. उर्मिला पवार या जेष्ठ लेखिकेने महाड येथील महिला मेळाव्यांतहि त्यांचा सत्कार केला. मात्र ''आम्ही ही इतिहास घडविला'' या पुस्तकांत भागीरथीबाई कासारेच्या कार्याला न्याय दिला नाही. शाखा क्रं. १९० ने त्यांचा सत्कार केला आजपर्यंत अविरत, निस्वार्थी, सेवाभावी वृत्तीने कशाचीही अपेक्षा न करता प्रसंगी स्व:ताच आर्थिक, झीज सहन करीत. समाजासाठी त्यानी योगदान दिलेले आहे. देह जळो आणि जग उजळो या ध्येयाने प्रेरित होऊन कार्य करणाऱ्या दिवंगत मातोश्री भागीरथीबाई सुडकाजी कासारे यांना समाजभूषण कार्याने पुरस्काराने सुलक्षणा धोत्रे सांस्कृतिक केन्द्राने सन्मानित केले. अल्प आजाराने त्यांचा मृत्यू झाला.



## मीराबाई गोवर्धन मोरे (वाघावकर)

### वय ८५ वर्षे,
### शिक्षण - इयत्ता ६ वी

यांचा जन्म कांतवाडी वांद्रे येथे झाला. वडिलांचे नाव लक्ष्मण आईचे नाव चंद्रीबाई व भागीबाई चंद्रीबाई ही भोंबडकराची मुलगी तर भागीबाई ही भांडविलकराची मुलगी-भागीबाईला मुले झाली नाहीत. म्हणून वडिलांनी चंद्राबाईशी लग्न केले. तिच्या पासून दोन मुली झाल्या. एक मीराबाई व दुसरी अनुसया वांद्रे कसाईवाड्यांत गोडावलेंच्या घरांत तिला दिली होती.

पाली नाका येथील ६ नंबरच्या शाळेंत माझे शिक्षण झाले. आम्ही पायी चालत जात असू. घोडागाडी व बैलगाडी यांच्या शिवाय वाहतुकीची साधने नव्हती. मी मराठी ६ वी पर्यंत शिकले व माझे लग्न १३ व्या वर्षी झाले, जया, गंगा नावाच्या माझ्या मैत्रिणी होत्या. माझे पती गोवर्धन मोरे हे त्यांच्या आई-वडिलांचे एकूल ते एक होते. ते इंग्रज अधिकाऱ्याकडे ड्रायव्हर या पदावर काम करीत असत. नंतर ते बेस्टमध्ये कामाला लागले. त्यांना सनई, व्हायोलिन, क्लॉरोनेट वाजविता येत असे.

पाली नाक्यावर आमचे शिक्षक होते. राणे मास्तर आणि महादेव बागले आम्हाला शाळेंत घालण्यासाठी खादीचे कपडे देत असत. एक वेणी घालावी लागे. व हातांत दप्तर असा आमचा पोशाख असे. माझी आई भागीबाई वांद्रयाला पारशी माणसाच्या घरी काम करीत असे. वडील जी. आय. पी. रेल्वेमध्ये काम करीत असत. महागाई नव्हती पण गरीबी होती.

माझा चुलत भाऊ सखाराम नांवाचा होता. त्याच्या बायकोचे नाव भिमा असे होते. आम्ही आंबवड्याला गेलो होतो. तेथे रमाई व बाबासाहेबांची भेट झाली. नवामळा हा परिसर जंगलाचा होता आंबेडकर रोडचे नाव पाली दांडा रोड होते. पाली हीलवर जात असू. नळ नव्हते. बत्त्या नव्हत्या. कंदील टेंबे, वापरत सरकारी माणूस गैसची बत्ती लावण्यास येत असे. परसाकडे जाण्याची सोय नव्हती. विहीरी होत्या. त्यांचेच पाणी पिण्यासाठी वापरत असू.

माझे शिक्षण ६ वी पर्यंत झालेले होते. माझी गट्टी त्यांच्या बरोबर जमली ती राहिली. त्यामुळे व्हर्नाकुलर फायनलची परिक्षा देऊ शकले नाही.

मला ५ मुली व २ मुलगे झाले. त्यापैकी १ मुलगा व ३ मुली आहेत. शेती ख्रिश्चन लोकांची होती. तसेच मळे होते आपले लोक त्यांच्याकडे काम करीत असत. आमच्या बकऱ्या होत्या त्या जिमखान्याकडून आणाव्या लागत. माझ्या मैत्रिणी रामी, बनी, सुडकी, घांगुणा बागले मास्तरांची मुलगी, आनू लाटवणकर या सर्व जुनी शेरलीतील होत्या.

मी शाखा क्रं. १४९ नवामळा येथील पंचायतींत कार्यकर्ती म्हणून काम करू लागले. हाटे यांच्या घराजवळ जयंती होत असे. जलसा, कवाली, कांबळेचा जलसा मी वर्गणी गोळा करून हिराबाई गोपाळ पंदीरकर (साळवी) हिच्याकडे देत असे. शिर्के, असगोलकर हे मिरवणूक काढायचे त्यात मी पुढाकार घेई. चांगुणा, जितेकर, टोळकर, हाटे कपडे शिवित असत.

नवी पाली येथे आंबेडकर रोडला नाव देण्याचा मोठा कार्यक्रम झाला. शिर्के, असगोलकर निवडून आले तेव्हा रात्री २ वाजता मोठी मिरवणूक निघाली त्यावेळी बाबासाहेब आले होते. मी फक्त पंचायतीच्या कामकाजांत भाग घेतला होता. सत्याग्रहाला गेले नाही. सभामधून भाषणे केली नाहीत पण बाबासाहेबांचे आदेश आणि कार्य आमच्या या १२ पारवाड्यांत पसरविण्याचे कार्य केले आहे. बाबासाहेब वांद्रे विभागांत आलेले पाहिले आहेत त्यांची वाणी ऐकली आहे. त्यामुळे माझे जीवन धन्य झाले आहे.

## सुशिलाबाई उर्फ बायजाबाई बढेकर

**जन्म :१७/१२/३१ आंबवडे येथे (दापोली)**
**वडिलांचे नाव : रामचंद्र सोनावणे**
**आईचे नाव : आनंदी गंगाराम सोनावणे.**

वडिल चरितार्थासाठी मुंबईला आले. प्रथम ते आपले बंधू विठ्ठल भागुराम सोनावणे यांच्याकडे राहिले. नवा मळा येथे माझी आत्या रहात होती. तिच्या घरांत आम्ही स्थायिक झालो. माझ्या शालेय शिक्षणाला वयाच्या ६ व्या वर्षी सुरूवात झाली. आमची शाळा पाली नाका येथे म्युनिसिपालिटीची होती. तिला ६ नंबरची शाळा म्हणत. आम्ही पायी चालत जात असू शाळेत शिकतांना खूप अस्पृश्यता जाणवली. माझे शिक्षण मराठी ४ थी पर्यंत झाले. आमचे पाणी पिण्याचे मडके वेगळे ठेवलेले असायचे बसण्यासाठी दऱ्या वेगळ्या असायच्या त्याना शिक्षक शिवत नसत. आम्हांलाच घड्या घालून ठेवाव्या लागत असत. पाणी भरणार नाही म्हटले की बाई हातावर छडीने मारीत. किंवा रोल असलेल्या दांड्याने मारत असत. त्यामुळे एक वर्ष शाळेंतच गेले नाही. माझ्या वडिलांना ८ आणे दंड भरावा लागला.

आमची शाळा ११ वाजता जेवायला सुटत असे व दोन वाजता पुन्हा भरत असे ती संध्याकाळी ५ वाजता सुटत असे माझी आई मला एक पैसा देत असे त्याची भजी घेऊन खायचे व पाणी प्यायचे. अकरानंतर दीड वाजेपर्यंत पाली मधील विलायती आंबे, चिंचा, चिकू, पेरू ची गर्द वनराजी असल्याने मिळतील ती फळे पोटभर खायची फिरून नंतर शाळेंत यायचे असा आमचा दिनक्रम होता.

दिवंगत सदाशिव रामजी जाधव (तुळसकर) हे सैन्यात होते. त्यांना आखाड्याचे शिक्षण होते. त्यानी मला पोहायला शिकविले. ते सागाची दोन लाकडे पाठीवर बांधीत व त्याना एक दोरी असे त्या काळांत टायर नव्हते. पोहायला शिकविल्यानंतर त्यानी सायकल शिकविली. त्यांच्या आखाड्यांत शिकणारे अनेक लोक होते. दुर्दवाने आज ते ह्यात नाहीत. उल्लेख करण्यासारखी नावे नामदेव कदम (आबलोलकर) रामचंद्र धोत्रे (विरसईकर) चंदर भोस्तेकर

वयाच्या १० व्या वर्षी मी लाठी काठी शिकले मल्लखंब, छडीपट्टा, पायाना तीन चाकू बांधून कपाळावर चक्र ठेवून बॅलन्स करणे आदि प्रकार करीत असू सदाशिव दादांचा मात्र विचित्र प्रकार होता तो तेच करीत असते. जमिनीवर चार बाटल्या त्यावर खूर्ची तिच्यावर आडवी खूर्ची त्यावर एकावर एक दहा खुर्च्या ठेवून उभे रहात. खालून एकजण बाटली फेकी ते वर झेलीत ती बाटली उभी ठेवून तिच्यावर ते बॅलन्स करीत हा प्रकार चित्त थरारक असे तो

दुसरा कुणी करीत नसे.

वांद्रे विभागांत जेव्हा जेव्हा मुसलमान किंवा ख्रिस्ती लोकानी आपल्या समाज बांधवावर अन्याय अत्याचार केला. तेव्हा त्याचा प्रतिकार करून समाज बांधवांचे संरक्षण करण्याची संधि मिळाली तिचा सदाशिव दादामुळे पूरेपूर लाभ उठविता आला.

प्रो. व्ही. जी. रावसाहेबांनी डिस्प्रेड क्लाससाठी १ ली ते ४ थी पर्यंत शाळा काढली. तिच्या पटांगणांत डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या जयंतीचा सप्ताह साजरा होत असे. जयंती निमित्त मिरवणूक निघत असे. ती बैलगाडीत बाबासाहेब व मातोश्री रमाईंच्या तस्वीरी ठेवून, एकदा बाबासाहेब आले असतांना माझा खेळ पाहिला माझे केस बांधलेले व मुलाप्रमाणे पोशाख पाहून सदाशिव दादांना माझ्याबद्दल विचारले मी मुलगी आहे हे समजल्याने बाबासाहेबानी खुश होऊन मला चांदीचे पदक दिले. माझ्या आईकडून ते गहाळ झाले.

१४ व्या वर्षी माझा विवाह झाला होता माझ्या खेळाला माझ्या पतीकडून मज्जाव झाला नाही मला प्रोत्साहन मिळले माझ्या पतीचे नाव रामचंद्र राजाराम बढेकर असे होते ते वरळीला गारमेंट फॅक्टरींत क्लर्क या पदावर काम करीत होते. कालांतरांने मीही त्या कंपनीत काम करू लागले. मला सहा अपत्ये झाली. ३ पुत्र व ३ कन्या त्यांचे विवाह माझ्या पतीच्या निधनानंतर पार पडले आहेत. मलामाझ्या सासूने काही आयुर्वेदिक औषधांची माहिती दिली आहे. ती जनसेवा म्हणून मी करीत आहे. बाबासाहेबांनी माझा खेळ पाहिला मला शाबासकी दिली. चांदीचे पदक दिले. माझा हा जो गौरव झाला त्याने माझ्या जीवनाचे सोने झाले. ही स्मृति आजवर मी जपून आहे.

सदर माहिती बायजाबाईनी दिली आहे

# मातोश्री निर्मला भिकू पवार उर्फ नामबाय मोरे (गोडावले)

**वय** : ८० वर्षे, शिक्षण : नाही
**जन्म** : वांद्रे जुने पशुवध गृह येथे
**मूळचे नाव** : नामबाय सखाराम मोरे (गोडावले)
**वडिलांचे नाव** : सखाराम रामजी मोरे
**आईचे नाव** : भागीबाई सखाराम मोरे



नामबाय याना एकूण सहा भावंडे झाली मोठी भिमा दुसरा शिवा तिसरी नामबाय चौथी सोना पाचवा प्रकाश सहावा किशोर.

वयाच्या ७ व्या वर्षी त्यानी लाठी काठी बनाठी, कवायत, पिरॅमिड (बॅलन्स) एकमेकावर थर रचून सर्वांच्यामध्ये प्रमुख म्हणून असत. वांद्रे येथे महापालिकेत काम करणाऱ्या चतुर्थ श्रेणी कर्मचाऱ्यानी आणि रहिवाश्यानी स्थापन केलेली मातोश्री रमाई आंबेडकर व्यायाम शाळा होती. तेथे शिक्षक होते ज्यानी नामबायना घडविले गंगाराम माटवणकर जयराम कासारे, गंगाराम गमरे

नामबायचे आजोबा रामजी मोरे हे गुरांचे डॉक्टर होते. नामबायचे कसरतीचे खेळ फार प्रसिद्ध होते. त्यांचे संपूर्ण शरीर हे रबराप्रमणे वळत असे. त्यांचे कार्यक्रम, प्रात्यक्षिके सादर होत असत.

नामबायचा विवाह बाराव्या वर्षी झाला. लग्नानंतर त्याना शिक्षण घेता आले नाही. नामबायना एकूण सात अपत्ये झाली. सुर्यकांत, मुकुंद, माया, रविंद्र, उपेंद्र, छाया, द्या, (सूर्यकांत व उपेंद्र) हे दिवंगत झाले आहेत ५ मुले ह्यात आहेत. त्याना-१ २ नातवंडे आहेत.

नामबायचे सामाजिक कार्य हे फार मोलाचे व महत्वाचे दिशा दर्शक ठरले आहे. त्या शाखा क्रं. १ ३ ३ च्या जेष्ठ सदस्या आहेत. धर्मांतर सोहळा नागपूर येथे झाला. त्या सोहळ्याला त्या उपस्थित होत्या. आंबेडकरी चळवळीत मोठ्या प्रमाणावर त्यांचा सहभाग आहे त्याचे आताचे वास्तव्य असलेला पत्ता खालीलप्रमाणे आहे.

समर्थवाडी, हनुमान नगर कांदिवली (पूर्व) मुंबई...........१ ० १

# बारा पाखाड्यांतील बाबासाहेबांचे सहकारी

## सौजन्यमूर्ति प्रो. व्ही. जी. रावसाहेब

मुंबईतील पाठारे प्रभु समाजांतील सधन घराण्यांत रावसाहेबांचा जन्म झाला. हा समाज प्रथमपासूनच मुंबईत असल्यामुळे इथल्या काही जमिनी त्यांच्या मालकीच्या होत्या. पित्याचे नाव गणपत सदाशिव राव आणि मातु:श्रीचे नाव धोंडीबाई रावसाहेबांचा जन्म २४ सप्टेंबर १८८८ साली झाला. राव दांपत्याला एकूण दहा मुले झाली. त्यापैकी पांचच जगली. तीन मुलगे आणि दोन मुली. थोरले बाळाजी दुसरे विनायक व तिसरे मोरेश्वर चंपूबाई आणि कृष्णाबाई ही त्यांच्या बहिणींची नावे कृष्णाबाई ही सर्वांत धाकटी बहीण त्यांच्या यजमानांचे नाव अनंत धाकजी राणे मुंबईतील आणि प्रथित यश आणि सुविख्यात मोटार व्यावसायिक ''दादाजी धाकजी राणे'' मध्ये ते भागीदार होते.

रावघराण्याचा ओढा कायदे शास्त्राकडे होता. त्यांच्या प्रत्येक पिढीत नामांकित दकील जन्मले आहेत. गणपत रावांचा काळ म्हणजे ब्रिटीशांच्या ऐश्वर्याचा काळ सरकार दरबारी, शाळा कॉलेज निमसरकारी संस्थामधून त्यांचीच मिरासदारी होती. अशा काळांत सरकारी लॉ कॉलेजचे ते प्रिन्सिपॉल होते. पहिले भारतीय म्हणून ते ओळखले जातात. थोड्याच अवधिंत त्यांची हायकोर्ट जज्ज म्हणून नियुक्ती करण्यात आली. परोपकार हे राव घराण्याचे वैशिष्टय आहे. व ते गणपत सदाशिव राव यांच्यापासून चालत आले आहे.

रावसाहेबांचे बालपण काळबादेवी येथे गेले तिथल्या विठ्ठलवाडी येथील शाळेंत त्यानी प्राथमिक शिक्षणाचे धडे गिरविले. गणपत रावांचे विनायककडे विशेष लक्ष असे. दुय्यम शिक्षणासाठी त्यानी विनायकरावांचे नाव एलफिन्सटन मिडलस्कूलमध्ये दाखल केले. पुढे त्याच शाळेच्या कॉलेजांत त्यानी महाविद्यालयीन शिक्षणास प्रारंभ केला. १९०८ साली पदवी संपादन केली. व फ्रेंच या विषयांत प्रथम श्रेणींचे गुण मिळविले.

इंग्लडमधील वास्तव्यांत ज्या महनीय व्यक्ति रावसाहेबांस मित्र म्हणून लाभल्या त्यांत भारताचे पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू, महाराष्ट्राचे माजी राज्यपाल श्री प्रकाश, मुंबई विद्यापीठाचे माजी उपकुलगुरू सर विठ्ठलराव चंदावरकर, लाला लजपतराय, गोपाळ कृष्ण गोखले बंगालचे पी. के. रॉय यांच्यामुळे रविंद्रनाथ टागोर यांच्याशी राव साहेबांची मैत्री झाली. रविंद्रनाथ टागोरजी कधी मुंबईस आले की हक्काने या मैत्रीला उजाळा देण्यासाठी रावसाहेबांच्या घरी येत असत. रविंद्रनाथांच्या शांती निकेतनचे रावसाहेब तहह्यात सभासद होते.

मुंबईच्या एलफिन्सटन कॉलेजमधील फ्रेंचचे प्रोफेसर पेल्टीयर (Prof Peltier) हे रावसाहेबांचे

गुरू १ ऑगस्ट १९१४ रोजी पहिल्या महायुद्धाने पेट घेतल्यामुळे फ्रान्सकडून त्याना परत बोलावण्यांत आले. गुरूने शिष्याची शिफारस केली मुंबईच्या एलफिन्सटन आणि विल्सन या दोन्ही नामांकित कॉलेजांत फ्रेंचचे प्रोफेसर म्हणून नेमणूक झाली. पंचवीस वर्षाचा तरूण परकी भाषेचा मुंबईतील पहिला प्राध्यापक म्हणून ओळखला गेला ''French is not monopoly of English men'' हे उद्‌गार त्यानी खरे करून दाखविले. या धक्का धक्कीमध्ये प्रो. पेल्टीयार यांच्या कुटूंबाची वाताहत झाली. युद्ध कैदी म्हणून त्यांची धरपकड झाली. स्व:ता पेल्टीयार त्यावेळी आघाडीवर होते. तेथूनच त्यानी रावसाहेबांना पत्र लिहीले. की कसेही करून माझ्या कुटूंबाकडे लक्ष दे. रावसाहेबानी हे गुरूवचन शिरोधार्य मानून आपले मासिक वेतन सहाशे रूपये परस्पर फान्समध्ये खाना केले आणि तेही सतत दीड वर्षे! अशा रितीने दोनही कॉलेजांत त्यांनी विनावेतन काम केले. रावसाहेबांची किर्ती मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड विलींग्डन यांचे पर्यंत पोहचली त्यानी आपल्या मुलास फ्रेंच शिकविण्यास सांगितले. या कामाबद्दल रावसाहेबांनी एक पैसाहि मोबदला घेतला नाही. सन १९१८ मध्ये महायुद्ध संपले. आणि फ्रान्सने रावसाहेबांबद्दल कृतज्ञता व्यक्त केली. या देशाने आपल्या प्रतिनिधी मार्फत रावसाहेबांना O. A (Occicerd' Academic) हा बहुमानाचा किताब बहाल केला. तसेच एलफिन्सटनमध्ये आपल्या राजदूतांकरवी त्यांचे तैलचित्र लावले.

आपल्या कार्याबद्दल त्यानी कधीही गाजा. वाजा केला नाही. तरीही सामाजिक व शैक्षणिक कार्याची महती जाणकारांच्या कानापर्यंत पाहचली होती. याचाच परिणाम म्हणून मुंबई नगरपालिकेच्या स्कूल कमिटीवर त्याना घेण्यात आले. यावेळी श्री होमी मोदी, श्री. स. का. पाटील यांचा त्यांना सहवास घडला. सन १९२९ मध्ये तर त्यांची सरकारतर्फे कॉन्सिलर म्हणून नियुक्ति झाली. आणि १९३२ मध्ये ते म्युनिसिपल स्कूल कमिटीवर चेअरमन म्हणून निवडून आले पददलित समाजाबद्दल त्यांना आस्था होतीच स्कूल कमिटींत असल्यामुळे त्यांना या समाजासाठी अधिक भरीव काही तरी करावयास मिळाले. त्यानुसार त्यानी मागासलेल्या आणि वर्गीकृत जमातीतील लोकांना शिक्षक म्हणून नेमतांना परिक्षेतील गुणांच्या टक्केवारीचे प्रमाणे कमी असावे असा ठराव पास करून घेतला. या समाजासाठी त्यानी केलेला हा प्रयत्न अत्यंत मोलाचा समजला जातो पुढे १९३९ पर्यंत नियुक्त कौन्सिलर म्हणून मुंबई नगरपालिकेंत असतांना अनेक होतकरू विद्यार्थ्यांना त्यानी हर एक प्रकारे सहाय्य केले.

एलफिन्सटन सोसायटीचे ते काही काळ सभासद व ऑनररी सेक्रेटरी होते. १९३१ मध्ये मुंबई विद्यापींठाचे सिनेटचे सभासद म्हणून ते निवडून आले होते. एस. एन. डी. टी. विद्यापीठाचे काम पाहिले. तसेच बोर्ड ऑफ स्टडीज इन मॉर्डन युरोपीयन लॅंग्वेजिसचे चेअरमन म्हणूनही त्यानी काम पाहीले. त्याचबरोबरच धी फॅकल्टी ऑफ आर्टसचे १९३६ ते १९३९ या काळांत ते डीन होते. शिवाय व्ही. जे. टी. आय् इन्स्टीटयूट, प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियम, सेप्टी फर्स्ट रेडक्रॉस असोसिएशन इत्यादींचे सभासद म्हणून त्यानी काम पाहिले त्याप्रमाणे स्काऊट

चळवळीतही वाहून घेतले. विशेष सांगावयाची गोष्ट म्हणजे दुसऱ्या महायुद्धाच्या धामधूमीत देशाच्या रेग्युलर आर्मीमध्ये मेजर म्हणूनहि त्यानी काम केले.

रावसाहेबांचे शैक्षणिक कार्य ही मोलाचे होते प्रभु सेमेनारी आणि चंदा रामजी या माध्यमिक शाळांचे ते सेक्रेटरी होते. बॉम्बे हँडवर्क्सएज्युकेशन क्लासेस, भारत एज्युकेशन सोसायटी डिलाईलरोड नाईट हायस्कूल, महात्मा फुले नाईट हायस्कूल डॉ. केतकर आर्ट स्टडीज, पटुक पॉली टेक्नीकल हायस्कूल या शाळांमधून त्यानी काम केले.

१९४६ साली डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी पिपल्स एज्युकेशन सोसायटीची स्थापना केली. आपल्या समाजाच्या आणि त्याचबरोबर इतर समाजांतील विद्यार्थ्यांना माध्यमिक व महाविद्यालयीन शिक्षण देणे हे या संस्थेचे प्रमुख कार्य डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे देखील ''एलफिन्सटनचेच'' विद्यार्थी दशेपासूनच परिचय होता. बाबासाहेबानी आपल्या समाजाच्या हितरक्षणासाठी स्व:ताला वाहून घेतले तर या समाजासाठीची असलेली कळकळ वादातील होती. बाबासाहेबानी त्याना आपल्या संस्थेत घेतले पिपल्स एज्युकेशन सोसायटीची विद्यालये हीच त्यांची कर्मभूमि झाली होती. एक्झक्युटिव्ह बॉडीचे सभासद म्हणून त्याना घेण्यात आले. त्यानंतर गव्हर्निंग बॉडीचे सदस्य व विश्वस्त म्हणून त्यांची नियुक्ती करण्यात आली. सोसायटीच्या प्रत्येक कामांत ते अत्यंत दक्षतेने लक्ष घालीत असत. सोसायटीच्या सभा रविारी असोत, सुटीच्या दिवशी असोत, कोणत्याही वेळेस असोत, स्व:ताचे कितीही महत्वाचे कार्य असो ते बाजूला ठेवून ते सभाना हजर रहात असत.

बान्द्रा येथील कोकणस्थ महार कॉलनीतील सुमारे पांच हजार लोकांच्या शैक्षणिक उन्नतिसाठी रावसाहेबांनी अपार कष्ट घेतले आहेत. तिथल्या मुलांमध्ये शिक्षणाची आवड निर्माण केली. ही शाळा आपल्या पित्याच्या दिवाण बहादूर जी. एस्. राव यांच्या नांवाने महापालिकेच्या स्वाधीन . केली. आणि दहा हजार रूपयांची देणगी दिली आहे. ही शाळा आज ही पालि हील येथे आहे. ३१ जानेवारी १९४३ साली त्याना अर्धांगवायुचा झटका आला व ते बेशुद्ध पडले. परंतु त्या गंभीर प्रसंगावर मात करण्यामध्ये ते यशस्वी झाले व त्याना अर्धांग वायुचा झटका कधी काळी आला होता हे कोणालाच खरे वाटले नाही.

रावसाहेबांच्या या सर्व कार्यामध्ये त्यांच्या सुशील, सुविद्ध सुसंस्कारित पत्नी भानुमती यांचा तितकाच सिंहाचा वाटा आहे. सावलीप्रमाणे त्या त्यांच्याबरोबर राहिल्या. अहोरात्र लोकांची वर्दळ असे. पण भानुमतीबाईनी त्याबद्दल कधीही कुरबुर केली नाही. पतीने अनेक देणग्या दिल्या अनेकांना हात भरभरून सहाय्य केले पण त्यानी कधीही हात आवरण्याचा सल्ला दिला नाही. या मातेचे निधन २० एप्रिल १९५६ रोजी झाले.

रावकुटूंबाच्या मुंबईत काळबादेवी, गिरगांव, आणि परेल टँकरोड या विभागात स्थावर मिळकती होत्या. त्या आता विकून टाकण्यात आल्या आहेत. १८ वा रस्ता खार पश्चिम येथील बंगला रावसाहेबांनी १९३९ साली विकत घेतला. त्यांचे नातू राजा (कन्येचे चिरंजीव) हे

शालेय मित्र माझे होते. मी स्व:ता, अरूण डोळस, व कालिचरण पारसी असे मित्र क्रिकेटची प्रॅक्टीस दुपारी २ ते सायं ५ वाजेपर्यंत केरीत असू. १९ वा रस्ता येथील नवी शेरली विभागांत रात्र शाळा चालत असे. या शाळेलास १०००/-रूपयांची देणगी रावसाहेबांनी दिली. त्याचवेळी अंबूताई धुरंधर (चित्रकार एम्. व्ही. धुरंधर) यांची कन्या यानी दोन विद्यार्थ्यांना धुरंधर कलामंदिर मध्ये ड्रॉईंग, पेटींग मोफत शिकविण्याचे जाहीर केले. याचा फायदा शांताराम जाधव (घराडकर) व मला मिळाला. रावसाहेबांनी आपल्या तीनही मुलीना आपल्या बंगल्या शेजारी तीन प्लॉटस विकत घेऊन दिले. दोन वकील मुलगे, सून नातवंडे बंगल्यात रहात होते. आता फक्त त्यांची एकच कन्या ह्यात आहे.

भारताचे माजी पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू यांच्याशी त्यांचे सहाध्यायी मित्र म्हणून नाते होते. स्व:ताजवळ पांडित्य होते. कार्य करण्याची धमक होती. त्यांच्या जागी इतर कोणी असता तर याचा त्यानी किती तरी आर्थिक लाभ उठविला असता. सरकारी लठ्ठ वेतनाचे स्थान मिळविले असते. पण त्यानी पैसा आणि प्रसिद्धीचा मार्ग कधीही स्विकारला नाही. अशा या सौजन्यमूर्तिचे निधन दिनांक २७ जुलै १९७० रोजी वयाच्या ८२ व्या वर्षी झाले. त्यांच्या स्मृतिस कोटि कोटि प्रणाम!

ß

**श्री. "रा. रा.** — **यांस**

कृ. सा. न. वि. वि.

**कोकणस्थ महार कॉलनी, पाली-दांडा रोड, खार, मुंबई २१** येथील **"दिवाण बहादूर जो. एस्. राव मेमोरीअल स्कुल"** ही शाळा वान्द्रा म्युनिसिपल स्कुल बोर्डच्या स्वाधीन करण्याच व तत्प्रीत्यर्थ वान्द्रा म्युनिसिपालीटी व वान्द्रा स्कुल बोर्ड यांचे आभार मानण्याचा समारंभ रविवार ता. १ डिसेम्बर १९४६ रोजीं सकाळीं ९-३० वाजतां शाळेच्या जागेंत साजरा होणार आहे. मुंबई सरकारचे अर्थमंत्रि **श्री. वैकुंठलाल मेहता,** M. L. A. यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारण्याचें कबुल केलें आहे. सदरहू समारंभास आपण अवश्य हजर रहावें अशी विनंति आहे.

कळावें लोभ असावा ही विनंति.

"गणपत निकेतन",<br>
पहिला रस्ता खार, मुंबई २१<br>
२४-११-४६

आपला स्नेहांकित,<br>
**प्रो. व्ही. जी राव.**

# दिवंगत प्रा. सदानंद वर्दे (माजी शिक्षण मंत्री)

माजी शिक्षणमंत्री दिवंगत प्रा. सदानंद वर्दे यांचा जन्म तालुका कुडाळ जिल्हा सिंधुदुर्ग या दक्षिण कोकणावतील बिबवणे नावाच्या गावी दिनांक ६ नोव्हेंबर १९२५ रोजी झाला. ते अत्यंत हुशार विद्यार्थी असल्यामुळे मुंबई इलाख्यांत ते मॅट्रीकच्या परिक्षेत सहावे आले. अर्थशास्त्र घेऊन बी. ए. ला प्रथम तर एम्. ए ला द्वितीय क्रमांकावर तीनदा बांद्रा मतदार संघातून महापालिकेत निवडून आले. सतरा वर्षे ते खऱ्या अर्थाने नगर सेवक होते. ते महापौर होणार होते. पण थोडक्यत त्यांचे ते पद हुकले आणि डॉ. गुप्ते महापौर झाले. वर्दे करणार होते तेच भाषण गुप्ते यानी केले. दोनदा ते आमदार झाले. मंत्री झाले पण पाय मात्र जमिनीवर राहिले.

साने गुरूजी आरोग्य मंदिर या संस्थेचे ते संस्थापक सदस्य होते. पुढे ते विश्वस्त झाले. सबर्बिया थियेटर पूर्वीचे बान्द्रा टॉकीज समोर असलेल्या ''कपिल वस्तू'' असे नाव या घराला देण्यात आले. इमारत ८० वर्षांहूनही जुनी! १९४३ सालापासून ही वास्तू राजकीय व सांस्कृतिक घडामोडीमुळे आणि घरांत असलेल्या मोकळ्या जागेमुळे पु. ल. देशपांडे, वसंत बापट, राम नगरकर, जळगांवकर आदि लोकांमुळे सातत्याने चर्चेत राहिले. त्याना अनुकाका या नावाने संबोधले जायचे.

संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत त्याना कारावास भोगावा लागला. गोवा मुक्ती संग्रामांतही ते होते अभ्यासू नगर सेवक म्हणून त्याना महापालिकेंत मानले जाई आणिबाणीच्या कालखंडानंतर पुरोगामी लोकशाही आघाडी सरकारमध्ये ते मंत्री झाले. त्यांच्याकडे शिक्षण, युवक कल्याण आणि क्रिडाखाते सोपविले गेले. ते कडव्या शिस्तीचे होते.

आपल्या घरावर शाळा व महाविद्यालयीन प्रवेशासाठी भेटू नये अशी सूचना त्यानी लिहीली होती व कधीही कोणाला चिठ्ठी वा पत्र दिले नाही ते राष्ट्रसेवा दलाच्या संस्कारात वाढलेले होते. त्यांच्या नेतृत्वाखालील सरकारमध्ये त्यानी शिक्षणमंत्री असतांना शिक्षकांचे पगार बँकेत जमा करण्याचा महत्वपूर्ण निर्णय घेण्यात आला. सवंग राजकारणाचा त्याना तिटकारा होता. चुकीच्या गोष्टींचा अनुनय थांबला पाहिजे आणि नंतर पूर्ण होणार नाहीत अशी आश्वासने निवडणूकीमध्ये दिली जाऊ नयेत असे त्यांचे आग्रही मत होते. मंत्री असूनही ते साधेपणाने रहात होते. मंत्रीपद गेल्यानंतर घरी जाण्यासाठी ते बसच्या रांगेत उभे होते. साधेपणाने सतत रहाणे व कार्यमग्न असणे हे त्यांचे वैशिष्टय होते. सुधन्वा या नांवाने ते लिखाण करीत असत. त्यानी खारमधील पहिल्या रस्त्याला चित्रकार एम्. व्ही. धुरंधर असे नांव दिले.

आजकाल मंत्रीपदच काय एखादे अधिकाराचे पद किंवा महामंडळाचे अध्यक्षपद मिळाले म्हणजे आपली व पुढील चार पिढ्यांची सोय करण्याकडे लोकांचा कल असतो. सदानंद वर्दे

यापैकी निश्चित नव्हते. आमदारांसाठी बांधण्यात येणाऱ्या गृहनिर्माण सोसायटीचे ते पदाधिकारी होते. यासाठी देण्यात येणाऱ्या जमिनीवरील लीज कमी व्हावी म्हणून अनेक आमदारांनी सदानंद वर्दे यांचा पाठपुरावा केला. पण आपल्या अध्यक्षपदाच्या कारकीर्दीत तसे करण्यास त्यानी ठाम नकार देऊन टाकला. एवढ्यावरच न थांबता त्या सोसायटींतील आपल्या पदाचा राजीनामा दिला. आपल्या बंगल्यावरही त्यानी सहजतेने पाणी सोडले. ते भाड्याच्या घरांतच राहिले. त्याना स्व:ताचे घर नव्हते मनांत आणले असते तर ते दहा बंगले बांधू शकले असते. पण असा भ्रष्टाचारी मार्गत्यानी आपल्या आयुष्यांत कधीही चोखाळला नाही.

२००४ मध्ये महाराष्ट्रांत भारतीय जनता पक्षाला पं. जवाहरलाल नेहरुंच्या ''डिस्कव्हरी ऑफ इंडिया'' या ग्रंथावर बंदी आणावी असे वाटू लागले. शिवाजी महाराजांच्या विषयीची या ग्रंथातली विधाने महारांजाना अपमानकारक आहेत असा शोध भाजपला लागला होता. त्याप्रकरणी प्रा. वर्दे यांनी परखडपणे सुनावले होते की, मुळांत अशी बंदीची मागणी करणे हेच शिवाजी महाराजांच्या सहिष्णुतेच्या विरोधांत आहे. क्षुद्र राजकीय हेतुसाठी इतिहास रवरवडून काढण्याच्या वृत्तीचाही त्यांनी निषेध केला.

स्वच्छ प्रतिमा, ठाम विचार असलेले प्राध्यापक वर्दे साहेब मुंबई महापालिकेवर तीनदा निवडून गेले होते. १९७८ मध्ये जनता पक्षामधून महाराष्ट्र विधान सभेवर निवडून गेले १८ जुलै १९७८ ते १७ फेब्रुवारी १९८० या कालावधीत ते पुलोंद सरकारमध्ये शिक्षण, सांस्कृतिक कार्य, युवक कल्याण आणि क्रिडा खात्याचे मंत्री होते. १९ जुलै १९८२ ते ७ जुलै १९८८ या कालावधींत ते विधान परिषदेचे कोकण पदवीधर संघाचे प्रतिनिधीत्व करीत होते. त्यांचा पराभव का झाला ?

आपल्या तत्वाशी ते एकनिष्ठ राहिले. कधीही भ्रष्ट झाले नाहीत वांद्रे स्टेशनजवळच्या मशिदीला त्यानी विरोध केला होता. ही सल अहमद झकेरियाना होती. म्हणूनच वर्दे साहेब पराभूत झाले. ते जरी प्रजासमाजवादी पक्षात होते तरीही जुने पशुवधगृह येथे राहाणारे रिपाईचे जयराम कासारे हे त्यांचे घनिष्ट मित्र होते. त्यांच्या प्रयत्नामुळे दांडा येथील बौद्ध स्मशानभूमिला पूर्वी दगडाचे कुंपण होते. त्याला ७५०००/- हजार रूपयांचे अनुदान मिळवून तारेचे कुंपण घातले गेले ते त्यांच्या आमदानीतच.

महाराष्ट्र विधानसभेमध्ये किंवा विधान भवनांत मंत्रिमंडळात विचारण्यांत येणारे जे प्रश्न असत ते सुवाच्य सुंदर अक्षरांत लिहून काढण्याचे काम मा. गोकुळ जाधव हे करीत असत. त्यांचा प्रा. वर्देसाहेब व सुधाताई या परिवाराशी घरोब्याचा संबंध होता. त्यामुळे डॉ. बाबासाहेब आंबेडकर जयंतीमध्ये, भगवान बुद्ध जयंतीमध्ये प्रा. वर्देसाहेब उदबोधक प्रबोधनात्मक मार्गदर्शन करीत असत.

वयाच्या ८१ व्या वर्षी त्याचे दु:खद निधन झाले या जगांतील घडामोडीमागे एक सर्व शक्तिमान अशी शक्ती असते. ती अदृश्य असते वगैरे कल्पना त्यानी त्याज्य मानल्या होत्या.

माती असशी मातींत मिळशी यावर त्यांचा विश्वास होता. आत्मा, पुनर्जन्म, पितरे वगैरे कल्पना त्याना अमान्य होत्या. मृत्यूनंतर कोणते ही धार्मिक विधी करावयाचे नाहीत अशी सक्त ताकीद त्यानी दिली होती. त्याप्रमाणे त्याची अमंलबजावणी ही त्यांच्या पत्नीने केली. त्यांच्या पश्चात त्यांच्या पत्नी सुधाताई वर्दे प्रसिद्ध ओडिसी नृत्यांगना झेलम परांजपे पुत्र अभिजित व नातवंडे असा परिवार आहे. सध्या त्यांचे वास्तव्य विलेपाले येथे आहे.

प्रेषक : सुधाताई वर्दे.



## बाबुराव कृष्णाजी जाधव (माजी नगरसेवक)

दि. बाबुराव जाधव या लोक नेत्याचा त्याचा जन्म दि. १५ जुलै १९२८ रोजी पाटण तालुक्यांतील ''जानुगडेवाडी या गावी झाला. त्याना सर्वजण ''नाना'' या नांवाने संबोधित असत. उच्च-नीच, गरीब-श्रीमंत असा भेदभाव त्यांच्याजवळ नव्हता. लहान असतानांच त्यानी स्वातंत्र्य आंदोलनांत सहभाग घेणे क्रांतीकारकांना मदत करणे यामुळे शाळेंत त्यांची सतत गैरहजेरी लागत असे. त्यामुळे त्यांच्या शाळा सोडल्याच्या दाखल्यावर ''शाळेंत वारंवार गैरहजर असा शेरा मारण्यात आला होता. क्रांतिसिंह नाना पाटील यांच्या पत्री सरकारमध्ये कार्यरत असलेल्या भूमिगत क्रांतीकारकांशी त्यांचा संबंध आला. त्यातूनच त्याना बालवयांतच देशस्वातंत्र्याचे बाळकडू मिळाले.

आपल्या लहान भावाचे हे कर्तत्व समजल्यानंतर वडील बंधू सावळाराम व वहिनी यांनी नाना मुंबईस आणले. त्यानंतर त्यानी वांद्रा येथील पी. ई. शाळेमध्ये अकरावी पर्यंतचे शिक्षण घेतले. आपला केस कापण्याचा पारंपारिक धंदा चालूच ठेवला. त्याना त्यांच्या नाभिक समाजाविषयी अभिमान होता. शाळेंत शिकत असतानांच नानांचा प्रा. सदानंद वर्दे प्रभाकर वैद्य, सुधा वर्दे, डॉ. वैद्य देशभक्तीने भारावलेल्या वांद्रयातील लोकांशी संबंध आला अकरावींत शाळा सोडून स्व:ताला त्यानी समाज कार्यांत झोकून दिले. राष्ट्र सेवा दलाचे सभासदत्व स्विकारून त्यानी समाजवादी पक्षांचे काम करायला सुरूवात केली.

सानेगुरुजी गुरूजी, एस्.एम्. जोशी, नानासाहेब गोरे, बॅ.नाथ पै. मधु दंडवते, मृणालताई गोरे यांच्या बरोबर त्यानी गोवा मुक्ती आंदोलनात सक्रीय सहभाग घेतला त्या वेळेस त्याना अटक होऊन सहा महिन्यांचा तुरुंगवास भोगावालागला.

१९६२ मध्ये मुंबई महापालिकेमध्ये वांद्रे विभागांतून प्रा सदानेद वर्दे नगरसेवक म्हणून निवडून आल्यानंतर ते त्यांच्या पाठीशी सावलीसारखे उभे राहिले. वांद्रयातील नागरिकांची सेवा करीत असता नाच त्यांचा दलित व बौद्ध जनतेशी संबंध आला. त्यांच्या अनेक अडचणी त्यानी आपल्या समजून त्या सोडविण्याचा प्रयत्न केला. १९७५ मध्ये स्व.इंदिरा गांधी यांनी जाहिर केलेल्या आणीबाणीच्या विरोधांत असलेल्या सरकारने धरपकड सुरू केली. आणि बाबुराव जाधव व प्रा. सदानंद वर्दे यांना वान्द्रयांतून अटक केली. व त्याना येरवडा कारागृहात १९ महिने ठेवण्यात आले. आणीबाणी संपल्यानंतर देशामधे लोकसभेच्य १९७७ साली निवडणूका घोषित करण्यात आल्या. त्यावेळी कॉंग्रेस पक्षाची मक्तेदारी संपुष्टात आली. आणि जनता दलाचे निस्वार्थी प्रतिनिधी मोठ्या प्रमाणावर लोकसभेवर निवडून आले. निवडून आल्यानंतर त्यानी ताबडतोब रेक्लेमेशन, बझार रोड, चॅपेल रोड येथील लोकांची होणारी पाण्याची गैरसोय

दूर केली. तसेच आपल्या विभागांत असलेले भाभा रूग्णालय याचा विस्तार व्हावा यासाठीही ते सतत प्रयत्नशील राहिले. दवाखान्यांत येणाऱ्या अगदी गरीबातील गरीब माणसाची चांगली सेवा केली जावी यासाठी बाबुराव नेहमी दक्ष असत. घरांतील एक व्यक्ति साक्षर झाली तर सारे घर साक्षर होईल यावर बाबुराव जाधव यांचा विश्वास होता. आणि म्हणूनच त्यानी आपल्या विभागांतील तसेच जवळपासहुन येणाऱ्या विद्यार्थ्यांना शिक्षणाची संधी उपलब्ध व्हावी म्हणून महाराष्ट्र गृहनिर्माण प्राधिकरणाकडून मोकळा प्लॉट मुंबई महानगर पालिकेने १५ लाखांचा भरणा करून आपल्या ताब्यांत घेतला. व त्या जागेवर ५६ खोल्यांची इमारत उभी केली. बोरन रोड वरील महानगर पालिकेची प्राथमिक शाळा, बझार रोड मदिना मंझील येथील उर्दु शाळा, इत्यादि सर्व शाळेच्या अडचणी श्री बाबुराव जाधव प्रा. सदानंद वर्दे तसेच शिक्षण समितीचे श्री अरूण दाभोळकर या सर्वानी महापालिकेच्या सहाय्याने दूर केल्या. घरकाम करणाऱ्या लोकांसाठी रात्र शाळा सुरु केली. तसेच दिवा बत्ती, सार्वजनिक शौचालय, अल्मेडा पार्क, वांद्रे पूर्व स्मशान भूमि, अग्नीशामक दल, बांन्द्रा तलाव इत्यादी समाजापयोगी कामे, श्री बाबुराव जाधव यानी केली अनेक सामाजिक संस्थाना महापालिके तर्फे अनुदान मिळवून देण्यात त्या संस्थाना सहाय्य केले. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांबद्दल त्याना नितांत आदर होता त्यामुळे जयंती महोत्सवांत त्यांच्या विचारांचा ते प्रचार प्रसार करीत असत.

मुंबईला सर्वांत जास्त भेडसावरणारा प्रश्न म्हणजे ''झोपडपट्टी'' या झोपडपट्टीमध्ये श्री बाबुराव जाधव यानी आणि प्रा. सदानंद वर्दे नेतृत्वाखाली वान्द्रे (प.) येथील झोपडट्टीमध्ये संडास, पाणी, रस्ते, इ. नागरी सुविधा उपलब्ध करुन दिल्या. अशा प्रकारचे चिंचवाडी, भालेकर वाडी या ठिकाणीही नागरी सुविधा मिळविण्यासाठी प्रयत्न केले. त्याचप्रमाणे 'डयुरोलो कॉनव्हेन्ट स्कूल' चिंचवाडी आवारांतील झोपडपट्टी हटवून त्या लोकांना शाळेच्या सहाय्याने हाऊसिंग सोसायटी स्थापन करून त्यांच्यासाठी माऊंटमेरीच्या मायथ्याशी घरे बांधून दिली. अशाच प्रकारचे काम माहिम येथे ''किंग कॉर्नर सोसायटी'' स्थापन करून केले आहे. तसेच सर्व सोयीनी युक्त असा बस डेपो बान्द्रा स्टेशन जवळ बाबुराव जाधव यांच्या प्रयत्नाने उभा आहे.

– ही सर्व कार्य करीत असतांना महाराष्ट्राच्या अराध्य दैवताला ते विसरले नाहीत. त्यानी वान्द्रा विभागातील नाभिक समाजाचे श्री संत सेवा विठ्ठल मंदिर वान्द्रे या ठिकाणी बांधले. हुशार व होतकरू मुलांसाठी सुसज्ज असे वसतिगृह बांधले आहे. त्यामध्ये बाबुराव जाधव यांचा सिंहाचा वाटा आहे. तसेच वान्द्रे विभागांतील जरीमरी मंदिर, राम मंदिर, जैन मंदिर नौपाडा मशिद इत्यादी विकास कामासाठी श्री बाबुराव जाधव यांनी खूप प्रयत्न केले. श्री बाबुराव जाधव हे सहा वर्षे नगर सेवक होते. त्याना स्थायी समिती, उपनगरे या समिती वर अध्यक्ष म्हणून एक वर्षाचा कायकाळ लाभला. नगर सेवक असतानाहि बाबुराव जाधव हे सकाळी ७ वाजता त्यांच्या केशकर्तनालयांत हजर असायचे. स्व:ताहि नोकराबरोबर काम करायचे. त्यांच्याकडे मदत मागण्यासाठी आलेला कधीही रिक्त हस्ताने परत गेला नाही. त्यांच्या संपूर्ण कारकीर्दीमध्ये

त्यानी पैशाची माया न कमावता लोकांची माया भरपूर कमावली गावावरून आलेल्यांना स्व:ताच्या दुकानांत रहाण्यासाठी जागा दिली. वेळ प्रसंगी स्व:ताच्या घरी त्यांना जेवायला घातले व माणुसकीचा धर्म सांभाळला त्याना आदरणीय पी. जी. खेर हे नेहमी गरीबाचा कैवारी असे संबोधून त्यांचा सन्मान करीत असत. जशी एका सफल पुरूषाच्या मागे स्त्री उभी असते तसेच बाबुराव जाधव त्यांच्यामागे त्यांची पत्नी सौ. पद्मावती उभी होती. कुंटुंबाची सर्व जबाबदारी त्यांच्या पत्नीने अगदी व्यवस्थितपणे सांभाळली आज ही त्यांचा हा व्यवसाय त्यांचा मुलगा अगदी समर्थपणे सांभाळत आहे. समाजांतील अनेक तरूणांना त्यानी नोकरीच्या अनेक ठिकाणी संधी उपलब्ध करून दिल्या. तरूण वर्ग कार्यरत यासाठी त्यानी अनेक प्रयत्न केले. त्यांच्या आयुष्यभर या नेत्याने लोकांची सेवा केली. परंतु कोणत्याच मोबदल्याची अपेक्षा केली नाही. चाळीतींल भाड्याच्या खोलीमधून त्यानी आपल्या कार्याला सुरूवात केली आणि अजुनही त्यांचा परिवार त्याच चाळींत आणि त्याच खोलींत रहात आहे. असा हा तळागाळांतील सेवा करणारा, निस्वार्थी, निस्सिम, कार्यकर्ता हृदयविकाराच्य धक्क्याने दिनांक २३ डिसेंबर २००० या दिवशी आपणा सर्वांना सोडून गेले ''अशी पोखरे ती आणिक स्मृती ठेवून जाती.

सदरहू माहिति त्यांच्या
सुपूत्राकडून प्राप्त झाली.

# पैगंबरवासी शेख चांद शेख उस्मान पटेल

पैगंबरवासी शेख चांद शेख उस्मान पटेल हे मूळचे नगर जिल्हयांतील संगमनेर येथील रहिवाशी १८७० साली उस्मान अली पटेल हे आपल्या कुटूंबिया समवेत वान्द्रे कत्तलखाना येथे रहावयास आले व तेथेच त्यानी ब्रिटीश सरकारने सुरू केलेल्या कत्तलखान्यांत गुरे कापून त्यांचे मांस ब्रिटीश सैन्याला पुरविण्याचा व्यवसाय सुरू केला. त्या बरोबरच त्यानी दख्खनी मोमीन जमात व मुस्लीमांची संस्थेची स्थापना करून त्यांच्या जमातीतील गोरगरीबांच्या अडी अडचणी सोडविण्याचा प्रयत्न सुरू केला. त्या बरोबरच गोरगरीबांना आर्थिक मदतही करू लागले. त्यांच्या ह्या सेवाभावी कार्याची दखल घेऊन तत्कालीन ब्रिटीश सरकारने साष्टी बेटाचे पोलीस पाटील म्हणून त्यांची नेमणूक केली. त्यावेळेपासून त्यांचे नाव उस्मान अली पोलीस पाटील म्हणून सर्वमुखी झाले. पुढे पाटील या शब्दाचा अपभ्रंश होऊन दख्खनी मोमीन जमातीने त्यांना पटेल ही उपाधि दिली. पुढे पटेल हेच त्यांचे आडनाव पडले उस्मान अली पटेल हे पैगंबरवासी झाल्यावर कुटूंबाची सर्व जबाबदारी शेखचांद यांच्यावर येऊन पडली. पर्यायाने वडिलांचा व्यवसायिक वारसा व समाज कार्याची जबाबदारीसुद्धा त्यांच्यावरच पडल्याने त्यानी ती समर्थपणे व निस्वार्थी वृत्तीने पार पाडली. कत्तलखान्यांतील मजूरांवर, कामगांरावर त्यावेळी प्रशासनाने अन्याय केल्यास त्याविरूद्ध शेख चांदखंबीरपणे उभे रहात. व लढा उभारीत असत त्यामुळे ते सर्व समाजामध्ये लोकप्रिय झाले.

१५ ऑगस्ट रोजी भारत देश स्वतंत्र झाला. इंग्रज भारत सोडून गेल्यावर स्लॉटर हाऊस वान्द्रे कत्तलखान्याची जबाबदारी तत्कालिन बान्द्रा म्युनिसीपालिटीकडे आली. त्यावेळी शेख चांद यानी कत्तलखान्यांतील कामगारांच्या अडी अडचणी सोडविण्यासाठी निस्वार्थी वृत्तीने सातत्याने प्रयत्न केले कामगार संघटनेचे पदाधिकारी, सदस्य हे सर्व डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे अनुयायी होते. त्यांच्या सभा, संमेलने जयंती म्हणून आंबेडकरांच्या प्रति असलेली निष्ठा त्यानी अनुभवली होती. सर्व प्रकारच्या सुखदु:खांत ते सामिल होत असत.

समाजकार्य करीत असताना ते पी. जी. खेर यांच्या सानिध्यांत आले. पी. जी. खेरानी त्यांची कृष्ण मेनन, एच, आर. गोखले यांच्याशी परिचय करून दिला. त्यानी काँग्रेस पक्षाचे सदस्यत्च स्विकारले वेळोवेळी झालेल्या लोकसभा, विधान सभा, महानगरपालिकांच्या निवडणूकीत सक्रीय सहभाग घेवून काँग्रेस उमेदवारांना सातत्याने विजयी करण्यांत मोलाचे सहकार्य केले. तशातच १९५० साली त्याना लहानसा अपघात झाल्यामुळे ते कायम स्वरुपी दृष्टिहीन झाले. एवढे मोठे संकट कोसळल्यावरही ते मनाने खचले नाहीत त्यानी त्यांची कौटूंबिक जबाबदारी, दख्खनी मोमीन समाजाची जबाबदारी व सामाजिक सेवेमध्ये खंड पडू दिला नाही. व्ही. जी.

वान्द्रेकर, पी. जी. खेर (अहमद झकेरिया) हे कत्तलखान्यांतील वरिष्ठ अधिकारीही त्याना सन्मानाने वागवीत असत. दृष्टीहीन असूनही ते काँग्रेस पक्षाच्या सर्व सभा संमेलने मेळावे यांना आवर्जुन उपस्थित रहात असत. अशा या दखनी मोमीने जमातीतील पटेलांचे, अल्पशा आजाराने दिनांक २०/४/१९८९ रोजी दु:खद निधन झाले. त्यांच्या पश्चात त्यांच्या सामाजिक कार्याचा वारसा त्यांचे पुत्र श्री शेख उस्मान पटेल आजही समर्थपणे पुढे चालवित आहेत. गेली १२० वर्षे पटेल कुटूंबिय वांद्रयांतील जुन्या कत्तलखान्याच्या महापालिका वसाहतींत वास्तव्य करून आहेत.

सदर माहिती शेख उस्मान पटेल यांच्याकडून प्राप्त झाली.

# पैगंबरवासी फतरू महमंद (अरबसाब) पहिले

यांचा जन्म चाकण येथे पुण्याजवळ झाला. पूर्वापार व्यवसाय बकऱ्यांचा खरेदी-विक्रीचा होता. त्यामुळे या समाजास बक्कर खाटिक समाज असे म्हणताम. या व्यवसायानिमित्त वांद्रे येथे स्लॉटर हाऊस येथे रहावयास आले. त्यांच्या ४-५ पिढ्या येथेच झाल्या. कसाईवाडा वांद्रे विभागांत १८८५ साला पासून सुरू झाला हे घराणे तेंव्हापासून स्थायिक झाले आहे.

या परिवाराने डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या चळवळीमध्ये साथ दिली. त्यानी पाहिले. आपल्या समाजाला अस्पृश्य म्हणून समजले जाई हिंदू लोक आपणास शिवत नसत. त्यामुळे धंद्यावर परिणाम नको. म्हणून मुसलमान ही त्याच पद्धतीची वागणूक देत असत. ख्रिस्ती लोक ही अस्पृश्य म्हणूनच वागवित असत. बाबासाहेबांचे वांद्रे विभागांत सभा होऊ लागल्या. महाडच्या चवदार तळ्याच्या सत्याग्रहाची तयारी होऊ लागली. अरबसाहेबांच्या कानांवर चर्चा येऊ लागली. त्यानी चौकशी केली हे भांडण कसले आहे. तेव्हा त्याना कळले पाण्यासाठी ते स्व:ता सभेला हजर राहिले. बाबासाहेबांच्या भाषणाचा त्यांच्यावर परिणाम झाला त्यांची बाबासाहेब आंबेडकरांवर श्रद्धा बसली. ते आपल्या समाज बांधवांना सांगू लागले ''पानी तो अल्ला की देन है। अल्ला ने सभी को बनाया है। पानी, हवा, आग यह कुदरती करिश्मा है। उस पर किसीका हक नही फिर ये हिन्दु लोग अपने ही भाईयोंयोंको पानी पिने क्यों नही देते। आखिर वह भी उनके भाई है हिंदु है। जानवरों को पानी पिने देते है और इन्सानोंको रोकते है। यह अजब है। और गलत है। एक इन्सान अपने हक के लिये लड रहा है। इन्सानोंको जगा रहा है। उनको साथ देना मेरा भी फर्ज है। मै उन्हें मदद करुंगा। या जाज्वल्य पूर्ण भावनेने त्यांचे समाजबांधव ही प्रभावित झाले. महाडच्या सत्यागंहांत सामील होणाऱ्या सर्व सत्याग्रहीना त्यानी सर्वतोपरी मदत केली.

त्यामुळे चाळीमध्ये रहात असलेल्या सर्वनागरिकांनी त्यानी मदत केली. सर्व कार्यक्रमांमध्ये आर्थिक मदत, वीज पुरवठा, बाकड्यांचा बसण्यासाठी पुरवठा ते करीत असत. नगरसेवक रामचंद्र अर्जुन भोसेकर हे त्यांचे जिवलग मित्र होते. त्यांच्यामुळे अनेक लोकांना मटणाच्या दुकानाचे परवाने मिळत असत.

सर्व मुंबईत जातीय दंगली भडकल्या तरी कधीही मुस्लीम समाजाने आंबेडकरी समाज बांधवांना इजा केली नाही. बंधु भावाच्या राहाणीमानामुळे आंबेडकरी समाजाने मुस्लीम समाजाचे संरक्षण केले आहे व मुस्लीम समाजाने आंबेडकरी समाजाचे संरक्षण केले आहे. वयाच्या ७० वर्षी वार्धाक्यामुळे अरबसाब यांचे निधन झाले. त्यांच्या पश्चात त्यांचे सुपूत्र शकील अहमद, नौशाद अली, रियाज अहमद, रिझवान अहमद; नूर महमद (अरब) ही मंडळी ह्यात आहेत व आपल्या पित्याचा वारसा आजही त्याच मानवतेने सांभाळत आहेत. वरील माहिती त्यांच्या कुटूंबियांनी दिली आहे.

# दिवंगत प्रा. एन्. के. भागवत

प्राध्यापक एन्. के. भागवत यांचे संपूर्ण नाव प्रा. नारायण केशव भागवत हे खार पश्चिम १५ वा रस्ता येथे रहात होते. ते रहात असलेल्या स्वतंत्र बंगल्याचे नाव ''सुगत'' असे होते. प्रा. भागवत हे पाली भाषेचे विद्वान होते. भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी १९४६ साली सिद्धार्थ महाविद्यालयाची स्थापना केल्यानंतर प्रा. भागवतांना सिद्धार्थ महाविद्यालयात आणले. या करिता त्यानी आपल्या आधीच्या नोकरीचा राजीनामा दिला होता. त्यामुळे सिद्धार्थ महाविद्यालयाचे ही महत्व वाढले.

प्रा. एन. के. भागवत आपल्या साध्या, सरळ मधुर वाणीने शिकविण्याच्या पद्धतीने अत्यंत लोकप्रिय झाले. वांद्रे विभागांत कोकणस्थ कॉलनींत पहिले बुद्ध विहार झाले. त्या बुद्ध विहारामध्ये दैनंदिन बुद्ध वंदना आणि त्याचा अर्थ ते लोकांना शिकवू लागले. त्यामुळे त्यांच्या ब्राह्मण समाजांतील लोक त्यांच्यावर रूष्ट झाले. त्यानी त्यांच्यावर सामाजिक बहिष्कार टाकला परंतु प्राध्यापक भागवत त्याना नमले नाहीत. त्यानी आपले कार्य सुरूच ठेवले.

बाबासाहेबांच्या कार्यावर त्यांची ठाम श्रद्धा होती. हे तर ज्ञान दानाचे आणि पुण्याचे काम आहे असे ते पदोपदी जातीयवाद्यांना पटवून देण्याचे प्रयत्न सातत्याने करीत होते. परंतु अस्पृश्यता पाळणाऱ्यांना ते समजणे शक्य नव्हते. या व्ददांतच प्रा.एन्.के भागवत अमर झाले. बाबासाहेबांच्या मानव मुक्तीच्या कार्यात सहभाग देणारे.

# दिवंगत सिनेनट नायम पल्ली

दिवंगत नायमपल्ली हे खार १७ वा रस्ता पश्चिम येथे रहात होते. त्यांच्या बंगल्याचे नाव ''कल्याण'' असे होते. त्यांची एक सुकन्या कल्याणी या नावाची होती. त्यांना संगीताची अत्यंत आवड होती.

नायमपल्ली हे सिनेक्षेत्रांत कार्यरत होते त्यानी मराठी, हिंदी अशा अनेक चित्रपटांत महत्वाच्या भूमिका केल्या होत्या. या पेक्षाही सामाजिक, शैक्षणिक कार्याची त्याना आवड होती. भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या जयंतीमध्ये त्याना प्रमुख पाहुणे या नात्याने बोलावत असत.

नायमपल्ली हे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या कार्याने, विचाराने प्रेरित झालेले होते त्यामुळे श्रोत्याना आपल्या वकृत्वाने खिळवून टाकीत असत. तसेच विद्यार्थ्यांना आर्थिक शैक्षणिक मदत देत असत. बाबासाहेब आंबेडकरावर त्यांनी निष्ठा असल्याने त्यांच्या विचारांचा ते प्रसार करीत असत. निसर्ग नियमाप्रमाणे त्यांचे अकाली निधन झाले. त्यांच्या मागे दोन पुत्र एक कन्या सुप्रसिद्ध शास्त्रोस्त्र संगीत विशारद आहे. आता कल्याण या स्वतंत्र बंगल्यावर अलिशान टावर उभा आहे व त्याचे नाव असे आहे. नायमपल्ली यांच्या सतकार्याच्या व मागासवर्गीयासाठी असणारी तळमळ प्रेम यांच्या स्मृति आजही जपत आहे!

## व्ही. जी. वांद्रेकर

दिवंगत व्ही. जी. वांद्रेकर हे खार पश्चिम येथील प्रसिद्ध असणाऱ्या ''मधुपार्क'' या उद्यान शेजारी असणाऱ्या १० व्या रस्त्यावर रहात असते. ते काँग्रेस पक्षाचे कार्यरत असलेले वांद्रे विभागांतील प्रमुख कार्यवाह होते. पांढरे शुभ्र बुशशर्ट, पांढरी पँन्ट, गांधी टोपी व हातामध्ये ब्रीफकेस असा त्यांचा पेहराव असे. गौरवर्णामुळे व हसतमुख प्रसन्न अशा व्यक्तिमत्वामुळे त्यांची छाप पडत असे.

कोकणस्थ कॉलनी आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर कॉलनीतील तत्कालीन मान्यवरांशी त्यांचा घनिष्ठ संबंध होता. बाबासाहेब आंबेडकरांवर त्यांची निष्ठा होती. त्यांचे आचार विचार त्याना पटलेले होते त्यामुळे आंबेडकरी चळवळीतींल किंवा आंबेडकरी अनुयायी त्यांच्याकडे कुठलेही काम घेऊन गेला तरी ते त्याला योग्य सल्ला आणि मार्गदर्शन करीत असत व त्यांची कामेही विनाविलंब करीत असते.

डॉ. आंबेडकर सोसायटीवर काही काळ त्यानी प्रशासक म्हणून काम केले आहे. वांद्रे विभागात होणाऱ्या जयंती, सभा आदि कार्यक्रमांत ते प्रामुख्याने उपस्थित रहात असत. बाबासोहबांनी पुकारलेल्या अस्पृश्यते विरोधी लढ्यात आणि समतेच्या पुरस्कारांत व्ही. जी. वांद्रेकर साहेबानी महत्वाचे योगदान दिले आहे.

# आचार्य मो. वा. दोंदे

आचार्य मो. वा. दोंदे हे विठ्ठलभाई पटेल रोड आताचा (लिंकीग रोड) या नांवाने प्रसिद्ध असलेल्या रस्त्यावर कनैया या नांवाच्या या बंगल्यांत रहात होते. वांद्रे विभागांतील असल्यामुळे त्याना परिसराची माहिती मुबलक प्रमाणात होती डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी पिपल्स एज्युकेशन सोसायटी स्थापन केली. त्या सोसायटीचे, सिद्धार्थ महाविद्यालयाचे त्यावेळी या संस्थेचे अध्यक्ष होते. आयार्च आमदार मो. वा. दोंदे यांना प्रत्यक्ष बाबासाहेबांचा सहवास लाभला होता.

१९४६ पासून सकाळचे वर्ग भरविणारे सिद्धार्थ महाविद्यालय सुरू केले. सिद्धार्थ कॉलेजाच्या प्रगतिसाठी तेव्हांचे प्राचार्य डॉ. हेमंत कर्णिक यांच्याबरोबर वरच्यावर बैठका होत असत. सिद्धार्थ कॉलेजमुळे वंचित विद्यार्थ्यांना शिक्षणाची दारे उघडली. परंतु मुंबई विद्यापीठाने महाविद्यालयाचे सकाळचे वर्ग रद्द करण्याचा निर्णय घोषित केला विद्यापीठाने आपली भूमिका बदलावी म्हणून अनेकांनी प्रयत्न केले परंतु खास प्रयत्न केले त्यामुळे सिद्धार्थ कॉलेजने शिक्षण क्षेत्राला नवी दिशा दिली.

मा. मो. वा. दोंदे साहेब यांचा अनेक संस्थेशी संबंध व परिचय होता. ते मुंबई शहराचे महापौर असतांना मुंबईच्या शेरीफानी नागरिकांची बैठक बोलावून बाबासाहेबांचा पुतळा बसविण्याचे ठरविले. या कामाकरितां भय्या साहेबांनी जमविलेल्या समाजाच्या निधीतून १७ हजार रूपये जमा करण्यात आले होते. त्यांचे पुत्र अरूण दोंदे हे देखील आपल्या पित्याचा वारसा या परिसरांत जपून होते. त्यांची पत्नीही डॉ. बाबासाहेब आंबेडकर मजूर मंत्री झाले असतांना महिलामंडळाचे शिष्टमंडळ राजगृहावर भेटण्यास गेले होते. त्यांत पहिल्या महिला मंडळाच्या अध्यक्षा सखुबाई मोहिते उपाध्यक्षा मुक्ताबाई कांबळे आदि होत्या. तात्पर्य डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या समाज कार्यांत पती, पत्नी व पुत्र असलेले मो. वा. दोंदे यांचा परिवार धन्य होय.



## दिवंगत मा. पी. जी. खेर

मुंबई इलाख्याचे पहिले मुख्यमंत्री मा. बाळ गंगाधर खेर यांचे पी. जी. खेर हे बंधू होत. पुरूषोत्तम हे त्यांचे नाव ते काँग्रेस पक्षाचे जेष्ठ आणि श्रेष्ठ असे वांद्रयातील कार्यकर्ते होते. वांद्रे पोलीस ठाण्याच्या समोरच्या इमारतींत त्यांचे कार्यालय आणि घर होते.

वांद्रे विभागातील डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या चळवळीतील अनेक मान्यवरांशी त्यांचा प्रत्यक्ष संबंध होता. अन्य धर्मीयांशी ही होता त्यामुळे कार्यकर्त्यांची नेहमी वर्दळ त्यांच्या निवास स्थानी असे सरकारी, निमसरकारी संघटनामध्ये त्याना मानाचे स्थान असे. आपल्या विद्वता प्रचूर वाणीने, आणि सदाचरणयुक्त आचरणाने त्यांचा दबदबा होता.

मागासवर्गीयांच्या उन्नतीसाठी सहकारी तत्वावर गृहनिर्माण संस्था मधून सरकारी योजनेप्रमाणे डॉ. आंबेडकर सोसायटीतील१ ३१ सभासदांसाठी गृहनिर्माण योजना राबविली त्यापैकी ५१ सभासदांसाठी पक्की घरे १९५५ मध्ये बांधण्यात आली. त्या योजनेमध्ये ए. बी. व सी टायप असे प्रकार होते. त्यांच्याच सहभागाने ही योनजा प्रत्यक्षांत अमलात आली.

बाबासाहेब आंबेडकरांच्या संस्था, महाविद्यालये, सामाजिक, राजकीय, धार्मिक अशा सर्व प्रकारच्या तत्कालीन काम काजामध्ये पी. जी. खेर साहेबानी महत्वपूर्ण योगदान दिले आहे.

आचार्य कृपलानी, कायदेमंत्री एच्. आर. गोखले हंस भुग्रा, बधेका, महापौर एस. आर. पाटकर, खासदार जगेश देसाई, डॉ. प्रभाकर पै आदि काँग्रेस जनांना नांवारूपास आणण्यामध्ये त्यांचा महत्वपूर्ण वाटा होता. मुंबई इलाख्याचे पहिले मुख्य मंत्री आपले बंधू बी. जी. खेर साहेब यांच्या नांवावरून खेरवाडी ही पूर्व वांद्रयांत वसाहत अस्तित्वांत आली. तिचे जनक पी. जी. खेरसाहेब हेच होते. त्याचप्रमाणे वरळी नाक्याच्या मागे पश्चिमेस पूर्वीची कोका कोला कंपनी पुढे बी. जी. खेर नांवाचा रस्ता ही आहे अशा कर्तव्यदक्ष, निस्वार्थी आदर्श कार्यकर्त्यांचे वार्धक्यामुळे निसर्ग नियमाप्रमाणे निधन झाले.

# दिवंगत डॉ. मुकुंदराव रामराव जयकर

मुकुंदराव जयकर यांचा जन्म १३ नोव्हेंबर १८७३ रोजी मुंबईत झाला. त्यांचे शिक्षण एलफिन्सटन हायस्कूल व सेंट झेवियर्स कॉलेजात झाले. ते अतिशय बुद्धिमान विद्यार्थी म्हणून ओळखले जात. त्यानी गव्हर्मेंट लॉ कॉलेजमध्ये एल. एल. बी. करतानांच एलफिन्सटन कॉलेजमध्ये संस्कृत व इंग्रजी विषय घेऊन एम. ए. ला प्रवेश घेतला. त्यानी एम. ए. एल. एल. बी. ही पदवी एकाच वेळी संपादन केली. मुंबई उच्च न्यायालयांत ते वकिली करू लागले. १९३७ साली फेडरल कोर्ट ऑफइंडियाचे जज म्हणून सरकारने त्यांचा नियुक्ती केली. २४ साली त्यानी या पदाचा राजीनाम दिला. १९३७-३८ साली मुंबईत भरलेल्या मराठी साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते. पुणे जिल्हा परिषदेचे अध्यक्ष म्हणून २६ जानेवारी १९१८ रोजी लोणावळा येथे त्यानी पहिले राजकीय भाषण केले. कलकत्ता मुंबई व कानपूर येथे झालेल्या काँग्रेस अधिवेशनांतील त्यांची भाषणे गाजली. १९३० ते ३१ दरम्यान लंडन येथे पार पडलेल्या तिन्ही गोलमेज परिषदेत ते सदस्य म्हणून सहभागी होते. गांधी आयर्विन करार व गांधी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्यातील पूणे करार घडवून आणण्यांत जयकरांची भूमिका अतिशय मोलाची होती. बाबासाहेबांच्या सुवर्ण महोत्सवी सभेचे अध्यक्षपदी जयकरच असावेत असे म्हणून आर. आर. भोळे, तानाजी महादेव गुडेकर, केशव गोविंद आड्रेकर, आणि संभाजी तुकाराम गायकवाड जयकरांकडे जाऊन बसले. तसा त्यानी आग्रह केला. जयकरांनी त्यांच्या विनंतीचा अव्हेर केला नाही. त्यानी कार्यक्रमाच्या अध्यक्षपदी असण्याला मान्यता दिली. १९ एप्रिल १९४२ रोजी मुंबईत चौपाटीवर झालेल्या डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या सुवर्ण महोत्सवी सभेचे अध्यक्ष जयकरच होते. त्यानी घटना समितीवरही काम केले. काही काळ प्रोफेसर, प्रिन्सपल म्हणूनहि त्यानी काम पाहिले. विख्यात घटना शास्त्रज्ञ प्रभावी वक्ते पुणे विद्यापीठाचे संस्था पक व पहिले कुलगुरू असलेल्या जयकरांचे निधन मुंबईत १० मार्च १९५९ रोजी झाले.

## दिवंगत दानशूर मिसेस मेहरबानू झाबवाला

मिसेस झाबवाला या खार मधील सातव्या रस्त्यावर असलेल्या पोस्ट ऑफिस पासून पूर्वेस चौथ्या इमारतींत रहायच्या. त्या पारशी समाजाच्या होत्या. आपल्या समाजाला मुस्लीम, ख्रिश्चन, हिंदू समाज जेव्हा अस्पृश्यतेची वागणूक देत होता त्यावेळी झाबवाला पती पत्नींचे मानवतेचे कार्य फारच उठून दिसणारे होते.

त्या स्व:ता काँगेस पक्षात होत्या. १९३८ पूर्वी जेव्हा (शिर्के असगोलकर) नगर सेवक नव्हते तेव्हा त्या नगरसेवक म्हणून निवडून येत होत्या. त्याना कोणी प्रतिस्पर्धीच नव्हते. शिवाय त्यांच्याकडे संपत्ती देखील विपुल प्रमाणावर होती.

त्यांचे पती मात्र कट्टर कम्युनिस्ट पार्टीचे होते पण आपल्या पत्नी प्रमाणेच तेही दानशूर होते त्यांच्या ठायी ही मानवसेवा ओत प्रोत भरलेली होती. त्यांच्या बाबत असे सांगितले जाते की, रस्त्यांत जर कोणी गरीब किंवा भिकारी दिसला तर अंगावरील असलेले किंमती कपडे ते त्या माणसाला दान करून बंडी व चड्डीवरच घरी जात असत. बॅरिस्टर असलेल्या माणसामध्ये इतका कनवाळूपणा क्वचितच दिसून येतो. कारवेमध्ये मात्र हायकोर्टाच्या केसचे पेपर्स असायचे. व स्वारी तशीच घरी जायची.

२० वा रस्ता खार पश्चिम आताची आनंद विहार को. ऑ. हा. सोसायटी येथे असलेली विहीर बुजविण्यांत आली आहे. जी टाकाची बावडी म्हणून प्रसिद्ध होती. ती झाबवाला दांपत्याने दलितांसाठी निर्माण केली होती. ती खोदून चौकोनी स्वरूपांत बांधणे म्हणजे मोठे खर्चाचे काम होते. पण बाबासाहेबांच्या कार्याबद्दल त्याना जिव्हाळा व प्रेम होते. त्यामुळे त्यानी ते केले. बारा पारवाड्यांत होणाऱ्या बाबासाहेबांच्या जयंतीमध्ये प्रमुख पाहुणे हे दांपत्य असे. रिकाम्या हाताने न जाता आर्थिक दान देऊनच जात असत. बाबासाहेबांप्रमाणे शिक्षण घेऊन ज्ञानी बना असा उपदेश करीत असत. त्याना जातिभेद अजिबात मान्य नव्हता.

खारमध्ये पाठारे प्रभु, सी. के. पी. पांचकळशी आदि उच्च वर्णीयांची वस्ती आहे आंबेडकरी समाजावर ममतेचे छत्र मात्र झाबवालांचेच होते हे विशेष होय.

खार रेल्वे स्थानकाजवळ असणाऱ्या बस थांब्याच्या वर्तुळाकार सेवेच्या मध्यावर झाबवाला चौक महापालिकेच्या संमतीने बनविण्यांत आला होता. व त्यांची स्मृती अजरामर होती. खारमधील जनतेला किंवा महापालिकेला त्यांचे कार्य महत्वाचे वाटले नाही म्हणून की काय त्या जागी दयावंती टिकमदास चौकनिर्माण झाला. एकदा एक चौक किंवा रस्ता झाला असता दुसरे नाव दिले जात नाही. दुसरी जागा नक्की करावी लागते. हा नियम धाब्यावर बसवून ज्यानी आयुष्य भर सातत्याने अस्पृयश्तेचा विरोध केला त्याना मात्र मुंबई महापालिकेने अस्पृश्य ठरविले याचा खेद वाटतो.

# दिवंगत अंबूताई धुरंधर

## (एक समर्पित जीवन)

प्रसिद्ध चित्रकार एम्. व्ही. धुरंधर म्हणजेच (महादेव विश्वनाथ धुरंधर १८७१-ते १९४४) यांच्या ह्या कन्या आपल्या वडिलांकडून चित्रकलेचा वारसा घेऊन त्यानी तो छंद जोपासला. खार पश्चिम येथील लिंकीग रोडवर जून्या धाटणीचे एक प्रशस्त असे घर होते. हजारो पेन्सिल, क्रेयॉन, निसर्गचित्र, वस्तू चित्रे, शिल्पकला आदिंचा प्रचंड साठा या घरांत जपून ठेवला होता. व ती कला सातत्याने पुढे चालत रहावी म्हणून त्या वास्तूला अंबा सदन असे नाव दिले होते. वास्तूचे नाव अंबा सदन व अंबिका धुरंधर हे एकमेव ''धुरंधर चित्र कला मंदिर'' या नावाने प्रसिद्ध होते.

प्रवेशद्वाराने आत आल्याबरोबर सभा गृहातच कोल्हापूरच्या करवीर निवासिनी अंबिका देवीचे एक भित्तीचित्र होते. तसेच सिलींगवर आकाशगंगा आणि स्वर्ग लोकाचा देखावा होता. आजन्म विवाहीत राहून त्यानी आपले जीवन कलेला वाहून घेतले होते.

अंबूताई मला भावल्या त्या वेगळ्याअर्थानि मला धुरंधर कला मंदिरमध्ये प्रवेश कसा मिळाला ? नवी शेरली विभागांत १९६० च्या कालखंडामध्ये रात्र शाळेचे वर्ग चालत असत इयत्ता ४ थी ते ७ वी पर्यंत होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकर जयंतीमध्ये प्रमुख पाहुणे रावसाहेब आणि अंबू ताईना बोलविण्यात आले होते. लोकसत्ता या दैनिकामध्ये आलेला डॉ. बाबासाहेब आंबेडकरांवरील एक उत्कृष्ट लेख मी पाठांतर केलेला होता. माझ्या जीवनात प्रथमच मी ध्वनिक्षेपका समोर उभा राहिलो आणि पाय लटपटू लागले. जनसमुदाय मोठा होता. माझ्या वक्तृत्व करण्याच्या पद्धतीने कमालीची शांतता पसरली अनेक स्पर्धक होते पण माझा प्रथम क्रमांक आला. रावसाहेबांच्या हातून मला पारितोषिक मिळाले. अंबुताईनी जाहीर केले माझ्या धुरंधर कला मंदिरमध्ये मी दोन विद्यार्थ्यांना मोफत ड्रॉईंग पेंटिगचे शिक्षण देईन आणि त्यानी आपले बोल खरे करून दाखविले परंतु दुर्देवाने एस. एस. सी. पास नसल्यामुळे मला पुढील शिक्षण घेता आले नाही.

समाजवादी विचार सरणीच्या लोकांचे ''कपिलवस्तू'' हे जसे आश्रयस्थान प्रा. सदानंद वर्देंचे निवास स्थान होते, जेथे पु. ल. देशपांडे वसंत बापट, मृणाल गोरे, अहिल्या रांगणेकर, आदि मंडळी जमत असत. संयुक्त महाराष्ट्राचा लढा असो की गोव्याचा मुक्ति संग्रामातील सहभाग असो अंबिकाताईच्या धुरंधर कला मंदिर अहिल्या रांगणेकर ''लाटणी'' आणि मृणाल गोरे ''पाणीवाली बाई यांचा राबता असायचा हे फार थोडया लोकांना माहित आहे.

संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्याला बाबासाहेबांचे मार्गदर्शन होते. ही गुप्त बातमी अंबूताईना माहित होती. म्हणून त्यांना डॉ. बाबासाहेबांबद्दल नितांत आदर होता. आणि रावसाहेबांच्या या समाजांतील सहभागाबद्दल ही त्यांना माहिती होती.

धुरंधर आर्ट गॅलरी करिता अंबूताईनी महाराष्ट्र शासनाकडे (निलगीरी उपवन आणि हिंदू असोसिएशन असलेली जागा मागितली होती. दिवंगत आयार्च अत्रे यांची एक कन्या मीनाताई या भाभा रुग्णालयाच्या मागे अल्मेडा पार्क येथे आणि शिरीष पै या शिवाजी पार्क येथे रहात होत्या. अंबू ताईचा त्यांच्याशीही परिचय होता. त्या धामधुमीच्या काळांत अंबूताई मला पत्रे घेऊन त्यांच्याकडे पाठवित असत. तसेच आचार्य अत्रेंकडे शिवशक्तिमध्ये मराठाही प्रेस होती. तिथे ही पाठवित असत. धुरंधर आर्ट गॅलरी करिता अंबूताईनी प्रा. मधुकर तोरडमलांचे ''भोवरा''''अश्रूंची झाली फुले'' ''फुलाला सुगंध मातीचा'' आदि नाटकांचे प्रयोग या कार्यक्रमाकरिता झाले. परंतु तत्कालिन महाराष्ट्र शासनाने या साठयाची व्यवस्था केली नाही. त्यातल्यात्यात समाधानाची बाब म्हणजे दिवंगत प्रा. सदानंद वर्दे साहेबांनी खारदांडा मार्गाला चित्रकार धुरंधर मार्ग असे नाव देऊन त्यांची स्मृति अमर केलेली आहे. प्रसिद्धीच्या प्रकाश झोतांत न रहातां कलेसाठी साध्वीचे जीवन जगणाऱ्या अंबिका धुरंधर यांच्या स्मृतीला विनम्र अभिवादन!



शेड्युल्ड कास्ट फेडरेशनच्या तिकिटावर निवडून आलेले विजयी उमेदवार दिवंगत टी. टी. शिर्के व ना. भि. असगोलकर यांच्या वांद्रयातील विजय सभेत डॉ. बाबासाहेब आंबेडकर

# डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे मोटारगाडी चालक

## दिवगंत जयराम विठ्ठल माने.

यांचे रायगड जिल्हा; माणगांव तालुका ; मुं. गांव लोणरे हे होय. त्यांचे वडील दि.विठ्ठल माने हे जुन्या पिढीतील होते. बाबासाहेबांनी सिद्धार्थ महाविद्यालयाची स्थापना केली आणि गोरगरीब जनतेसाठी शिक्षणाचे दरवाजे खुले झाले. मिलींद महाविद्यालयाची औरंगाबाद येथे स्थापना झाली. त्या काळात बाबासाहेबाच्या मोटारीचे चालक म्हणून जयराम विठ्ठल माने हे सेवारत होते. बाबासाहेबांचा सहवास त्यांना लाभला. त्यांचे जीवन जवळून पाहिले, अनुभवले; अगदी मृत्युपर्यंत त्यांनी बाबासाहेबांची साथ सोडली नाही. प्राचार्य म.वा.दोंदे, कमलाकर चित्रे, सुरबा टिपणीस आदिचेही बाबासाहेबाबरोबर त्यांना सानिध्य लाभले.

कोकणस्थ कॉलनी खार पश्चिम येथे जयराम माने यांना घरकुल मिळाले. त्यांना वसंत, दिपक, प्रकाश व सदानंद असे पुत्र. यापैकी प्रकाश माने व ममता (कन्या) ह्यात नाहीत. दिवगंत जयराम माने यांच्या खार कोकणस्थ कॉलनींतील जागेतही बाबासाहेबांच्या पायाची पवित्र पायधुळ पडली आणि ती जागाही पवित्र झाली. बाबासाहेबाना सुक्या बोंबलाची चटणी आणि नाचणीची भाकरी फार आवडायची माने बाबांची पत्नी मातोश्री भीमा बाई ह्या ती बनवत असत. आणि दुपारच्या जेवणाचा सिद्धार्थ महाविद्यालयात डबा जात असे. बाबासाहेब जयराम माने बरोबर मिटक्या मारीत भोजन उरकायचे. तारीफ करायचे. जेवणाचा हा डबा त्यांचे थोरले चिरंजीव वसंत माने व मोठी बहीण पोहचवायची.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे समग्र जीवन म्हणजे घनघोर संघर्ष. । नव्हे धगधगते अग्नीकुंड !! ते स्व:तासाठी फारसे जगलेच नाहीत. त्यांचे अर्धे आयुष्य विद्यार्जनांत गेले उरलेले आयुष्य पिडीत समाजाच्या सेवेसाठी, धम्मसेवेसाठी, राष्ट्रसेवेसाठी आर्पित झाले. स्वतंत्र भारताची राज्यघटना त्यांनी लिहिली. जगाच्या अंतापर्यंत घटनाकार म्हणून त्यांचे नाव अजरामर राहिल, बाबासाहेब आंबेडकर एक व्यक्ती नव्हती. ती आमची शक्ती होती. मानवाला केंद्रबिंदू मानून जो सेवा करतो तोच खरा महात्मा ठरतो. सदाचरण ही एक ऐरण आहे या ऐरणीवर अभेद्य राहून जो घणाचे घाव सोसतो त्यालाच सारे जग मस्तकी हिरा म्हणून धारण करते. त्यामुळेच विश्वात ते मान्यता पावले. जगाच्या पाठीवर शांतीचा संदेश देणारा असा एकच धम्म आहे तो म्हणजे बौद्ध धम्म होय. या धम्माची त्यानी दिक्षा घेतली. व आपल्या लाखो अनुयायांनाही दिली. प्रज्ञा, सुर्याच्या तेजाने माने बाबांचे जीवनही परिष्कृत झाले. त्या सोहळ्यांचे ते साक्षीदार ठरले. दिपस्तंभाला

आधार देण्याचे महत्त्वपूर्ण पूण्य कर्म त्यांच्या हातून घडले. मिलिंद महाविद्यालयाची इमारत उभी राहताना डॉ. बाबासाहेब आंबेडकरांसोबतचा फोटो त्यांच्या घरातील भिंतीवर लावलेला आहे. तो पाहताच आपले मस्तक विन्रमपणे झुकते.

आणि तो काळा दिवस उजाडला ६ डिसेंबर १९५६ सालातला. दिल्ली मुक्कामी बाबासाहेबांचे महापरिनिर्वाण झाले. सारा देश शोकाकुल झाला. हजारो लोकांनी बाबासाहेबांचे दर्शन घेतले. अखेर बाबासाहेबांचे पार्थिव मुंबईत आणले गेले. आचार्य अत्रेनी नवयुगाचा अंक काढला. त्यांच्या विद्ववत्तापूर्ण वाणीने अवघा महाराष्ट्र हळहळला. राजगृहातून निघालेल्या अंत्ययात्रेतील शववाहिनी चालविण्याचे काम ही जयराम माने यानी केले. दादर चैत्यभूमीवर लाखो लोकाच्या साश्रून नयनातून ओघाळलेल्या अश्रूंना साक्ष ठेवून अंत्य विधी पार पडला. जगाच्या पाठीवर गरीबांसाठी तळपणारा तेजस्वी तारा अस्त पावला. आणि सारा हिंदुस्तान अंधारात बुडाला. आयुष्य एकदाच जगले जाते. सत्कर्माने मिळविलेली किर्ती मात्र अमर राहते. बाबासाहेब अमर झाले.

पुढील २३ वर्षांनी म्हणजे १६ मे १९७९ रोजी मुंबईतील बाबासाहेबांचे एकनिष्ठ अनुयायी गाडीचालक जयराम विठ्ठल माने यांची प्राण ज्योत मालवली. ते नेहमी म्हणत असत ''माणूसकी लाथाडून जिवंत राहण्यापेक्षा माणूसकीचे रक्षण करता-करता मृत्यू आल्यास तो आनंददायी ठरतो''. केवढीही ही वैचारिक प्रगल्भता! बाबासाहेब मुंबईत आले की, त्यांच्या गाडीचे चालक असायचे. जयराम माने बाबा. त्यांच्याविना दुसरा चालक नसे. गाडीचे चालक पद सांभाळत असताना नकळत सामाजिक कार्याचे धडेही गिरवू लागले. गुलामगिरी नष्ट करावयाची असेल तर, माणूस खऱ्या अर्थाने माणूस व्हावा लागतो.

कुटूंब विस्तारास्तव माने बाबांचे जेष्ठ सुपूत्र वसंत माने हे मालवणी येथे राहतात. एअर इंडियाच्या सेवेतून ते निवृत्त झाले आहेत. माननीय दिपक माने हे सिद्धार्थ महाविद्यालयात नोकरी (सेवा) करीत आहे. समाजाच्या समस्या सोडविण्यासाठी ते धावून जातात. सदानंद माने हे देखील इंडियन एअर लाईन्सच्या सेवेतून सेवानिवृत्त झाले आहेत. आई-वडील अशिक्षित असले तरी, माने परिवाराला विद्येचे महत्त्व कळले आहे त्यामुळे ते सामाजिक कार्यात अग्रेसर आहेत. मा. दिपक माने हे नालंदा बुद्ध विहार कमिटी, बौद्ध स्मशान भूमी कमिटी (चिटणीस), बौ.पं. स. शाखा क्र. १४८, विद्यार्थी गुणगौरव समितीमध्ये विविध पदावर कार्यरत आहे. माने बाबांच्या स्मृतिस विन्रम भावे अभिवादन!

# निवेदन

## बंधू आणि भगिनानो,

श्रावस्ती सांस्कृतिक मंच या संस्थेचा सविनय जयभिम!

आज आमचा आनंद गगनात मावेनासा झाला आहे. जीवन कृतार्थ झाले आहे. कारण समाज आपणास काय देतो त्यापेक्षा आपण समाजास काय देतो हे महत्वाचे आहे. ज्या समाजात आपण जन्म घेतो त्या समाजाच्या ऋणातून मुक्त होणे हे अवश्य असते सेवा जिद्द चिकाटी, निस्वार्थ, त्याग ही विविध अंगे समाज सेवेची आहेत. आयुष्याच्या लढाईत आपल्याला वीर योद्धा बनून लढावे लागते. यश अपयश हे कतृत्व नेतृत्व यावर अवलंबून असते. ध्येय आधी ठरवावे लागते व त्याला अनुसरूनच कार्य केल्यास ध्येय सिद्धी होते असे ध्येय श्रावस्ती सांस्कृतिक संस्थेने ठरविले व अशक्य वाटणारे पवित्र कार्य शक्य करून दाखविले त्याची ही यशोगाथा भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा अर्धाकति ब्राँझ धातुचा पुतळर येथेच का? त्याची ऐतिहासिक कारणे:-

१. आजची बौ. पं. स. मुंबई व पूर्वाश्रणीचे नाव ''महार ज्ञाती पंचायत'' या संस्थेची स्थापना २५ मे १९४१ साली के. एम्. कॉलनी येथे बाबासाहेबांच्या उपस्थितीत झाली.

२. वांद्रे म्युनिसीपालिटित १९३८-४१ साली या समाजाचे चार नगर सेवक असताना पाली नाका ते दांडा या रस्त्याला डॉ. आंबेडकर रोड हे नाव दिले सर्व महाराष्ट्रांत व मुंबईतील बाबासाहेबांच्या ह्यातील उभारलेले हे पहिले स्मारक होय.

३. महाराष्ट्रातील मागास वर्गीयांचया पहिल्या दोन सोसायट्या के. एम्. कॉलनी व डॉ. आंबेडकर कॉलनी येथे आहेत.

४. बाबासाहेबांचे सुपूत्र भय्या सोहब आंबेडकर व पुतणे मुकुंदराव आंबेडकर यांची निवासस्थाने १९ व्या रस्त्यावर आहेत या निवास स्थानाच्या उद्घाटनास महापरिनिर्वाणापूर्वी डॉ. बाबासाहेब आंबेडकर स्वत:हजर होते.

५. या परिसरांत १२ गांवठाणे आहेत ज्यामध्ये ऐक्य होते त्यामुळे हा परिसर ''बालेकिल्ला'' म्हणून संबोधला जात असे व ''बारा'' पाखाड्या असे ही म्हणत. येथूनच कार्याची मुहुर्तमेढ रोवली गेली.

६. या परिसरांत बाबासाहेबांचे निष्ठावंत अनुयायी बहुसंख्येने रहातात व बाबासाहेबांच्या पदस्पर्शाने पावन झालेली ही पवित्र भूमि आहे. यामुळे हे स्थान आगळेवेगळे व खास

वैशिष्टये असलेले आहे. उपनगरवासियांच्या दृष्टिने येथे स्मारक होणे ही काळाची गरज आहे. ४५ वर्षापूर्वी एक स्मारक नगरसेवकांच्या हातून घडले. इतिहासाची पुनरावृत्ती होते जे लोक इतिहास विसरतात. ते इतिहास निर्माण करू शकत नाहीत. ४५ वर्षानंतर नवनिर्माणाचा इतिहास घडत आहे याची दक्षता आम्ही घेतली हे ऐतिहासिक कार्य केले आहे याचा आम्हाला अभिमान वाटतो.

या स्मारकाने समाजाला सतत स्फूर्ती मिळावी समाजातील मरगळ नष्ट व्हावी. त्यात चैतन्य निर्माण व्हावे. तो कार्यरत असावा ही पवित्र भावना आहे. ज्यांचे स्मारक होत आहे त्या युगपुरूषांचा जीवन आदर्श, संदेश समाजामध्ये जागृत रहावा इच्छा आहे. त्यांचे संदेश कानी पडले म्हणजे आज ही दुर्जनानी ध्यावे देश द्रोह्यांनी लाजावे, देश दोहयांना धाक वाटावा, मेलेली मढी जिवंत व्हावी अशक्तांच्याही अंगामध्ये बळाचा संचार व्हावा, दुर्बलानीही अलौकिक शक्तिची कामे करून दाखववावी असे सामर्थ्य त्यांच्या चरित्रात आहे. शब्दानेच पेटतात घरे आणि दारे, शब्दच बनतात दुधारी हत्यारे, शब्दानेच बनतात माणसांची जनावरे पण शब्दानीच बाबासाहेबांनी घडविले परिवर्तन न्यारे ! या परिवर्तनातूनच समाजाची प्रगती, विकास, उन्नति व्हावी देश, धम्म यांची सेवा व्हावी व या दुर्लभ मानवी जीवनाचे सार्थक व्हावे असा हा छोटासा प्रयत्न आहे.

पिळलेल्या, पोळलेल्या रंजल्या गांजलेल्या आणि आपल्या उद्धाराविषयी हताश झालेल्या लोकांची अंत:करणे पुन्हा या बारा पाखाड्यांची एकजूट संपादन करूव एक तरी नगरसेवक या विभागाचा निर्माण करून आपली अस्मिता, अस्तित्व टिकविणाऱ्या पोकळ गप्पा मारणाऱ्यांची मन, मेंदू मनगटातील शक्ति एक करून दलितांचा दाता, पिता व त्राता बाबासाहेबाचे समता, बंधुत्व, न्याय यावर आधारित व अभिप्रेत असे कार्य करू या परिसराची शान, मान, परंपरा अविरत, अनिर्बंद्धध कायम राखू आजची परिस्थिती वेगळी आहे. सुक्षिशितांना आपल्या जबाबदारीचा विसर पडला आहे. युवा शक्ति दिशाहीन पद्धतीने भरकटत आहे. नेत्यांना फक्त निवडणूकीत रस उरला आहे. सारा समाज अंतर्गत संघर्षाने खिळखिळा झाला आहे. अशा समयी बाबसाहेबांचे हे स्मारक दीपस्तंभाप्रमाणे समाजाला मार्गदर्शन करेल. आपण **आम्हांस संघटना शक्ति द्या आम्ही आपणांस विकास देऊ.** समाज हिताच्या दृष्टीने अनेकविविध उपक्रम संस्थेच्या विचारधीन आहेत. त्यामाध्यमातून संस्था प्रयत्नशील आहे. संस्थेचे आत्मिक व मानसिक बळ प्रचंड आहे. परंतु दुदैवाने संस्थेचे आर्थिक बळ व हे देणारे मनुष्यबळ कमी आहे. आमचे कौतुक नको पण आम्हास सहकार्य हवे. तन, मन, धन यांचे सहकार्य हवे पोकळ आश्वासनानी कार्य होत नसते अंतकरणातील इच्छा शक्ति कार्य करीत असते. या उपक्रमास ज्यांनी मार्गदर्शन केले व जागा मिळविण्यास सहकार्य केले अशा मान्यवरांचा उल्लेख करताना आदर व श्रद्धा द्विगुणीत होते यामध्ये मा. ना. रामदासजी आठवले, मा. रा. सु. गवई, मा. विजयसिंह पाटणकर, मा, सदानंद वर्दे, सलीम झकेरीया, ऑलिव्हर आंद्रादे, जसबीर सिंग सेठी, पी. जी. आगळे (वास्तु शास्त्रज्ञ), ध. प. मो. रमेश वाघमारे (सल्लागार), बौ. पं. सं. शा. क्र. १९४/१५० बळीराम तोरणे,

सुधारक गोळपकर, विजू रेगे, रमेश मेढेकर, श्री. सुनील दत्त, श्री मुर्ती व सौ. मुर्ती उपाध्ये, सुरेन कापसे, सुरेश तांबे माणिक जाधव, थॉमस डिकोस्टा, बुधाजी गमरे, आत्माराम पवार, सी. के. खैरे, रविंद्र जाधव, सुनिल बा. शिर्के, महेंद्र भा. जाधव तुकाराम यशवंत कांबळे (वालकर) गोकूळ का जाधव (एस्.ई.एम्), महादेव धा. जाधव, संजय धोत्रे, प्रकाश साळवी, विजय ना. कांबळे, यांनी विशेष परिश्रम घेतले. वांद्रे खार पूर्व, पश्चिम विभागातील ४३ बौ. पं. स. शा. महिला मंडळे, तरूण मंडळे विविध संस्था यांनी जे मार्गदर्शन केले संस्था त्यांचे आभार मानते व आदर व्यक्त करतो. ज्यांना काही कारण परत्वे सहकार्य करता आले नाही त्यांचेही संस्था आभार मानते व प्रवाहांत सहभागी व्हावे अशी त्यांना विनंती करते. आम्हास विशेष सहकार्य करणाऱ्यांमध्ये ओबेराय बिल्डर्स समीर मोहिते, महापालिका कर्मचारी वर्ग विविध राजकीय पक्ष यांचे ही आभार मानीत आहोत व तसेच जाहिरातदार, देणगीदार व ज्यांनी आम्हास सहकार्य केले त्यांचे आम्ही मन:पूर्वक आभारी आहोत. अनवधानाने काही मंडळीची नावे राहिली असल्यास क्षमा करावी. ही नम्र विनंती अन्यायाचा प्रतिकार करून न्यायाची सिंहासनावर प्रतिष्ठापना करणारा युग पुरूष म्हणजेच डॉ. बाबासाहेब आंबेडकर त्यांनी दिलेली हा संदेश - जागृतीचा हा विस्तव कधीही विझू देऊ नका!

**आपले नम्र**

धर्मानंद परशुराम मोहिते

संस्थापक **ज्ञानकिर्ती सुरेश बाळा धोत्रे** चिटणीस

श्रावस्ती सांस्कृतिक मंच

वांद्रे खार पूर्व / पश्चिम (मुंबई)

डॉ. बाबासाहेब आंबेडकर रोडवर स्मारक असावे अशी विभागांतील तरूणांची इच्छा होती त्यानी तसा प्रयत्न केला. तत्कालीन कार्यकर्त्यानी १९७३ साली डॉ. बाबासाहेब आंबेडकर स्मारक समिती गठित केली होती. परंतु दुर्देवाने त्याना या कार्यात यश संपादिता आले नाही. चर्चा करता जुने कमिटीचे काय असा वादाचामुद्दा काढून बारापाखाड्यांतील पंचायतीच्या कार्यकर्त्यांना विश्वासांत घेऊन जे बरोबर येतील त्याना घेऊन जे येणार नाहीत त्यांच्या विन १४ जुलै १९९१ साली श्रावस्ती सांस्कृतिक मंचची स्थापन केली. ही स्थापना जुने पशुवधगृह येथील नव्या चाळीत असलेल्या बुद्धविहारांत झाली. महापालिकेने जागा दान दिली. त्यामध्ये तेव्हाचे उपायुक्त मा. विजयसिंह पाटणकर साहेबांचे फार मोठे योगदान आहे. ते नसते तर ? ही जागा पदरांत पाडून घेण्याचे महत्वपूर्ण कार्य काँग्रेसचे दिवंगत नगरसेवक आलिव्हर आंद्रादे यांचे आहे. तसेच नगरसेवक जसबिरासिंग सेठी यांचे ही आहे हे आनंदाने मान्य करावे लागेल.

## २. डॉ. बाबासाहेब आंबेडकर रोड खार पश्चिम येथे श्रावस्ती सांस्कृतिक मंच ने उभारलेले भव्य स्मारक''

हे स्मारक करतांना अनेक अडचणी आल्या. वांद्रे, खार पूर्व पश्चिम मधील निष्ठावान आणि श्रद्धावान जनतेने अपूर्व साथ दिली होती सुरूवातीस खूप लोक होते. परंतु समाजात असलेल्या काही अपप्रवृत्तीने लोक गळाले. जे उरलो ते चिकाटीने, धैर्याने राहिले. त्याना वेळेवर जेवण मिळत नव्हते. पण जिथे ज्या वेळेवर जायचे तिथे अर्धातास ते आधीच पोहचत होते. उल्लेख करावा लागेल तो बुधाजी गमरे या कार्यकत्याचा. ते बहीणीकडे खाणावळी होते. झोपायला शाळेत जवळच जात असत. पण त्याना रात्री अपरात्री बैठकासाठी जावे लागत असल्याने जेवण मिळत नसे कधी वडापाव तर कधी उपाशी रहावे लागे. पण कसलीही तक्रार त्यानी कधीच केली नाही. नोकरी सुटल्यामुळे आता त्यांचे वास्तव्य गांवीच आहे.

खजिनदार दि. रामदास मोरे यांची पत्नी सर्व कमिटीचे फराळ व चहाची नेहमीच सोय करीत. तसेच दि. मधुकर येलवे यांच्याहि पत्नी तशीच सोय करीत. त्यामुळे कार्यकत्यांत त्राण येत असे त्यांच्या मीठाला संस्था विसरणार नाही. वांद्रया बाहेरील व्यक्तिंत कासारवाडी दादर येथील (१२८) बौ. पं. समिती शाखा महिला मंडळ व तरूणानी चैत्यभूमिवर स्मारकाच्या उभारलेल्या प्रतिकृतीस फार मोलाचे सहकार्य केले. ही प्रतिकृती चिंचवाडीतील दिवंगत सुरेश चितांमणी तांबे यानी निर्माण केली होती. सिद्धार्थ नगर बाप्टी रोड शा. क्रं. १३च्या व कंपाऊंडमधील सर्व रहिवाशी बंधुनी देणगी देऊन उपकृत केले आहे. त्याचे सारे श्रेय दिवंगत सखुबाई जयराम मोरे (आमशेतकर) यांना व त्यांच्या सर्व परिवारास आहे.

शरीराने थकलेले पण मनाने तरूण असलेले अध्यक्ष गोविंद तानाजी धोत्रे हे आजही कार्यभार सांभाळत आहेत ही संस्थेची फार मोठी जमेची बाजू आहे. गौतम मोरे सहसर्व पक्षीय कार्यकर्ते तसेच महिला कार्यकर्त्या ही सुनीता धोत्रे, नंदा तांबे, प्रियंका मोरे, सुनीता तांबे, दिपाली सकपाळ, राजश्री सकपाळ, प्राची अहिरे या महिलांचे संस्था ऋणी आहे.

मुख्यमंत्री महाराष्ट्र मंत्रालय,
मुंबई ४०० ०३२
दिनांक : १४/१/१९९२

श्रावस्ती सांस्कृतिक मंच, बांद्रा, मुंबई या संस्थेच्या वतीने डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या जन्मशताब्दी वर्षानिमित्त त्यांचा अर्धाकृती पुतळा बसविण्यात येत आहे हे समजून आनंद वाटला.

या प्रसंगी प्रकाशित करण्यात येणाऱ्या स्मरणिकेद्वारे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे विचार आणि दीन-दलितांच्या उद्धारासाठी त्यांनी केलेले कार्य सामान्य जनतेपर्यंत पोहोचविले जाईल अशी अपेक्षा आहे. नियोजित समारंभास माझ्या मन:पूर्वक शुभेच्छा

**सुधाकरराव नाईक**

क्र. मंत्री/ २/१९९१/९०२
**समाजकल्याण, दारूबंदी प्रचार काय आणि रोजगार हमी योजना महाराष्ट्र शासन**
दिनांक : २४ डिसेंबर, १९९१.

श्रावस्ति सांस्कृतिक मंच. वांद्रे खार पूर्व पश्चिम, मुंबई यांच्यावतीने भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या अर्ध पुतळा बसविण्यात येत असल्याचे ऐकून आनंद होत आहे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा अभिप्रेत असलेल्या परिवर्तनाच्या विचारांचा प्रचार या माध्यमातून आपल्या संस्थेद्वारा घडावा ही अपेक्षा.

आपल्या कार्यात माझ्या हार्दिक शुभेच्छा.

**रामदास आठवले**

अध्यक्ष,
श्रावस्ती सांस्कृतिक मंच,
वांद्रे खार पूर्व पश्चिम, मुंबई.
दिनांक : ११/१०/१९९३
मुख्यमंत्री महाराष्ट्र
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
शुभेच्छा

वांद्रे-खार, मुंबई येथील श्रावस्ती सांस्कृतिक मंचच्या वतीने खार (पश्चिम) येथे भारतरत्न डॉ. आंबेडकर यांचा अर्धाकृती ब्राँझ धातूचा पुतळा उभारण्यात येत असल्याचे समजून आनंद वाटला. नुकतीच डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची जन्मशताब्दी आपण साजरी केली. या जन्मशताब्दीवर्षाच्या निमित्ताने त्यांचा पुतळा उभारण्याचा केलेला संकल्प लवकरच पूर्ण होत आहे ही समाधानाची बाब आहे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे विचार व आदर्श यांची याद्वारे सतत स्मृती ठेवली जाईल

यात शंका नाही. संस्थेच्या या उपक्रमास माझ्या मन:पूर्वक शुभेच्छा.

**शरद पवार**

आपले, दि. ३० डिसेंबर १९९१ चे पत्र मिळाले.

भारत रत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या अर्धाकृति पुतळ्याचे अनावरण बृहन्मुंबईतील बांद्रा-खार विभागात करण्यात येत आहे याचा मला अत्यानंद झाला या पुतळ्यासाठी आपण जे प्रयत्न केले त्याबद्दल मी आपणास धन्यवाद.

भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर जन्मशताब्दी वर्षात त्यांचा पुतळा उभारून आपण चांगले कार्य केले आहे. भारत रत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यानी समाजातील दलितपिडीत लोकांच्या उद्धरासाठी सामाजिक राजकीय व शैक्षणिक कार्य केले त्याला तोड नाही. त्यांचा अर्धपुतळा लोकांना विशेषत दलिताना प्रेरणा देईल अशी मी अपेक्षा व्यक्त करतो. या अर्ध पुतळ्याच्या आनावरण प्रसंगी आपण स्मरणिका प्रकाशित करीत आहात त्यास माझ्या शुभेच्छा.

**आपला रा. सु. गवई**

सदस्य, महाराष्ट्र विधानपरिषद

प्रिय श्री. धोत्रे,

श्री. सुरेश बाळा धोत्रे,<br>
श्रावस्ति सांस्कृतिक मंच,<br>
धोत्रे चाळ, जुनी शेरली, राजन रोड,<br>
बांद्रे (प.), मुंबई - ४०० ०५०.

शुभ संदेश

भारतरत्न डॉ. बाबसाहेब आंबेडकर यांच्या अर्धाकृति पुतळ्याच्या अनावरण प्रसंगी स्मरणिका प्रकाशित होणार आहे, हे वाचून आनंद वाटला. जागतिक कीर्तीचे व भारतरत्न म्हणून गौरविलेले डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे प्रत्येक भारतीय नागरिकाचे श्रद्धास्थान आहे यात शंका नाही. आपल्या स्मरणिकेतील साहित्य जनतेस उद्‌बोधक ठरेल तसेच आपल्या संस्थेने हाती घेतलेल्या सामाजिक कार्यामध्ये आपणास सुयश लाभेल अशी हार्दिक शुघ्भेच्छा.

**श.गं. काळे**

# श्रावस्ती सांस्कृतिक मंच

वांद्रे / खार पूर्व, पश्चिम वांद्रे, मुंबई - ४०० ०५०

## कार्यकारणी

| | |
|---|---|
| दिवंगत धर्मानंद पा. माहिते | अध्यक्ष |
| सुरेश बा. धोत्रे | संस्थापक चिटणीस |
| गोविंद धोत्रे | उपाध्यक्ष |
| दिवंगत मधुकर येलवे | उप चिटणीस |
| बुधाजी गमरे | खजिनदार |
| दिवंगत रामदास मोरे | सह. खजिनदार |
| तुकाराम कांबळे वालकर | सल्लागार |
| पी. जी. आगळे (वास्तुशास्त्रज्ञ) | सल्लागार |
| आत्माराम घाडगे | |
| रविंद्र जाधव; सुनिल शिर्के | |
| सी. के. खैरे | |
| दिवंगत दु. सुरेश चिंतामण तांबे | |
| गौतम पांडुरंग मोरे. | |



# बाबासाहेबानी स्व-हस्ताक्षरात लिहिलेली पत्रे

पुस्तक नं. 32 पावती नं. 793

तारीख ८ - ५ - १९३८

**स्वतंत्र मजूर पक्ष, मुंबई.**

श्री गणपत कृष्णा साळवे

वाडी वांद्रा रस्ता टर्नर रोड न्यु पाली वांद्रा बाळ माहार कॉलोनी खो नं. ——— यांजकडून १९३८ सालची

वर्गणी **आठ ८ आणे** साभार पावली.

भिमराव रामजी आंबेडकर.

इत्यर्थ रु. मात्र

---

| अ. नं. | विभाग | वार्ड र. नं. |
|---|---|---|
| १७ | बांद्रा वगैरे | १४४, १४५, १४६, १४७, १४८, १४९, १५०, १५१, १५२, १५०, १५१ १६४ |

## महार ज्ञाती पंचायत समिति, मुंबई

अधिकार पत्रक (सर्टिफिकेट)

१ मुरब्बाचे-पुरोहिताचे संपूर्ण नांव गोविंद संभू जाधव (आतलेकर)

२ राहण्याचा पत्ता कोंकणस्थ महार कॉलनी खार वांद्रा

३ गांवचा पत्ता गांव आतले तालुका दापोली जिल्हा रत्नागिरी

४ सध्याचे वय वर्षे ५० महिने ——— दिवस

५ पंचायतीचे सभासद कोंकणस्थ महार कॉलनी खार वांद्रा

६ पंचायतीचा रजिस्टर नंबर र. नं. २४८

७ शिक्षण ४थी मराठी ——— भाग

८ सुमारे २५ वर्षांचा सामाजिक कार्याचा अनुभव आहे.

रा. रा. गोविंद संभू जाधव यांना मागील भरी मान्य असून प्रतिज्ञा लेख लिहून दिलेला आहे.

तारीख २५ - ६ - १९४७ ——— च्या कौन्सिल सभेत मुरब्बी/पुरोहित

म्हणून नेमणूक करण्यात आली आहे. तारीख १६ - ६ - १९४७

त्यांना स्थानिक पंचायत देखरेख करण्याचा अधिकार देण्यांत आला आहे.

ता. २८ माहे फेब्रुवारी सन १९४८

[signature] [signature]

कौ. अध्यक्ष १/२८/४७ सेक्रेटरी

महार ज्ञाती पंचायत समिति, मुंबई

सुपरवायसरचीं कामें व अटी :-

(१) मला संस्थेकडून " सुपरवायसर " म्हणून अधिकार पत्रक मिळाल्यापासून माझ्या चांगल्या कामगिरी बद्दल कौन्सिल सभेस खात्री पटवीन, असें न झाल्यास संस्थेकडून माझें अधिकार पत्रक रद्द करण्यांत येईल हें मी सदैव लक्षांत ठेवीन.

(२) वर्षांतून ६ वेळां स्थानिक पंचास भेट देणें.

(३) पंचायतीचें दप्तर नियमा प्रमाणें ठेविलें किंवा नाहीं तें पाहाणे.

(४) शेरे पुस्तकांत शेरे देणे.

(५) जमाखर्च पाहाणे.

(६) पैशांची अफरातफर अगर पंच कमिटीत बेबनाव झाल्यास समितीस कळविणें.

[७] तंटा, भांडण अगर अन्य भानगडी मिटविणे. मिटत नसल्यास समितीस कळविणे.

[८] समितीच्या ऑफीसमध्यें प्रत्येक महिन्याचा रिपोर्ट पाठविणे.

मला वरील कामें व अटी मान्य आहेत.

सुपरवायसरची सही··गोविंद रां. अधव

पुरोहितानें पाळावयाच्या अटी.

(१) मला संस्थेकडून 'पुरोहित' म्हणून अधिकार पत्रक मिळाल्या पासून माझ्या चांगल्या कामगिरी बद्दल कौन्सिल सभेस खात्री पटवीन, असें न झाल्यास संस्थेकडून माझें अधिकार पत्रक रद्द करण्यांत येईल. हें मी सदैव लक्षांत ठेवीन.

[२] एकादा इसम कोणत्याहि स्थानिक पंचाचा सभासद असल्या शिवाय मी त्याचे कार्य करणार नांही.

[३] समितीचा छापील बेलपत्रा फॉर्म भरल्या शिवाय मी त्याचें कार्य करणार नाहीं.

[४] एकादा स्थानिक पंचायत समितांत सामिल नसल्यास त्या पंचायती तर्फे त्यां इसमाचें मी कार्य करणार नाहीं.

[५] कोणत्याही पंचायतीची वर्गणीची पावती पाहील्या शिवाय कार्य करणार नाहीं. (१ महिन्या शिवाय थकबाकी असतां कामा नये.)

[६] प्रत्येक डिसेंबर मध्यें 'पुरोहीता' साठीं नविन अंश करावा लागेल.

(७) प्रत्येक वाणिवारीत नवे अधिकार पत्रक समिती-कडून दिले जाईल.

मला वरील अटी मान्य आहेत.

पुरोहिताची सही·····························

---

INDIAN ROUND TABLE CONFERENCE.

8, CHESTERFIELD GARDENS,
MAYFAIR,
LONDON, W.1




# जंगी जाहीर सभा

शनिवार ता. ६-१-१९३४ रोजीं रात्रौ ९ वाजता दामोदर हॉल (परळ पोयबावडी) च्या पटांगणांत संगमेश्वर तालुका संघ कमिटीच्या विद्यमानें अस्पृश्य वर्गाची जंगी जाहीर सभा मे. सुभेदार साहेब विश्राम गंगाराम सवादकर यांचे अध्यक्षतेखालीं भरेल. सभेमध्यें संगमेश्वर तालुक्यांतील संगमेश्वर, देवरुख, देवळे, लांजे, हरचरे, पावस, हातखांबे, केळये, धामणसे, खेरात, फुणगूस आणि सैतावडें महालांतील मंडळींची संघटणा करून एक दिलानें काम करण्यासंबंधें विचार होईल तसेंच आपले परमपूज्य पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे विलायतेहून परत आल्यावर त्यांना संगमेश्वर तालुक्यास लवकरच भेट देण्याची विनंती करून त्यांच्या आगमन प्रसंगीं योग्य ती तजवीज करण्यासंबंधेंही सभेंत विचार होईल.

सभेंत भाई चित्रे B.A., बापूसाहेब सहस्रबुद्धे B.A., शांताराम उपशाम मास्तर, मडके बुवा ऊर्फ गणपत बुवा जाधव, तांबे शास्त्री, कमलाकांत चित्रे, व्ही. के. आचार्य, नारायण गायकवाड, भिवा रामा जाधव, रामजी काळू कांबळे, बिठोबा चांगदेव जाधव, रामजी सोमाजी जाधव, विठ्ठल रामा कदम आणि भा. र. कद्रेकर सं. जनता वगैरे मंडळींची भाषणें होतील.

सभेच्या कार्यक्रमानंतर दीनबंधु उद्धारक जलसा मंडळ कुलाबा या मंडळीचा सामाजिक जलसा होईल.

सभेच्या वेळीं तसेंच जलशाच्या वेळीं हेन्स रोड, पत्र्याची चाळ आणि नायगांव समता सैनिक दलाची पथकें व्यवस्था ठेवतील. तरी सर्व बंधु भगिनींनी सभेस हजर रहाण्याची कृपा करावी.

आपले नम्र,

संगमेश्वर तालुका व्यवस्थापक मंडळ.

Bharat Bhushan Printing Press, Bombay 8.

बुक नं. 159 पावती नं. 15321

## डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनीं प्रस्थापित केलेला इमारत फंड, मुंबई

तारीख २५-२-४१

श्री. गणपत कृष्णा साळवे जात महार

गांव टेहरे (धाकले) पोष्ट मालेगांव तालुका मालेगांव

जिल्हा नाशिक खोली नं. चाळ

नोकरी किंवा धंदा

दरमहा पगार रु. ६० रुपये यांजकडून आजरोजीं इमारत फंडाला

रु. १-०-० अक्षरीं एक रुपये रक्कम मिळाली. तिचा

तपशील खालीं दाखविला आहे.

| | रु. | आ. | पै |
|---|---|---|---|
| प्रमाणाप्रमाणे मिळावयाची रक्कम ... ... | १ | - | - |
| यापूर्वी मिळालेली रक्कम पा. नं. ... ... | - | - | - |
| आज मिळालेली रक्कम ... ... | १ | - | - |
| बाकी येणे राहिलेली रक्कम ... ... | १ | - | - |

वसूल करणाराची सही Bmore भिमराव-रामजी-आंबेडकर

# क्राऊन सिगारेट कंपनीतर्फे

## कै० सौ० आईसाहेब आंबेडकर यांचे

# जाहीर दुःख प्रदर्शन

अखिल अस्पृश्य समाजाचे सर्वश्रेष्ठ पुढारी डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या सुशील पत्नी कै. सौ. रमाबाई ऊर्फ आईसाहेब आंबेडकर यांच्या निधननिमित्त दुःखा-[illegible]ची जाहीर सभा, अस्पृश्य समाजाचे पुढारी मे. सुभेदार सवादकर यांचे अध्यक्षतेखाली रविवार ता. १६-६-३५ रोजी दिवसा ३ वाजतां पाली हिल बांद्रा शाळा नं. ६ मध्ये भरणार आहे. तरी सर्वत्र बंधुभगिनींनी या दुःखांत वाटेकरी होण्याकरितां सभेस अवश्य हजर रहावें. तसेंच मे. सिताराम नामदेव शिवतरकर हेहि हजर राहणार आहेत.

आपले नम्र,

[illegible] म्हातावकर — [illegible] शिरूरकर

[illegible] शिवा [illegible] — गोविंद धर्मा [illegible]

व्यवस्थापक,
क्राऊन सिगारेट कंपनी

—: भारत भूषण प्रिंटिंग प्रेस कामाठीपुरा मुंबई नं. ८. :—

# वांद्रे विभागातील बाबासाहेबांचे व त्याच्या सहकाऱ्यासह दुर्मिळ फोटो (वांद्रे विभाग)



डॉ. बाबासाहेब आंबेडकर गृहनिर्माण संस्थेचे सुरूवातीचे कार्यकर्ते



डॉ. बाबासाहेब आंबेडकर गृहनिर्माण संस्थेचे भूमिपूजन



डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचे ड्रायव्हर - जयराम माने



मिलींद महाविद्यालय औरंगाबाद



नवीपाली येथील डॉ. बाबासाहेबांचे सहकारी






डॉ. बाबासाहेब आंबेडकरयांच्या चळवळीचे आधारस्तंभ - गोविंद रामजी आड्रेकर केशव, गोविंड आड्रेकर आणि कॉम्रेड मोरे



कामगार संघाचे प्रतिनीधी व मुस्लिम पुढारी (अरबसाब)



सौजन्यमूर्ती
प्रो. व्ही. जी. रावसाहेब



सुरेश बाळा धोत्रे
(ज्ञानकिर्ती)

# अल्प परिचय

ब्रह्मदेशचे पूजनीय भन्ते यु. वजिराबुद्धी यांच्यापासून बौद्ध धम्म दिक्षा घेऊन गोरेगांवच्या श्रावस्ती सांस्कृतिक केंद्रात श्रामणेर झाले. भन्ते यु. वजिराबुद्धींच्या समवेत धम्म प्रचारात भाग घेतला. त्यांनीच ज्ञानकिर्ती हे नाव दिले. पाली पाठ संस्थेचे संस्थापक धम्मप्रवचनकार पुजनीय वडवलकर गुरूजी यांच्या सानिध्यांत राहून वक्तृत्व कला साध्य केली. गुरूजींच्या नंतर त्यांचे अपूर्ण कार्य आपल्या कुवतीप्रमाणे आजता-गायत करीत आहेत. दुर्मिळ ग्रंथांचा संग्रह करण्याच्या वृत्तीमुळे अपरिचित माहिती मिळाली. तिचा उपयोग धम्म प्रसारांत होत आहे. बौद्ध कालीन मुंबई, धम्मयात्रा आयोजन केले.

बौद्धजन पंचायत समितीच्या माध्यमातून १९६९मध्ये बौद्धाचार्य झाले. धम्म संस्कारविधीच्या माध्यमांतून कोकणांत व मुंबईमध्ये सुपरिचित आहेत. भारतीय बौद्ध महासभा, त्रैलोक्य सहाय्यक गण तसेच अनेक नामवंत संस्थांमधून धम्मकार्य करीत आहेत. १९९१ साली ' श्रावस्ती सांस्कृति मंच' या संघटनेची स्थापना करून १९९४ साली खार (पश्चिम) येथे डॉ. बाबासाहेब आंबेडकर मार्गावर 'बाबासाहेब आंबेडकरांचा' पुतळा उभारला आहे. जे वांद्रे विभागाचे भुषण ठरले आहे. राष्ट्रीय आपत्तींत नैसर्गिक आपत्तीत गरजूंना संस्थेच्यावतीने सर्व प्रकारचे सहाय्य करून मानवते ा बुद्ध, फुले, शाहू, आंबेडकरी विचारांचा प्रसार करीत आहे. सिंडीकेट बँके नोकरी करून महाराष्ट्र शासनाच्या परवानगीने लेण्यांच्या संशोधनाचे काम रीत आहेत.

आगामी प्रकाशने

१) नागपुत्रांची गौरव गाथा

२) रायगड जिल्ह्यांतील बौद्ध लेणी

३) स्तूप.

